


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २७९ - २८०, ऑक्टोबर १९९६ - मार्च १९९७

## दिवाळी ९६

# कादंबरी विशेषांक

**संपादक : शंकर सारडा**

संपादन समिती

डॉ. श. रा. राणे. डॉ. मधुकर हसमनीस. रत्नाकर कुलकर्णी.
प्रा. भगवान टाकूर. प्रा. सु. प्र. कुलकर्णी. डॉ. अरविंद संगमनेरकर

विज्ञापन समन्वयक - ह. ल. निपुणगे



**मुखपृष्ठ : डॉ. प्रकाश जोगळेकर, पुणे**

सूचना - हा अंक जोडअंक असून पुढील अंक मे १९९७ मध्ये प्रसिद्ध होईल

- **या अंकाची किंमत - ७० रुपये**
  वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी) १०० रुपये
  आजीव सदस्य शुल्क ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.



- मुद्रक - प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद
  टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. (दूरभाष : ४७५९६३ )
- मुद्रणस्थळ : वालेघान प्रेस, पुणे - २.

# अनुक्रमणिका

# संपादकीय

मित्रहो,

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा यंदाचा दिवाळी अंक कादंबरी विशेषांक म्हणून आपल्यापुढे सादर करताना आनंद होत आहे. आपली एक विशेष प्रिय कादंबरी निवडून तिची जन्मकथा सांगावी असे आवाहन आम्ही मराठी कादंबरीकारांना केले. अगदी एकच एक कादंबरी निवडणे अवघड वाटले तर आपल्या कोणत्याही एका कादंबरीची जन्मकथा सांगावी असेही सुचवले. त्यावावत काही मुद्देही सुचवले.

१) या कादंबरीचा विषय कसा सुचला? स्वतःच्या जीवनातील एखादी घटना, प्रसंग, परिचित व्यक्ती, एखादे आंदोलन, विशिष्ट वातावरण, राजकीय-सामाजिक पेचप्रसंग, औद्योगिक, शैक्षणिक इ. क्षेत्रातील समस्या, केवळ कल्पनारम्य वा फँटसी किंवा असेच काही अन्य कारण आपल्याला विशिष्ट विषयाची निवड करण्यास सहाय्यक ठरले का?

२) मध्यवर्ती व्यक्तिरेखा काल्पनिक आहे की वास्तवाधिष्ठित आहे?

३) कादंवरीच्या केंद्रस्थानी असणाऱ्या संघर्षाचे तुम्हांला जाणवलेले स्वरूप.

४) तुम्हांला अभिप्रेत असलेली त्या संघर्षाची वा समस्येची उकल.

५) विशिष्ट वातावरण निर्मितीसाठी, विषयाची सर्वांगीण माहिती करून घेण्यासाठी आपण केलेली तयारी, त्यासाठी केलेला प्रवास, संबंधितांच्या भेटीगाठी, वाचन - संशोधन

६) कथानक-उपकथानकांची गुंफण करण्यामागची निकड व भूमिका

७) कादंबरीच्या प्रत्यक्ष लेखनाची प्रक्रिया, तिला लागलेला कालावधी. एकूणच आपली लेखनाची पद्धत कशी आहे?

८) प्रकाशनानंतर आपल्या कादंवरीला लाभलेला वाचक-समीक्षकांचा प्रतिसाद

९) आपणास लाभलेले पुरस्कार, सन्मान इ.

१०) समकालीन कादंवरी वाङ्मयात तिचे आपल्याला जाणवणारे वेगळेपण व स्थान

११) आपल्या भावी लेखनाला या कादंबरीमुळे काही वेगळी दिशा मिळाली का?

१२) कादंबरीच्या आकृतिबंधाबद्दल आपली कल्पना. रूढ चाकोरीच्या बाहेर जाण्याचा आपला प्रयत्न असतो का?

हे मुद्दे केवळ विचारांना व लेखनाला चालना देण्यासाठी सुचवले होते. त्यावरच भर हवा असा आग्रह नव्हता.

आमच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन अनेक लेखकांनी आपले लेख पाठवले. त्यांचा समावेश या अंकात केला आहे. काही लेखकांनी लेख पाठवण्याबद्दल होकारार्थी पत्र पाठवले होते, परंतु त्यांचे लेख वेळेत आले नाहीत. काहींनी काही कारणाने लेख लिहिण्याबद्दल असमर्थता प्रकट केली.



अनुक्रमणिका

तरीही या अंकात नव्याजुन्यांचे सम्यक प्रतिनिधित्व आपल्याला जाणवेल अशी खात्री वाटते. पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे सर्वांना सामावून घेणे शक्य होतेच असेही नाही. परंतु सर्व थरातील, भागातील, वयोगटातील लोकप्रिय व मान्यवर कादंबरीकारांनी या उपक्रमात सहभागी व्हावे असा आमचा प्रयत्न होता. त्याला बहुतेक सर्वांनीच उत्तम प्रतिसाद दिला. त्यामुळे हा अंक प्रमुख मराठी कादंबरी लेखनाच्या स्वरूपावर प्रकाश टाकणारा ठरेल, असा विश्वास वाटतो. या अंकाच्या सिद्धतेला हातभार लावणाऱ्या सर्व साहित्यिक बंधूभगिनींना मनःपूर्वक धन्यवाद.

कादंबरीकारांनी स्वतःच्या आवडत्या कादंबरीच्या जन्मकथेच्या अनुषंगाने एकूणच आपली कादंबरी या वाङ्मयप्रकाराबद्दलची भूमिका विशद करावी अशी अपेक्षा होती. ती काही प्रमाणात पूर्ण झाली याचेही समाधान वाटते. त्याचबरोबर मराठीतील काही चोखंदळ अभ्यासक रसिकांना महत्त्वपूर्ण वाटणाऱ्या कादंबऱ्यांची एक यादी करावी अशी कल्पना या अंकाच्या निमित्ताने प्रत्यक्षात आणावीशी वाटली. पन्नासेक व्यक्तींना आम्ही पत्रे पाठवली. त्यापैकी काहींची उत्तरे वेळेत आली. त्या व्यक्तींच्या नावानिशी त्यांना मराठीतील विशेष अर्थपूर्ण वाटणाऱ्या कादंबऱ्यांची यादी देण्यात येत आहे. एकूण मराठी कादंबऱ्यांतून दहा कादंबऱ्यांची निवड करावी असे आम्ही सुचवले होते. अनेकांनी त्यापेक्षा कमी वा जास्त सुचवल्या आहेत. कोणी गेल्या वर्षा-दोन वर्षातल्या कादंबऱ्याच सुचवल्या आहेत, कोणी जुन्यानव्यांचा संगम व्हावा अशी नावे सुचवली आहेत. कोणी वाङ्मयप्रकारांची गल्लतही केली आहे. परंतु सर्वसामान्यपणे महत्त्वपूर्ण कादंबऱ्यांची त्यावरून कल्पना येऊ शकेल. अशी एक शंभरेक कादंबऱ्यांची यादी आणखी काही वाचक - समीक्षकांच्या मदतीने तयार करून ती प्रसिद्ध करण्याचा मानस आहे. पत्रिकेच्या वाचकांनीही या उपक्रमात सहभागी व्हावे असे आमचे आवाहन आहे. आपल्याला महत्त्वाच्या वाटणाऱ्या दहा कादंबऱ्यांची नावे आपण कळवावी.

'कादंबरी' या वाङ्मयप्रकाराची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढतच आहे, आणि कादंबरीच्या आकृतिबंधातही सतत बदल होत आहे. पूर्वीच्या महाकाव्याची जागा कादंबरीने घेतलेली आहे. कादंबरी हा महाकाव्याचा अर्वाचीन काळातील पर्याय आहे असे मत मराठीतील अनेक समीक्षकांनी मांडलेले आहे. "महाकाव्य या शब्दातील 'काव्य' या शब्दामुळे बहुतेक समीक्षक चकले. वास्तविक संस्कृतमध्ये काव्य हा शब्द वाङ्मय या अर्थाने वापरला जातो. परंतु प्राचीन काळी केवळ पद्यबद्ध महाकाव्येच निर्माण झाल्यामुळे 'महाकाव्य' या शब्दातील 'काव्य' हा शब्द काव्य (पोएट्री) किंवा पद्य (व्हर्स) या अर्वाचीन अर्थाचा मानून बहुतेकांनी विवेचन केले आहे आणि महाकाव्यांचा काळ संपला, आता गद्य कादंबरी हा महाकाव्याचा पर्याय आहे असे म्हटले." याकडे लक्ष वेधून डॉ. द. भि. कुळकर्णी यांनी महाकाव्य हा काव्यप्रकार (फॉर्म ऑफ पोएट्री) नसून वाङ्मयप्रकार (फॉर्म ऑफ लिटरेचर) आहे असे स्पष्ट केले आहे. मौखिक महाकाव्य, लिखित महाकाव्य व गद्य महाकाव्य असा या वाङ्मयप्रकाराचा विकासक्रम असल्याचे प्रतिपादन त्यांनी केले आहे. त्यातील सार ध्यानात घेतले तर कादंबरी हा वाङ्मयप्रकार कधीही कालबाह्य होणार नाही असे ठामपणे म्हणता येते.

कादंबरी या वाङ्मयप्रकाराने विश्वसाहित्यात निर्माण केलेले अनेक मानकरी व मानदंड आहेत. बाणभट्टाच्या कादंबरीने विशेष नामाऐवजी सामान्य नाम बनून मराठीतल्या या वाङ्मयप्रकाराला

कवेत घेतले. रोमन लेखक पेट्रोनियस (इ. स. ५०) लिखित सॅटिरिकॉन आणि ॲप्युलेइस (इ. स. १५०) लिखित दि गोल्डन ॲस, ग्रीक लेखक लाँगस (इ. स. तिसरे शतक) लिखित डॅफनीस ॲंड क्लोए या रोमहर्षक रोमान्स कथा कादंबरी या वाङ्मयप्रकाराच्या प्राचीनतेची साक्ष पटवतात. घटनांच्या मालिका त्यात गोवलेल्या दिसतात. दहाव्या शतकात जपानमधील लेडी मुरासाकीने 'टेल ऑफ गेंजी' हे पुस्तक लिहिले अगदी आजच्या अर्थानेही ही गेंजीची कथा म्हणजे कादंबरी ठरते, आणि "प्रॉबेबली दि फायनेस्ट नॅरेटिव्ह वर्क एव्हर क्रिएटेड बाय ए वुमन" असे त्याचे महात्म्य एका जर्मन समीक्षकाने वर्णिलेले आहे बोकॅशिओच्या डिकॅमेरॉन (१३४८-५३) मध्ये अनेक कथांचा समावेश आहे. नॉव्हेल हा शब्द इटालियन 'नॉव्हेला' या शब्दावरून आला, फ्रेंच आणि जर्मन भाषेत त्याला रोमाँ ( रोमान ) हा शब्द वापरतात, तो मध्ययुगीन रोमान्सवरून आलेला आहे. या नावातच कथा आणि प्रेम यांची सांगड घातली गेली आहे. प्रेमकथा, साहसकथा व कल्पनारम्य फॅन्टॅस्टिक-अद्‌भुत कथा असे कादंबरीचे मूलभूत प्रकार केले जातात. या तीन प्रकारांची एकमेकात सरमिसळ करणे अवघड जाते, म्हणून हे वर्गीकरण योग्य ठरते असे मानण्यात येई.

सतराव्या शतकापासून कादंबरीने युरोपियन वाचकांच्या मनावर अधिराज्य गाजवायला सुरुवात केली. शिक्षणाच्या सार्वत्रिक प्रसाराबरोबर वाचकांची संख्या वाढली आणि मुद्रणाच्या सुलभतेमुळे प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची संख्या वाढत राहिली. कादंबरीद्वारे होणारे वेगवेगळ्या प्रकारचे कुतूहल जागवणारे बहुरंगी जीवनाचे चित्रण वाचकांना आवडू लागले. नवनवे लेखक त्यातून पुढे आले. 'फॅंटसी, लव्ह व ॲडव्हेंचर ' यांवर भर असला तरी पिकारेस्क, गोथिक, युटोपियन कादंबऱ्या, रहस्यकथा, विज्ञानकथा, मनोविश्लेषणपर वा संज्ञाप्रवाहात्मक कादंबऱ्या, धार्मिक-सामाजिक व पलायनवादी कादंबऱ्या, रोमॅंटिक, भावुक, वास्तववादी, नॅचरलिस्टिक व अतिवास्तववादी कादंबऱ्या, प्रादेशिक, ऐतिहासिक कादंबऱ्या यासारखे सवते सुभेही अभ्यासक - वाचक लेखकांनी सोयीसाठी स्वीकारले. या विविधतेमुळे कादंबरी या प्रकाराच्या कक्षा विस्तारत गेल्या, आणि कादंबरीचे साहित्यक्षेत्रातील वर्चस्व अबाधित राहिले. कादंबऱ्यांची संख्याही विपुल आहे, दर्जाही लक्षणीय आहे आणि कादंबरीकाराला मान्यता व मोबदलाही सर्वाधिक मिळतो. अरुंधती रॉय यांच्या पहिल्याच कादंबरीला दीड कोटी रुपये आगाऊ मानधन मिळाल्याची घटना अगदी ताजी आहे. विक्रम सेठ यांना 'ए सुटेबल बॉय'साठी अडीच कोटी रुपयांची रक्कम आधी देण्यात आली. मराठीतही धार्मिक पुस्तके सोडल्यास सर्वाधिक खपाच्या पुस्तकांत कादंबऱ्याच जास्त निघतील. नोबेल पुरस्कार मिळवणाऱ्या लेखकात कादंबरीकारांचीच संख्या अधिक आहे. कादंबरी या प्रकाराला एकूणच मागणी जास्त असल्याने बाजारी, सवंग लेखनही खूप होते. परंतु चांगल्या कसदार कादंबऱ्यांचे महत्त्व त्यामुळे अधिकच ठसठशीतपणे जाणवते.

आकृतिबंध आणि शैली या दृष्टीने काही ठोकताळे कादंबरीबद्दल मनाशी असतात. ना. सी. फडके यांनी त्या ठोकताळ्यांवर भर देऊन लेखन केले, आपल्याला जाणवलेला जीवनाचा महापट उलगडण्याचा प्रयत्न करणाऱ्या नव्या कादंबरीकारांना हे ठोकताळे व ह्या चौकटी अनावश्यक वाटत असतील तर ते स्वाभाविकच आहे. ज्ञानकोशकार डॉ. केतकरांनी 'माझे कादंबरीलेखन' या लेखात मांडलेली भूमिका ही या दृष्टीने आजही लक्षात घेण्यासारखे आहे. " माझ्या लिखाणाला कादंबरी

म्हणावे की म्हणू नये असा प्रश्न उत्पन्न करतात. त्यांना उत्तर असे आहे की माझ्या कादंबऱ्या कादंबरीच्या व्याख्येत बसत नसतील तर कादंबरी या शब्दाची व्याख्या बदलावी किंवा त्या कृतीचे वर्गीकरण निराळेच नाव देऊन करावे. कादंबऱ्याचे लक्षण कधीच बांधता येणार नाही, आणि जे लक्षण तयार होईल त्याचा उपयोग जुन्याच्या स्पष्टीकरणापुरताच आहे, नवीन तऱ्हेच्या प्रयत्नास नियंत्रक नाही असे समजावे." "एकमेकांशी ज्यांच्या फांद्या अडकल्या आहेत अशा स्वतंत्र बुंध्याच्या वृक्षराजीशी त्या तुल्य असतात, या प्रकारच्या कादंबऱ्यांशी ज्यांना परिचय नाही त्यांस प्रियंवदा ही कादंबरी शास्त्रीय नियमांनी तयार झालेली नाही असे वाटले. तथापि ती कादंबरी काही निराळ्या प्रकारचीच आहे हे काही मार्मिक लेखकांनी ओळखलेच" असे त्यांनी 'गोंडवनातील प्रियंवदा'च्या प्रस्तावनेत म्हटले आहे. नवा प्रयोग करू पाहणाऱ्या प्रत्येक कादंबरीकाराचेच मनोगत डॉ. केतकर यांनी येथे प्रकट केलेले आहे असे वाटते.

एकूणच वाङ्मयप्रकारांच्या आकृतिबंधाची सध्या विलक्षण मोडतोड चालू आहे. नव्या संवेदना, नव्या समस्या, नवे संशोधन, नवी मानसिकता ही आपल्या आविष्कारासाठी रूढ वाङ्मयप्रकारांचा ढोबळपणे वापर करीत असली तरी, त्यांना आपल्या नव्या मुशीत ढाळू पाहात आहे, असा याचा अर्थ आहे. त्यामुळे वाचक रसिकांनीही आपल्या अभिरुचीच्या कसोट्या त्याप्रमाणे उदार, मुक्त ठेवायला हव्या.

आपला वाचकवर्ग हा हजार प्रती काढणारा प्रकाशक किंवा संपादक आणि केवळ दिवाळी अंक वाचणारा मराठी मध्यमवर्गीय असे गृहीत न धरता, आता भारतीय व जागतिक स्तरावरील लक्षावधी संवेदनाक्षम रसिकवर्ग हा आपला वाचक आहे अशी खूणगाठ मनाशी बांधून आपल्या कादंबरीकारांनी लिहायला हवे. इलेक्ट्रॉनिक सर्वव्यापी माध्यमांमुळे मुद्रित शब्दाच्या आवाहनाचे क्षेत्रही आता विस्तृत होणार आहे. मराठी कथाकादंबऱ्यांची अन्य भाषांत व माध्यमात रूपांतरे होणे आता अटळ आहे. त्यांची आवाहकता विश्वात्मक असेल तरच या प्रक्रियेला चालना मिळेल. मराठी कादंबरीकार हा भारतीय कादंबरीकारांमध्येही कसदार व दर्जेदार ठरला पाहिजे, जागतिक संदर्भातही दखल घेण्याएवढा तो मातब्बर व्हायला हवा. सलमान रश्दी, विक्रम सेठ, अमिताव घोष, भारती मुखर्जी वगैरे उदाहरणे आपल्यासमोर आहेत. आज जागतिक कादंबरीक्षेत्रात हे लेखक मानाने स्थानापन्न झालेले आहेत. ही प्रक्रिया प्रादेशिक भाषांतील लेखकांनाही जर योग्य अनुवादक मिळाले तर गतिमान होईल. परंतु त्यासाठी आपल्या लेखकांनी महत्त्वाकांक्षी बनून आपला आवाका वाढवला पाहिजे. राजवाडे यांनी सांगितल्याप्रमाणे त्यासाठी जाज्ज्वल्य मनोवृत्ती हवी. बौद्धिक, भावनिक गुंतवणूक हवी. संपूर्ण समाजाच्या गाभ्याला स्पर्श करणारी प्रतिभा व भाषिक क्षमता हवी.

आज अनेक आफ्रिकी आशियाई लेखक हे इंग्रजीत लेखन करून गाजत आहेत. 'बुकर' सारख्या प्रतिष्ठित पुरस्काराचे मानकरी ठरत आहेत. नोबेल पुरस्कारही मिळवत आहेत. पाश्चात्य वाचकांना आशिया-आफ्रिकेतील जनजीवनाबद्दल जिज्ञासा आहे. तेथील वातावरणाचे व जनमानसाचे अंतरंग जाणून घेण्याची ओढ आहे त्यामुळे आपल्या मराठी कादंबरीकारांनीही आपल्या आशयाची विश्वात्मक आवाहकता जाणून, उत्तम कलाकृतीच्या निर्मितीच्या दिशेने झेपावले पाहिजे.

या कादंबरी विशेषांकातील मनोगतांमधून त्या त्या लेखकांच्या लेखनपद्धतीच्या व आशयवस्तूच्या सामर्थ्याचा व मर्यादांचा बोध होऊ शकेल. 'झाडाझडती' सारख्या कादंबरीतील समूहचित्राची अपरिहार्यताही त्यामुळे जाणवेल. कादंबरीच्या रंजनात्मक अंगाला महत्त्व आहे तसेच ते कलात्मक अंगालाही आहे. या दोन्हींचा मेळ घालण्याचे कौशल्य ज्यांना साधते, अशांची संख्या कमीच असणार.

या अंकामुळे वाचकांना आघाडीवरच्या नव्याजुन्या लेखकांच्या निर्मितिप्रक्रियेचे विलोभनीय अंतरंग दर्शन घडेल, आणि कादंबऱ्या वाचताना अधिक आत्मीयता वाटेल अशी आशा वाटते.

ही दिवाळी व नवे वर्ष आपणां सर्वांना सुखसमृद्धीचे जावो ही प्रार्थना.

**शंकर सारडा**
संपादक



**नवे आजीव सभासद**

महानुभव हिरालाल अर्जुन(कोपरगाव), डोंगरे नितीन दत्तात्रय (कोपरगाव) मोहिते धोंडीराम महादेव (मोहित्यांचे वडगाव), प्रा. गीता भा. मांजरेकर (मुंबई), देशपांडे मधुकर गोपाळ (गंगाखेड) जोशी मधुकर अनंत(ठाणे), सौ. रेवती वसंत गोगटे (ठाणे), सुलभा दळवी (चिंचवड) वनिता जगदीश ठाकुर (बडोदा) प्रा. रवींद्र ठाकूर (कोल्हापूर) सौ. विजया श्रीनिवास जहागीरदार (सोलापूर) राजेंद्र पां. टिळे (इस्लामपूर), शैलजा पां. टिळे (इस्लामपूर) नामदेव चंद्रभान कांबळे (वाशीम)

**पुणे** - सौ. मधुवंती रवींद्र देवधर, डॉ. वासुदेव दत्तात्रय दिवेकर, विठ्ठल विनायक देवगावकर, सौ. शरदिनी हंबीरराव मोहिते, छाया प्रभाकर जोशी, सौ. माधुरी संजय दातार, अनघा अजय सोमण, मेघना संजय बापट, सौ. रोहिणी शंकर जाधव, आनंद गजानन माडगूळकर, शिवाजी गोविंद पाटील, रमेश रावसाहेबा चव्हाण, सौ. वृषाली रवींद्र फडणीस.

## नवती महोत्सवासाठी मिळालेल्या देणग्या

| | | रुपये | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६३) | श. रा. राणे | १,०००/- | ८०) | र. के. कोटावळे | १,००१/- |
| ६४) | कृष्णकुमार टोकळ | १,००१/- | ८१) | श्रुती श्रीकांत कुलकर्णी | १०१/- |
| ६५) | विनायक नागेश थत्ते | १००/- | ८२) | अनिता जगदिश रानडे | १०१/- |
| ६६) | प्रकाश होळकर | १,१११/- | ८३) | भगवान ठाकूर | १,०००/- |
| ६७) | स्नेहलता कुलकर्णी | ५०१/- | ८४) | शंकर ल. गोगटे | २०१/- |
| ६८) | क्रांतीनाथ रायखेल्कर | १४,०००/- | ८५) | शकुंनला लिमये | ५,०००/- |
| ६९) | मे. शार्प मेटल आर्ट | ५००/- | ८६) | ववनराव नावडीकर | १,००१/- |
| ७०) | शं. रा. देवळे | १,०००/- | ८७) | सरोज दसनूरकर | ५००/- |
| ७१) | सु. प्र. कुलकर्णी | २००/- | ८८) | आशा कर्दळे | ५१/- |
| ७२) | सु. प्र. कुलकर्णी | १,००१/- | ८९) | मा. गो. जामदार | ३००/- |
| ७३) | संगिता वर्वे | १०५/- | ९०) | यशवंतराव गडाख | ११,०००– |
| ७४) | अरूणा ढेरे | १०१/ | ९१) | मॅन्युएल डिसोजा | ५०/- |
| ७५) | निलिमा गुंडी | ५०१/- | ९२) | सुनंदा परांजपे | २,०००/- |
| ७६) | सुरेश वसंत रानडे | २५१/- | ९३) | शांता शेळके | १,१०१/- |
| ७७) | अनंतराव कुलकर्णी | १००/- | ९४) | माधव विश्वनाथ मदाने | १,०००/- |
| ७८) | आशा भिडे | ५०१/- | ९५) | सुपमा शरद हडप | १,०००/- |
| ७९) | फा. फ्रान्सिस दिब्रिटो | १२१/- | | दि. १८-९-९६ पर्यंत | |













# काही लक्षवेधक कादंबऱ्या

**डॉ. उषा देशमुख, मुंबई**

१) पण लक्षात कोण घेतो, २) वज्राघात, ३) गणपतराव, ४) नलिनी, ५) इंदू काळे सरला भोळे, ६) आश्रमहरिणी, ७) रणांगण, ८) जान्हवी, ९) कोसला, १०) ळ्हाळी, ११) वॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर

**प्रा. म. द. हातकणंगलेकर, सांगली**

१) दुःखाचे श्वापद, २) दशक्रिया, ३) स्थलांतर - सानिया, ४)चिरेबंद - रवींद्र शोभणे, ५) विद्यापीठ (अनंत कदम), ६) नचिकेताचे उपाख्यान ( संजय जोशी), ७) त्रिदल ( आशा वर्गे), ८) ऐलतटावर पैलतटावर (विद्याधर भागवत)

**ना. धों. महानोर, जळगाव**

१) पण लक्षात कोण घेतो, २) दोन ध्रुव, ३) पाणकळा, ४) गारंबीचा बापू, ५) शबरी, ६) कोसला, ७) वनगरवाडी, ८) चक्र, ९) वॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर, १०) धग

**डॉ. वि. बा. प्रभुदेसाई, नागपूर**

१) आनंदी गोपाळ, २) किनारा, ३) प्रदक्षिणा, ४) वलयांकित, ५) दशक्रिया, ६) वळी, ७) रणांगण, ८) नादनदी, ९) धग, १०) रथचक्र, ११) चंवळेच्या पलिकडे, १२) चंदनवाडी, १३) सावित्री, १४) कोसला, १५) दुःखाचे श्वापद

**प्रा. के. ज. पुरोहित, मुंबई**

१) पण लक्षात कोण घेतो, २) विशाल जीवन (पु. य. देशपांडे), ३) रणांगण, ४) प्रतिनिधी (वसंत वरखेडकर), ५) पडघवली, ६) रथचक्र, ७) धग, ८) माणूस, ९) वनगरवाडी, १०) कोसला, ११) मुंबई दिनांक

**डॉ. सु. रा. चुनेकर, पुणे**

१) वज्राघात, २) रागिणी, ३) काळे पाणी, ४) रणांगण, ५) वळी, ६) जान्हवी, ७) ययाति, ८) पाणी (मर्ढेकर), ९) वनगरवाडी, १०) रथचक्र.

**सौ. वीणा देव, पुणे**

१) रारंगढांग, २) चानी, ३) रथचक्र, ४) कुणा एकाची भ्रमणगाथा, ५) पडघवली, ६) रणांगण, ७) बखर एका राजाची, ८) पडघवली, ९) गोतावळा, १०) सेतू - आशा बगे

**डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर**

१) पण लक्षात कोण घेतो, २) सुशीलेचा देव, ३) ब्राह्मणकन्या, ४) प्रवासी (ना. सी. फडके), ५) ययाति, ६) रणांगण, ७) वळी, ८) रथचक्र, ९) धग, १०) कोसला, ११) मोगरा फुलला, १२) ळ्हाळी, १३) गोतावळा, १४) मुक्काम (गौरी देशपांडे), १५) स्थलांतर, १६) मुक्तात्मा, १७) झाडाझडती, १८) अजगर (चिं. त्र्यं. खानोलकर)

**डॉ. भालचंद्र फडके, पुणे**

१) पण लक्षात कोण घेतो, २) सुशिलेचा देव, ३) ब्राह्मणकन्या, ४) प्रवासी, ५) ययाति, ६) भंगलेले देऊळ, ७) वळी, ८) रथचक्र, ९) कोंडुरा, १०) शितू, ११) राघववेळ, १२) कोसला, १३) वनगरवाडी, १४) स्वामी, १५) गोतावळा, १६) धग, १७) बखर एका राजाची, १८) फकिरा, १९) पाचोळा, २०) चक्र

**प्रा. ग. प्र. प्रधान, पुणे**

१) उल्का, २) पांढरे ढग, ३) अखेरचे बंड, ४) हद्दपार, ५) सुनीता, ६) गारंबीचा बापू, ७) भंगलेले देऊळ, ८) सावित्री, ९) हत्या, १०) आश्रमहरिणी

**सुधीर देव, नागपूर**

१) मर्ढेकरांच्या कादंबऱ्या २) वस्ती वाढते आहे. (भा. ल. पाटील), ३) सात सक्कं त्रेचाळीस, ४) स्फोट ( अरुण साधू), ५) रारंगढांग, ६) अमुकचे स्वातंत्र्य (शशांक ओक), ७) अग्निपुष्प

(रेखा वैजल), ८) खंडाळ्याच्या घाटासाठी (शुभदा गोगटे), ९) एक होता फेंगाड्या( अरुण गद्रे), १०) अंताजीची बखर, ११) बखर एका राजाची व उच्छाद, १२) एकेक पान गळावया

**रवींद्र पिंगे, मुंबई**

१) देव घालले ( दि. बा. मोकाशी), २) कोंडुरा, ३) मैत्रीण (प्रभाकर पाध्ये), ४) सावित्री, ५) रेणू, ६) एकेक पान गळावया, ७) कोवळे दिवस, ८) तुबाडचे खोत, ९) दूर गेलेले घर (लक्ष्मीकांत तांबोळी), १०) वंदिश (अंजली सोमण), ११) बखर एका राजाची.

**मालती बेडेकर**

गेली काही वर्षे मी सगळे मराठी साहित्य वाचू शकले नाही. त्यामुळे आपण म्हणता त्याप्रमाणे कादंबऱ्यांची नावे सुचवणे म्हणजे एखाद्या लेखकावर अन्याय होण्यासारखे आहे. मला नकार द्यावा लागतो आहे. क्षमस्व.

**अनंत मनोहर, बेळगाव**

१) चक्र, २) गोतावळा, ३) कोसला, ४) सत्तांतर, ५) स्वामी, ६) इंधन ( हमीद दलवाई), ७) माणूस, ८) शहेनशहा, ९) राघववेळ, १०) साता उत्तराची कहाणी, ११) आनंदी गोपाळ, १२) ब्राह्मणकन्या, १३) काचापाणी, १४) वांगी, १५) वळी.

**डॉ. कल्याण इनामदार, पुणे**

१) रारंगढांग, २) तुडवलेले घरकुल ( गो. नी. दांडेकर), ३) हा जय नावाचा इतिहास आहे (आनंद साधले, ४) गणूराया व चानी, ५) जान्हवी, ६) आनंदी गोपाळ,

७) दशक्रिया डॉ. इनामदार यांनी याशिवाय युगान्त (इरावती कर्वे), कृष्णकिनारा (कथासंग्रह - अरुणा ढेरे) ही नावेही कळवली आहेत. या कादंबऱ्या आहेत असे त्यांना वाटत असावे.)

**डॉ. मुरलीधर जावडेकर**

१) वज्राघात - हरिभाऊ आपटे, २) पण लक्षात कोण घेतो, ३) उषःकाल - हरिभाऊ आपटे, ४) ब्राह्मणकन्या - श्री. व्यं. केतकर, ५) काळे पाणी - वि. दा. सावरकर, ६) वळी - विभावरी शिरूरकर, ७) भावीण - वा. भ. बोरकर, ८) राक्षसविवाह, ९) फकिरा, १०) आनंदीगोपाळ - श्री. ज. जोशी, ११) रात्र काळी घागर काळी - चिं. त्र्यं. खानोलकर, १२) महापुरुष - मधुकर जावडेकर.

**राम शेवाळकर, नागपूर.**

१) उषःकाल - ह. ना. आपटे, २) ब्राह्मणकन्या - श्री. व्यं. केतकर, ३) सुशीलेचा देव - वा. म. जोशी, ४) दौलत - ना. सी. फडके, ५) क्रौंचवध - वि. स. खांडेकर, ६) उल्का- वि. स. खांडेकर, ७) भंगलेले देऊळ - ग. त्र्यं. माडखोलकर, ८) रणांगण - विश्राम बेडेकर, ९) अकुलिना - पु. भा. भावे, १०) सावित्री - पु. शि. रेगे, ११) श्यामची आई- साने गुरुजी, १२) कुणा एकाची भ्रमणगाथा - गो .नी .दांडेकर, १३) तुंबाडचे खोत - श्री. ना. पेंडसे, १४) बळी - विभावरी शिरूरकर, १५) मुंबई दिनांक - अरुण साधू, १६) कोसला - भालचंद्र नेमाडे

## महाराष्ट्र साहित्य परिषदेला मिळालेल्या देणग्या

१) डॉ. धैर्यशील शिरोळे आणि शिरोळे कुटुंबियांनी रु. पंचवीस हजाराची ठेव, देणगी म्हणून दिली आहे. या ठेवीच्या व्याजातून दरवर्षी म्हणजे दि. १४ जुलै रोजी कै. सौ. शांतादेवी बाबूराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ मराठी भाषेतील कर्तृत्वसंपन्न अशा ज्येष्ठ लेखिकेला दोन हजार रुपयांचा पुरस्कार देण्यात येईल.

२) श्री. रा. के. फणसळकर यांनी दहा हजार रुपयांची ठेव, देणगी म्हणून दिली आहे. या ठेवीच्या व्याजातून दरवर्षी म.सा.प.च्या परीक्षांमध्ये सर्वाधिक गुण मिळवून उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थी विद्यार्थिनींना कै. दिनकर नथोपंत साठे यांच्या स्मरणार्थ पारितोषिके देण्यात येतील.

३) कै. चिं. वि. जोशी आणि कुसुमाग्रज यांच्या स्मरणार्थ दरवर्षी दिल्या जाणाऱ्या रु. १,२००/- लेखकास व रु. ९००/- प्रकाशकास या पुरस्काराची रक्कम अनु. रु. १,५००/- रु. १,०००/- करण्यासाठी कॉन्टिनेन्टल प्रकाशनचे संचालक श्री. अनंतराव कुलकर्णी यांनी रु. १०,०००/- ची देणगी दिली आहे.

४) श्री. चंद्रकांत शेवाळे, चंद्रवल्लभ प्रकाशन, पुणे यांनी तीस हजार रुपयांची ठेव देणगी म्हणून दिली आहे. या ठेवीच्या व्याजातून दरवर्षी दिवाळी अंकाना प्रत्येकी एक हजार रुपयांची तीन पारितोषिके देण्यात येतील.

५) कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मरणार्थ दरवर्षी दिल्या जाणाऱ्या पुरस्काराची रक्कम रु. १,०००/- ऐवजी रु. २,१००/- करण्यासाठी श्री. कुमार ठोकळ, श्रीलेखन वाचन भांडार यांनी रु. तेरा हजारांची देणगी दिली आहे.

६) 'लोकहितवादी' यांच्या नावाने दरवर्षी दिल्या जाणाऱ्या पुरस्काराची रक्कम रु. ७५०/- ऐवजी रु. १,०००/- करण्यासाठी श्री. य. वि. देशमुख यांनी पाच हजार रुपयांची देणगी दिली आहे.

७) कै. ह. ना. आपटे यांच्या नावाने दरवर्षी दिल्या जाणाऱ्या पुरस्काराची रक्कम रु. १००/- ऐवजी रु. १,०००/- करण्यासाठी सर्वश्री श्री. गजानन चिंतामण आपटे, सुभाष कृष्णाजी आपटे व उल्हास कृष्णाजी आपटे यांनी प्रत्येकी रु. १,०००/- ची अशी मिळून रु. ३,०००/- ची देणगी दिली आहे. आधिक रु. ७,०००/- देण्याचे आपटे कुटुंबियांनी मान्य केले आहे.

८) 'केशवसुत' स्मृतिदिन दरवर्षी साजरा करण्यासाठी डॉ. मुरलीधर जावडेकर यांनी रु. तीस हजारांची ठेव, देणगी म्हणून दिलेली आहे.

वरील सर्व देणगीदारांची परिषद अतिशय आभारी आहे.

**राजा फडणीस, रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर, भगवान ठाकूर**
कार्यवाह, म. सा. प. पुणे.

श्री. ना. पेंडसे

# गारंबीचा बापू

ज्या 'गारंबीच्या बापू'मुळे मी एकदम प्रकाशात आलो, त्यातील व्यक्तिरेखा कशा सुचल्या, ते विस्ताराने सांगतो. पहिला 'बापू'. त्याचा पूर्वज बापूकाका सामल. पण हा सामल तरी कोठून आला? तसा सलग बापू समाजात कधीच दिसला नाही; म्हणूनच 'निर्मिती' हा शब्द वापरावा लागतो. ते काम फक्त आदिशक्तीचे. माणूस ह्या मूलघटकांची बेरीज, वजाबाकी करतो आणि आपण त्याला 'नवनिर्माण' म्हणतो. माझा 'बापू' हा तीन व्यक्तींच्या बेरजेतून जन्माला आला आहे. कोणाही कादंबरीकारांच्या बाबतीत असेच होते. निर्मिती म्हणजे शेवटी बेरीज - वजाबाकी, कशाची? कादंबरीकाराला गरज असेल, त्या आशयाला उपयोगी पडतील, अशा व्यक्तींची. मी पाहात होतो, तो 'बापू' बेबंद, बेदरकार, समाजाच्या व्यवस्थेवर नाराज असलेला, भावनाप्रधान वगैरे. मी इतकी विशेषणे वापरली; पण ती सर्व स्थूलार्थाने घ्यायची. जीवनात काटेकोर काही नसते. तसेच कादंबरीचेही असते. इतके ग्रॅम गहिवर, इतके ग्रॅम चीड, इतके ग्रॅम स्त्रीविषयक भानगडी - प्रत्यक्ष जीवनाप्रमाणे कादंबरीतही असे नसते. 'व्यक्तिरेखा' हे फक्त बीज. त्या बीजाची 'जात' तेवढी कादंबरीकाराला माहीत असते. आंबेमोहोर - बासमती - वरंगळ. प्रत्यक्ष वाढताना खत, पाणी, श्रम जसे कमी - जास्त पडतील, तसे निर्मितीचे स्वरूप बदलणार. लेखन सुरू झाले, की लेखकाच्या कल्पनेत नसलेले बदलही घडतात. ते फक्त सहज आहेत ना, एवढेच कादंबरीकाराने पाहायचे. जिवंत वाढ (ऑरगॅनिक ग्रोथ) होत आहे, फक्त एवढ्याकडेच करड्या नज़रेने पाहायचे. 'एल्गार' लिहिताना मला 'हिंदू-संस्कृती'चा गौरव करायची, इस्लामचा धिक्कार करायची उबळ येत होती; पण तिला गप्प बसवले. म्हटले, "माझ्याही मनात तुम्हांला 'चिकटवायचे' आहे, पण व्हेकन्सी झाली, तर, "मी ती निर्माण करणार नाही." त्याप्रमाणे 'गौरवा'ला चान्स मिळाला (आणि आचार्यांचा आक्षेप! ओढवून घेतला.) धिक्काराला व्हेकन्सी मिळाली नाही.

मी 'बापू'संबंधी बोलत होतो. तर तो तीन व्यक्तींची बेरीज आहे. पैकी फक्त एक व्यक्ती जवळून पाहिलेली. दोन ऐकीव. आमच्या गावात एक राजबिंडा, सधन माणूस होता. कशामुळे माहीत नाही; पण तो मांसभक्षण, मद्यपान करू लागला. त्यातच त्यांचा अंत झाला. लहानपणापासून मी त्याच्या थरारक कथा ऐकत आलो. त्याची मुले मी पाहिलेली. लख्ख गोरी, उंच, रेखीव. त्यांच्यावरून स्वतः



अनुक्रमणिका

तो किती देखणा असेल, ह्याची कल्पना येई. तो माझ्या आदराचा विषय होता, का? कारण काही नाही. मला बंडखोर माणसे आवडतात. आयुष्यात मला बंड करता आले नाही, म्हणून. ती हौस माझ्या कादंबऱ्यांत भागवून घेतली! माझ्या बहुतेक कादंबऱ्यांचे नायक बंडखोर आहेत. दुसराही ब्राह्मणच. पहिल्याइतका नाही; पण गोरापान, देखणा. तो एका ख्रिश्चन बाईच्या प्रेमात पडला. माझ्या लहानपणाची गोष्ट. त्या काळात प्रेमात पडणे हाच पराक्रम. त्यातही परधर्मी स्त्रीच्या? म्हणजे पराक्रमाने आकाशच गाठले. एवढेच करून थांबला नाही. तिच्याबरोबर राजरोस राही. त्या बाईला पाहावेसे फार वाटे. आमच्या गावाला जाताना त्या गावातून जावे लागे. तिचे घरही एकाने मला दाखवले. केव्हा तरी पडवीत बसलेली आढळेल, अशी आशा करीत होतो! पण नाही बसली. आता हा ब्राह्मण देखणा. त्याच्या रूपाला ती भाळली आणि हे मेतकूट जमले की काय, ते मला पाहायचे होते; पण तो ब्राह्मण माझ्या आदराचा विषय झाला' एवढे खरे. का? बंडखोर म्हणून. तिसरा मात्र मी लहानपणापासून पाहिलेला. योगायोगाने आम्ही उत्तर आयुष्यात घनिष्ट मित्र झालो. हा मित्र चांगला पोर्ट ट्रस्टमध्ये कारकून (त्या वेळची क्लास वन गॅझेटेड पोस्ट!) त्याने अचानक नोकरी सोडली. कमी पगारावर एका उद्योगपतीचा पर्सनल असिस्टंट झाला. ओळखी करून घेण्यास, मित्र जोडण्यात पटाईत. पुढे एका व्यापाऱ्याचा गाईड म्हणून युरोपला गेला. ह्याने स्वतः युरोप पाहिलेला नाही. व्यापाऱ्याला काय गाईड केलेन् देव जाणे. पण हाडाचा कर्तबगार. परत येताना हर्डफर्ड डिझेल एंजीनची सोल एजन्सी घेऊन आला! पाण्यासारखा पैसा मिळवलान्. पाकिस्तानचे दिवस. कलकत्ता - आसाम वाहतुकीचे साधन नव्हते. ह्याने एअर लिफ्ट सर्व्हिसेस नावाची कंपनी काढलीन्! तिथेही पाण्यासारखा पैसा! जिगर तरी केवढी! मी ऐकत होतो. भेट नव्हती; पण मला त्याचा कमालीचा अभिमान वाटे. ह्याचा शेवट व्हायचा तोच झाला. काही कारणाने एव्हिएशन फ्युएल बंद झाले. पदरात तीन विमाने, म्हणजे कचऱ्याच्या भावाने विकावी लागली. त्यात आणखी बँकेच्या अकौंटंटने टांग मारली. आठ लाखांचा फ्रॉड. इन्सॉल्व्हन्सी. तुरुंग. नादारी असताना सुद्धा त्याने पैन् पै कर्ज फेडले. शहाण्यांनी मूर्खात काढले. तो म्हणाला, ' मी लफंग्या नाही. नादारीत कर्ज फेडायला नको, हा व्यवहार. नैतिकमूल्यांचं जग वेगळं - मी रहिवासी तेथला.'

पुन्हा उसळी मारून पूर्वीपेक्षा वर गेला. अलीकडेच माझ्या ह्या शूर मित्राचे निधन झाले. तो, मी जवळ कसे आलो? क्रिएटिव्ह आर्टिस्टविषयी त्याला फार आदर.. आपुलकी.

कादंबरीकार व्यक्तिरेखा 'निर्माण' करतो, म्हणजे नेमके काय करतो, ह्याची ह्या तीन उदाहरणांवरून वाचकाला कल्पना येईल. 'बापू' आणि वरील तीन व्यक्ती ह्यांमध्ये काय साम्य आहे? जगण्यातील बेबंदपणा. अन्यथा चौघांच्या जगण्याचे तपशील पूर्णतः भिन्न. प्रत्यक्षातील व्यक्ती प्रेरणा देण्यापुरतीच असते, असे मी म्हणतो, त्याचा खुलासा आता व्हावा. वर वर पाहता साम्य काही नाही; पण कळ फिरवणाऱ्या व्यक्ती मात्र त्या तीन. ह्याला अनेक कारणे असतात. मुख्य म्हणजे, 'बेरीज - वजाबाकी' म्हणजे तेवढेच नसते. लेखकाला माणूस सुचतो किंवा तो निर्माण करतो, तेव्हा शिल्पकारासारखी मूर्ती घडत नाही. त्याची स्वतःची कल्पना शक्ती असते. ती काही तरी वेगळेच सुचवीत असते - ज्याचा 'तीन' व्यक्तींशी कसलाही संबंध नसतो. फक्त ती एक व्यक्ती - अन्य संदर्भ नसलेली - लेखक कधीच निर्माण करीत नाही. ज्या जगात, माणसांत तो जगत असतो, ते जग,

माणसेही अंधूक, पण दिसतात. खरे म्हणजे, निर्मितीची ही प्रक्रिया एका मर्यादेनंतर गहन होत जाते. कोणावर कशाचा काय परिणाम झाला, नायकाच्या व्यक्तिरेखेला कोणती नवी परिमाणे मिळाली, हे कोष्टक मांडून सांगता येत नाही. सगळे घटक - व्यक्ती, स्थळ, भूगोल, सामाजिक स्थिती एकमेकांवर परिणाम करीत असतात. स्वतः लेखक त्या जगण्यात सामील झालेला असतो - एक निरीक्षक म्हणून. नियंता म्हणूनही म्हणता येईल; कारण माणसे निर्माण केल्यावर त्याचे स्वातंत्र्य संपते; पण त्याच्या स्वभावाप्रमाणे जगताहेत ना, ह्यावर त्याची करडी नजर असावीच लागते. त्यामुळे त्याला कार्यकारणभाव आधी ठरवताच येत नाही. विश्वामित्राप्रमाणे त्यानेही एक वेगळी सृष्टी निर्माण केलेली असते. 'बापू मला दिसला' असे विधान करता येत नाही. कारण एकदम 'समग्र' तो दिसत नाही. समाजात, नात्याच्या माणसांत, मित्रांत, गारंबीत तो जगत असतो. सगळ्यांचे हितसंबंध एकमेकांत गुंतलेले असतात. लेखकाच्या कल्पनेतही नसलेली व्यक्ती अचानक उगवते आणि आधीचे सारे आडाखे उधळून लावते : असे अनेक वेळा होते. नायकाचा स्वभाव मूलतः तोच राहिला, तरी त्याला वेगळी परिणामे चिकटतात. तो 'बदलतो'. आपण जगतो, त्या आयुष्याचा विचार केला, तर आपल्यालाही आयुष्यात असे घडत असते, हे लक्षात येईल.

उदाहरणच घ्यायचे, तर 'राधा'. रावजीची बायको 'अशी 'नसतीच, तर? बापू तिच्यात गुंतणे शक्यच नव्हते. त्याहीपेक्षा अजब म्हणजे, ते विशिष्ट जगच निर्मितीच्या उद्योगात भाग घेऊ लागते. माणसे, घटना सुचवते. कादंबरीची 'जिवंत वाढ होत असेल', तर असे होणे जरूर शक्य असते. माझा तो अनुभव आहे. राधाच पाहा ना.

एखादी स्त्री माणसाच्या आयुष्यात येणे आणि त्याचे आयुष्य पार उलटेपालटे करणे, त्याचा संसार उद्ध्वस्त करणे, त्याच्या स्वभावाला चांगले वळण देणे, त्याला व्यसनी बनवणे - काहीही होऊ शकते, हे आपणां सर्वांच्याच पाहण्यात असते. आप्पा दामल्यांचे आयुष्य एक स्त्रीच उद्ध्वस्त करते. बापूच्या आयुष्यातही एक स्त्री येणार, त्याला सुकाणू देणार, असे मला वाटत होते. कोण? ते माहित नव्हते. मी शोधीत होतो. गारंबीसारख्या जगात अशी स्त्री आणणे सोपे नव्हते. शरीराची तेवढी गरज भागवणारी स्त्री मला अर्थात नको होती. ती येईल, त्यात मुद्दामपणा असता कामा नाही, हे कळत होते. कशी येईल? तेवढेच कळत नव्हते. बापू रावजीच्या हॉटेलात आल्यावर ही स्त्री रावजीची बायको असणार, हे कळेल. ती कशी असेल? कळत नव्हते. रावजीच्या बायकोची अनेक प्रकारांनी कल्पना केली. लिहिलेही. तिचे पहिले नाव विठी होते. पटेना. कागद फाडून टाकले आणि प्रत्यक्षात आली ती स्वप्नातही नसलेल्या व्यक्तीने रंगमंचावर अवतीर्ण व्हावे, तशी! त्यावेळचा प्रसंग असा आहे:

गंमत म्हणून बापूने रावजीची चिलीम हातात घेतली. झुरका मारला. जोरात ठसका लागला - दारात कोणी तरी उभे आहे असे त्याला वाटले. त्याने वर पाहिले. मूर्तिमंत लावण्य तेथे उभे होते. ती खिन्न हसत होती. लावण्य हसू लागले की, त्यात काय जादू असते, ह्याचा साक्षात्कार बापूला प्रथमच होत होता.

ती रावजीची बायको होती.

'राधा'

ह्या ठिकाणी प्रकरण संपले. दुसरे प्रकरण लिहू लागलो. संवाद कसे येत होते, त्याला वळणे कशी मिळत होती, काही कळत नव्हते. कोणती तरी अज्ञात शक्ती माझ्या अंगात संचारली होती.

कलावंताच्या संदर्भात 'समाधी'चा उल्लेख मागे केला. पूर्ण समाधी लेखक क्वचित केव्हा अनुभवतो. मला तर आठवावेच लागेल: त्या वेळच्या आनंदाचे, सार्थकतेचे वर्णनही करता येणार नाही. मी तर त्याची तुलना स्त्री - पुरुष समागमाच्या वेळच्या समाधीशी करतो.

राधा कोठून आली, कशी आली, ते पहिल्या भेटीचे प्रकरण कसे आले - मला काही माहीत नाही. राधा मला आणखी एक धक्का देणार होती. प्रत्यक्ष हाडामांसाची, तसलेच आयुष्य जगणारी राधा प्रत्यक्षात होती! माझे मित्र अमर शेख ह्यांच्या शेजारी जेकब सर्कलला.

अमरने बापू-कथा तिला संपूर्ण ऐकवली.

'ही तर आपलीच कथा' ह्याविषयी तिची खात्री झाली; पण शेवटी खिन्न स्वरात म्हणाली,

'अमरभाई, राधाच्या हाटेलात बापू होता, माझ्याकडे नाही.'

आपल्या वेदनेला वाचा देणारा हा माणूस कोण?

अमर शेखला ती सारखी सांगे,

'तुझ्या मित्राला बोलाव. त्याला पाहायचं आहे.'

शेवटी मी गेलो.

ती राजपूत रमणी खरोखरच 'राधा' होती.

माझ्याकडे पाहून प्रसन्न, किंचित हसली.

'गारंबीचा बापू' ला एवढी मोलाची दाद कोणीही दिलेली नाही.

असे कधी कधी होते. जगात इतकी माणसे असतात; पण एकासारखा दुसरा कधी नसतो. अपवाद जुळ्याचा. वास्तविक 'वेगळे चेहरे' हा एक चमत्कार, तो आपल्या लक्षातही येत नाही. एकमेकांपासून शेकडो मैल दूर असलेले, काही संबंध नसलेले दोन चेहरे हुबेहूब सारखे आढळतात. तेव्हा आपल्याला तो चमत्कार वाटतो. तो बेरीज - वजाबाकीचा (परम्युटेशन कॉंबिनेशन) एक योग आहे. एका छोट्या प्रदेशावर लिहीत होतो, म्हणून की काय, बापूच्या वेळी असे फार योग आले. आण्णा खोत, विठोबा नावासकट त्या गावात होऊन गेले! त्यातही आश्चर्य नाही. मी ते पाहिले असतील आणि विसरलो असेन. पंढरपूर प्रकरण असेच. ते गावात प्रत्यक्ष घडले होते - सत्तर - ऐंशी वर्षांपूर्वी, त्या गावातील लोक काही अजब करीत होते. ह्या गावात कधी न येणारा माणूस (कित्येकांनी मला पाहिलेही नव्हते) ह्याला कसे माहीत? मीही तेच अजब करीत होते, मी इतका नेमका तर्क केला कसा? माझी आई त्या गावची. तिला विचारले,

'हे खरे का?'

तिची पहिली प्रतिक्रिया :

'तुला, बाबा, कसे कळले?'

'म्हणजे असे घडले होते. बाईला पंढरपूरला नेऊन सोडणाऱ्यांतील एकाचे नावही तिने घेतले. तो असताना ह्या कृष्णाभाऊला मी पाहिले होते. त्यावेळी मी दहा वर्षांचा होतो.

कादंबरी लिहिताना कादंबरीकाराची कल्पनाशक्ती, प्रतिभा सतत काम करीत असते. विशिष्ट

प्रदेशात काय घडणे शक्य आहे, ह्याचे तर्क तो करीत असतो. प्रयत्नाने मग कधी कधी नेमका वस्तुस्थितीवर हात पडतो. 'ऑक्टोपस'च्या वेळीही असा योगायोग आला, पण वारंवार घडणारा नव्हे. कुठे तरी, केव्हा तरी, कोणी तरी, कोणाकडे तरी बोलतो. लेखक ऐकतो. वेळ आली की, अलगद पुढे येते. अलिकडील एक घटना. माझ्या मित्राला 'लेखकाचे घर' ह्या विषयावर संपादकाने लेख मागितला. साठ - सत्तर वर्षांचा माझा घनिष्ट मित्र. त्याने कळवले, 'त्या दृष्टीने पेंडशांचे घर मी पाहिलेले नाही. मला कळताच मित्राला पत्र लिहिले, 'तुझ्यात ललित लेखक नाही. ह्याचा पुरावा दिलास तर अधिक पाहतो. कॉम्प्युटरसारखे जे जे पाहील, ऐकेल तेच डोक्यात जाऊन बसते. गरज पडली, की पुढे येते. खरे तर, लेखक कशाला, सर्वांचाच अनुभव असतो. माझे आत्मचरित्र प्रसिद्ध झाले. वय दहा. मी घोंडोपंत बाळ नामक शिक्षकांकडे शिकायला जात होतो. माझ्याविषयी 'एक उनाड विद्यार्थी' असे त्यांचे मत होते. दुर्दैवाने ते खरे होते. अचानक एक दिवस मला एका गृहस्थांनी विहिरीवर नेले. प्रश्न केले : तुझी कोणी बहीण आजारी होती का? आंघोळीची तयारी आणि हा प्रश्न. उरात धडकी भरली. कुठली बहीण मेली? त्यांनाही माहीत नव्हते. त्यांनी विहिरीतून कळशी भरून काढली. माझ्या डोक्यावर ओतली. बैलगाडीत बसलो. न दोन तासांचा प्रवास. आजही मला तो प्रवास त्या वेळच्या विवंचनेसह आठवतो. त्या गोष्टीला आता सत्तर वर्षे होऊन गेली. त्यानंतर सुप्रीम कोर्टाचे जस्टिस बी. जी. बाळ मला भेटले. त्यांनी विचारले, 'तुमच्या डोक्यावर कळशी कोणी ओतली?' मी म्हटले, तुम्हीच. इतक्या वरिष्ठ हुद्द्यावरील माणसाचे नाव ह्या संदर्भात चरित्रात कशाला द्या, असा मी विचार केला. हे जस्टिस बाळ घोंडोपंत बाळांचे चिरंजीव. त्यावेळी कॉलेजात होते. सुटीत घरी आलेले. काही संबंध नसताना, लेखनाशी संबंध नसलेल्या माणसाच्या डोक्यातही सारे जाऊन बसते. डोके हा एक चमत्कार आहे.

मग लेखक आणि इतर ह्यांत फरक काय? झपाटून जाणे आणि पाहिलेल्या माणसांची बेरीज - वजाबाकी करता येणे. इतरही पुष्कळ लागते. ह्या अटी प्रथम क्रमांकाच्या.

हे घोंडोपंत बाळ पुढे - म्हणजे साठ वर्षांनी 'तुंबाडचे खोत'मध्ये देहाडराय मास्तर म्हणून आले.

सांगायचे एवढेच की, लेखक सदैव जागृत असतो. तो त्याच्या मनाचा धर्मच असतो. स्वतःला सांगून काही होत नाही.

**व्यक्तिरेखेचे मर्मस्थान**

व्यक्तिरेखा निर्माण करणाऱ्या संदर्भात मी 'बेरीज - वजाबाकी' असे म्हटले. वस्तुस्थितीचे ते फार सुलभीकरण झाले. बेरीज - वजाबाकी म्हणजे मी नेमके काय केले? बेदरकार आयुष्य ते जगले; पण माणसामध्ये एवढे असले की, पुरे होते का? हे त्याचे बाह्यरूप. माणूस खरा असतो, तो त्याच्या 'मना'मध्ये. ह्या. व्यक्तीचे मन लेखकाला दिसतच नाही. कोणालाच दिसत नाही. अपवाद प्रतिभावंतांचा. त्यांच्याकडे इतरांपेक्षा वेगळे काय असते? तिसरा डोळा. ह्या डोळ्याला गडद अंधारातील वस्तूसुद्धा दिसते. तिथेच कादंबरीकाराचे - खरे म्हणजे कोणाही कलावंताचे - सामर्थ्य असते. ते मोठे बलस्थान. हा डोळा किती खोलवर 'मन' पाहून शकतो, त्यावर कादंबरीची श्रेणी ठरत असते. हे 'मन' बोलण्या वागण्यांतून नेहमी प्रगट होत असते. सामान्यांना ते टिपता येत नाही. तिसरा डोळा नेमका त्यावर झडप घालतो आणि मनासंबंधीचे निष्कर्ष काढीत असतो. हे मन म्हणजे

तळ नसलेला डोह असतो. कलावंताची धडपड 'ह्या नसलेल्या' तळांचा शोध घेत असते. महाभारतापासून हा उद्योग चालू अहो. आजही आहे. कलावंताला पुरून उरणारें हे आव्हान. माणसाविषयी काही निर्णायक बोलता येत नाही, ते ह्या 'मना'मुळे. 'असावा', 'नसावा' हीच परिभाषा वापरावी लागते. हा शोध घेताना कादंबरीकाराला प्रथम स्वतः नागवे व्हावे लागते. कोणताही पूर्वग्रह त्याला बाळगता येत नाही. तरच खोल - अधिक खोल - त्याहून असा प्रवास त्याला करता येतो. अश्लीलता आणि प्रचलित नीतिविषयक कल्पना त्याला बाळगता येत नाहीत. नीतीच्या कल्पना सारख्या बदलत राहतात. एक साधे उदाहरण - पंडू हा तृतीय पुरुषी होता. तरी कुंतीला मुलगे झाले कसे? सरळ उत्तर - परपुरुषांशी संबंध ठेवून. धर्म हा यमदेवाचा मुलगा. इतर चार पांडवांची तीच कथा. समाजाला हे माहित असून पांडवांच्या प्रतिष्ठेला किंचितही उपसर्ग पोहोचला नाही. त्यांच्या 'अनौरसपणा'ची उठाठेव फक्त दुर्योधनाने केली. तीसुद्धा पांडव राज्यावर हक्क सांगू लागले, तेव्हा. ह्याच कुंतीने लग्नाअगोदर सूर्यदेव नावाच्या गृहस्थाशी संबंध ठेवला. सरळ सरळ कामेच्छेला बळी पडून - तो तिला टाकून द्यावा लागला. एका मूल होत नसलेल्या सूतजातीय बाईला देऊन टाकला! अमानुष? असेल - आजच्या परिभाषेत. आज अशा 'कुंती'ची कल्पना करा, म्हणजे लिंगविषयक या जीवनाच्या अन्य क्षेत्रांत नीतिविषयक कल्पना कशा बदलत असतात, ह्याची कल्पना येईल. कामशास्त्राविषयी चिंतन करून 'कामसूत्र' नावाचा ग्रंथ रचणारा माणूस त्या काळात समाजाने मान्य केला. आजच्या काळात र. धों. कर्व्यांना नाक मुरडले. खजुराहोची कामशिल्पे - ती सुद्धा मंदिरावर पाहताना त्या काळात लोकांना काही वाटले नाही. लिंगपूजा म्हणजे काय? ती तर आपण आजही करतो. स्त्रिया सुद्धा शंकराच्या लिंगाला भक्तिभावाने हात जोडतात! अश्लील, ओंगळ, नीतिविषयक कल्पना कशा बदलत असतात, ते लक्षात येईल. सच्च्या कलावंताने असल्या बदलणाऱ्या कल्पनांना कधीही थारा देता कामा नाही. शेवटी कलानिर्मिती म्हणजे काय? सत्याचा शोध. हा शोध परिसराच्या शोधासारखा आहे. पूर्ण सत्य हाती कधीच लागत नाही; पण त्या दिशेने जायचे, तर तिसऱ्या डोळ्यावर कोणत्याही रंगाचा चष्मा असता कामा नये.

'बापू' त्या तीन व्यक्तींवरून सुचला. एवढाच त्याच्या निर्मितीशी त्यांचा संबंध; पण बापूचे मन? कादंबरीकाराची खरी कसोटी हा शोध घेताना लागते. एकटा बापू बेटासारखा उगवत नाही. तो आकार घेत असतानाच त्याचे विविध संदर्भही मला दिसत असतात. त्यांनाही बापूबरोबर आकार मिळत असतो आणि बापूचे मन शोधताना ह्या संदर्भांची मदत अटळपणे होत असते. माझ्यापुढे पहिला प्रश्न आला - बापू त्या सनातनी जगात मुसलमानाकडे चहा पाव घेण्याइतका बंडखोर का झाला? त्या 'तीन व्यक्ती' मला इथे उपयोगी पडणार नव्हत्या. जगण्याचे त्यांचे संदर्भ वेगळे, बापूचे वेगळे, पिंडधर्म' असे उत्तर देता येईल; पण त्याला जाग आणणारी परिस्थिती तर हवी. म्हणून संदर्भांचे महत्त्व. मला पहिलाच प्रश्न पडला. विठोबा तृतीयपुरुषी आहे, हे सगळ्या गारंबीला माहीत आहे, बापूला माहीत नाही असे कसे होईल? तशात आईचे अण्णा खोताकडील नाते. हे सगळ्या गावाप्रमाणेच बापूलाही माहीत आहे. गाव खोताच्या विरोधात कधी उभा राहत नाही; बापू राहतो. का? त्याचा पिंड तसा, म्हणून? मला तसे वाटेना. 'बापूचा पिंड' हा फार ढोबळ शब्द. तो नुसता खोताच्याच विरोधात नाही. तो जातिभेदच मानीत नाही. 'मला सगळे सारखे' असे म्हणतो. पण खोताच्या

विरोधाला, तिरस्काराला तोड नाही. एका बलाढ्य शक्तीशीच एका गरिवाने दंड थोपटले आहेत. ह्या तिरस्काराचे समर्थन 'पिंड' करू शकत नाही. मग काय. माझे उत्तर होते : 'बापूच्या मनात दडलेले संशयाचे भूत, हाच माणूस आपला बाप असावा.' त्याच्याविषयीच्या जहरी भावना कादंबरीच्या शेवटी बापू बोलून दाखवतो. आयुष्यभर ते शल्य त्याला सलत असते - कोणाकडेही वाच्यता करता येणार नाही, असे. खोताविषयीच्या तिरस्काराचे मूळ इथे आहे.

असे खूप चिंतन केल्यानंतर मला दिसले. एखादा मानसशास्त्रज्ञ ते चुकीचे आहे, असे म्हणेल, किंवा पुरेसे खोल नाही असे म्हणेल. एखादा डोस्टोव्हस्की इथेच इतरांना मागे टाकतो. 'मन' हा तळ नसलेला डोह. 'किती खोल' ह्याला मर्यादा नाही. पण ते साध्य होते चिंतनाने. निर्मितीत चिंतनाला मी पहिल्या क्रमांकाचे महत्त्व देतो, ते ह्याकरता. मनाचे हे गूढ अंग कळायला चिंतनाशिवाय दुसरा मार्गच नाही. मनाचा ठाव घेण्याचा तो एकमेव मार्ग. कादंबरीत 'बापू' हीच अवघड व्यक्तिरेखा इतरांची ओळख व्हायला चिंतन लागतेच; पण तुलनेने ते सोपे आहे. भूतवाडची मावशी अनेक वाचकांना आवडते. बापूच्या जन्माचे रहस्य यशोदेनंतर फक्त तिलाच माहीत आहे. नेमकी तिलाच बापूविषयी अपार सहानुभूती वाटते, ती ह्याचमुळे.

व्यक्तिरेखानिर्मितीत सर्वात अवघड भाग ह्या मनाचा ठाव घेणे. मुळात अस्तित्वात नसलेल्याचा ठाव घेणे. शेवटी लेखक ह्या शोधात किती खोल जातो, ह्यावरच कादंबरीचे लहानमोठेपण अवलंबून राहते. टॉलस्टॉय, डोस्टोव्हस्की वाचताना ह्याचा प्रत्यय येतो. नजर ठरू नये, भोवळ यावी, एवढा खोल ठाव ते घेतात. कादंबरीकार होऊ इच्छिणाऱ्या प्रत्येकाने जागतिक कादंबरीतील असली गौरीशंकर - शिखरे वाचलीच पाहिजेत. ह्यामुळे आपणही तेवढे मोठे होऊ असे नाही. अफाट वाचन असलेले अनेक असतात. त्यांच्या नावावर लेखन पूज्य असते. 'वाचन आणि लेखन' हा स्वतंत्र प्रकरणाचा विषय आहे. एकच उदाहरण - मनोविश्लेषणशास्त्राचे फ्रॉईडने संशोधन केले. त्यातील प्रसंगाकरिता उदाहरणे दिली, ती त्याच्या आधी लिहिल्या गेलेल्या डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यातील. आपल्याला फायदा एवढाच की, वाचकांनी, समीक्षकांनी आपल्या कादंबरीला कितीही डोक्यावर घेतले, तरी आपल्या डोक्यात हवा जात नाही. आपल्याला दिसत असतो ध्रुवतारा.

**नजर निर्लेप हवी**

'गारंबीचा बापू' लिहिली, तेव्हा माझ्या एका चिकित्सक मित्राने त्यातील एका दोषावर बोट ठेवून कडाडून हल्ला केला. मी 'गारंबीचा बापू' दुरुस्त केली, असे म्हणण्याचा उद्धटपणा त्याने केला नाही. तो एका समीक्षकाने केला आणि सर्वांना सांगत सुटला. त्याने फक्त 'अभिप्राय' दिला. माझ्या दोन मित्रांनीही तोच अभिप्राय दिला. त्याची चर्चा इथे करीत नाही. त्याहून गंभीर आक्षेप मित्राने घेतला ( आणि मी मानला नाही) त्याची चर्चा करणार आहे, कारण आजही तो आक्षेप डोक्यातून जात नाही. आपण तो मानला नाही, हे चूकी बरोबर ह्याचा निर्णय करता येत नाही.

राधाला व्याघ्रेश्वर दाखवण्याकरिता बापू एका पहाटे व्याघ्रेश्वराकडे निघाला आहे. वाटेत मठ लागतो. राधा म्हणते, 'आपा दामले समजतात. जगाला ते आनंद देतात. नाक धरून ध्यानस्थ बसणारे बागुलबुवा काय करतात?'

ते उद्गार बापूच्या डोक्यावरून जातात.

(लिहिताना बापू-राधाच्या संभाव्य संघर्षाची कल्पना मला आली, 'गारंबीची राधा'च्या ह्या कादंबरीचा हा विषय आहे, असे मनात आले, ते इथेच.)

दोघे व्याघ्रेश्वराचे दर्शन घेतात आणि बोंडलीच्या कट्ट्यावर बसतात. जरा वेळाने हाटेलात परत येतात.

नंतर बापू म्हणतो,

'बोंडलीच्या कट्ट्यावर बसलो होतो, तेव्हा एक वाईट विचार आला.'

'कोणता?'

'तुझा मुका घ्यावासा वाटला- '

वगैरे.

मित्र इथे थबकला. त्याने माझ्याकडे रोखून पाहिले आणि रांगड्या भाषेत विचारले, 'काय रे, तुझा बापू पावणेआठ होता का? 'घ्यावासा वाटला' ही भाषा काय? पहाटेचा काळोख, एकान्त, दोन प्रणयासक्त स्त्रीपुरुष. तिथे नपुंसकासारखाच नुसता बसतो आणि हाटेलात आल्यावर वाटलं होतं म्हणतो..'

'विवेक नावाची काही वस्तू असते, हे विसरतोस..

'खड्ड्यात घाल तो विवेक. अशा प्रसंगी पहिलं काही होत असेल, तर माणूस विवेकभ्रष्ट होतो. तो 'तो' राहातच नाही. अरे, मुकाच काय, त्याचा पराशर ऋषी व्हायला पाहिजे. फार तर लोक म्हणाले असते, 'रावजीला मुलगा झाला' बापूची सोय केवढी! आगीत शिरून होरपळ नाही. बाप तयार नाही, नाही. हे तू बदललं पाहिजेस. नपेक्षा तुला भेकड म्हणेन. तुम्हाला टांग मारून व्यासमुनी पुढे जातात, ते अशा प्रसंगी..'

'माझं ऐकून घेशील का? गारंबीच्या बायकांकडे बापूनं कधीही वाकड्या नजरेनं पाहिलं नाही, असं आधीच म्हटलं आहे. त्याच्या आयुष्यातील ते एक मूल्य आहे. असं म्हण ना, मूल्यं जगणारी माणसंच जगात नसतात.'

'वेड घेऊन पेडगावला जातो आहेस. तुझ्या प्रमेयाला राधानंच उत्तर दिलं आहे - उपाशी पोटाने चोरून खावं, की नाही, हा प्रश्नच अमानुष आहे. अस्सल प्रणय सर्वप्रथम निर्लज्ज असतो.

'असं! म्हणजे तुझं म्हणणं खेडेगावातील आणि मुंबईतील टॉयफॉईड वेगळे असतात'.

मी जिवंत केला, तो प्रसंग बरोबर आहे, की मित्र म्हणाला, ते खरे, ह्याचा निर्णय मला अजूनही करता आलेला नाही. 'प्रणया'च्या वाटेलाही न जाता मी कादंबऱ्या लिहीन आणि वाचकांना त्या आवडतील, अशी जणू प्रतिज्ञा केली होती. तिचे स्वरूप प्रतिक्रियात्मक होते; पण ते खरे करून दाखवले. आज मनात येते निषिद्ध - स्वागतार्ह असे कलेच्या संदर्भात काही असते का? माझे निःसंदिग्ध उत्तर आहेः नसते. 'बे दुणे चार' चा पाढा इथे लागूच शकत नाही. शेवटी 'कादंबरी' हा माणसाच्या मनाचा शोध आणि ते कोणत्याही कोष्टकात बसत नाही, हाच खरा नियम.

'प्रणया'बाबतीत फडक्यांनी एक टोक गाठले, तर मी दुसरे! आशयाची गरज असतानाही प्रणयाकडे पाठ फिरवली. आज मनात येते, बापू-राधा ह्यांच्या प्रणयाने शारीरिक पातळी ओलांडली. बापूचे हे यश कादंबरीकार म्हणून मला महत्त्वाचे वाटते; पण मार्गात 'शरीर' लागते, त्याचे काय?



अनुक्रमणिका

त्याची मी दखल घेऊ नये, हा काय प्रकार? आज मला कादंबरीचे हे वैगुण्य वाटते. कट्ट्यावरील मुक्याचे सोडले, तरी मनाने दोघे विवाहित झाल्यावरही दोघे कधी शृंगाराच्या वाट्याला जात नाहीत. हे कसे शक्य आहे? पण 'प्रणया 'विरुद्धचे बंड माझ्या अंगात भिनले होते. ह्याला कादंबरीकाराची 'समग्र 'दृष्टी म्हणत नाहीत; पुढे मी 'निवळलो' असावा! 'आकान्त 'मध्ये अगदी 'फडके' वळणाचा प्रणय आला आहे. मला 'प्रणय' जिवंत करता येतो, हे मी त्या ठिकाणी दाखवले आहे!

माणसाच्या परस्परसंबंधातून निर्माण होणारा आकार, म्हणजे कादंबरी; पण म्हणून क्रम बदलणारच नाही, असे विधान करता येणार नाही. माझी पहिलीच कादंबरी एका प्रक्षोभातून निर्माण झाली! बापू सुद्धी 'तीन व्यक्तींनी सुचवला, पण गारंबी, तेथील सनातनी जग केव्हा आले, मला कळलेच नाही. 'हद्दपार 'मध्ये तेवढे मी फक्त 'राजेमास्तर 'च पहात होतो. पुन्हा 'हत्या' लिहायला एक प्रक्षोभक वृत्त कारण झाले. महत्त्वाचे एवढेच, 'कादंबरी' हे जिवंत जग असते. जगण्याचे नियम घेऊन येते. असभ्य, ओंगळ, शिवीगाळ म्हणून कादंबरीकाराला ती डावलता येण्याचा नैतिक अधिकार नसावेत, तुकाराम ह्याबाबतीत कादंबरीकाराने गुरुस्थानी मानावेत, इतके हिंमतबाज आहेत, सचोटीचे आहेत.

निमित्त काही असो, शोध 'माणसां 'चा हवा. हे सूत्र कादंबरीकाराने विसरता कामा नाही. मग माणसे 'माणसे 'च राहतात. ज्या आशयामुळे त्याला सुचतात, त्याला ती जुमानत नाहीत. कादंबरीला ती जेथे जायला हवी असतात, तिथे जायलाच नकार देतात. कादंबरीकाराच्या चिंतनामुळे त्यांची नैसर्गिक वाढ होत राहते. लेखकाला अडचणीत टाकतात. कादंबरीकाराला कसली तडजोड करता येत नाही. माणसांतून निष्पन्न होईल, त्याच आशयाला शरण जावे लागते. कोठे जायला, म्हणून प्रस्थान ठेवले आणि कोठे पोहोचलो, असा पेच त्याला पडतो. एका अर्थी त्याच्या चिंतनाच्या अस्सलपणाला ही पावती असते.

**वास्तवाचे भान**

असा प्रकार 'हत्या' कादंबरी लिहिताना मी अनुभवला. 'गारंबीचा बापू 'चा शेवटचा भाग होता. प्रेसकॉपी करीत होते. एकीकडे हलके वाटत होते. 'बापू' म्हणजे 'बापूकाका सामल' ह्या चाळीस सालात लिहिलेल्या व्यक्तिचित्रापासून सुरू झालेले बारा वर्षांचे पर्व!

भाऊबीजेचा दिवस. सकाळ. बापूंच्या आईला घेऊन व्याघ्रेश्वराहून दिनकर भट आलेला. पुढे कादंबरीतील सर्वात मोठा समर प्रसंग. तो कितपत जिवंत होईल, ह्याची मनात एक संदिग्ध विवंचना. खरे म्हणजे, बापूच्या मनात घर करून राहिलेली ती वस्तुस्थिती; पण केवळ तर्कानं गाठलेली. आता त्याची आईच हे पितृत्वाचे हे जहरी सत्य त्याला सांगणार होती. तेथे पोहोचायला मी उत्सुक होतो. मनाने मी बापूच्या बंगल्यावरच होतो. राधा - बापू सुखासमाधानाच्या गोष्टी बोलत होते..

अशा आणीबाणीच्या वेळी तेवढीच भयंकर असलेली बातमी घेऊन भाऊ आला. त्याने सुद्धा त्या प्रसंगाची जवळ जवळ 'कादंबरी 'च केली. त्याचा चेहरा भेदरलेला होता. थबकून माझ्यापुढे उभा राहिला.

'तुला बाळ खांडेकर माहीत आहे?'

'नाही'

खरा तर त्याच्या व्यत्ययाने वैतागलो होतो. ज्वालामुखीच्या तोंडाशी वापू आला असताना भाऊ आला होता; पण त्याला काही तरी विशेष सांगायचे असावे, असे वाटले.

मी भडकलो नाही. शांतपणे त्याला विचारले.

'आपल्याकडे येत असे. आमच्या शाखेतही पूर्वी होता. एकदा तुझी त्याची ओळख सुद्धा करून दिली होती. ते 'हे' ना, त्यांचा मोठा भाऊ.'

'हे' ना मी चांगला ओळखत होतो. हा भाऊ व्ही. जे. टी. आय्.ला शेवटच्या वर्षाला आहे, असेही एकदा ऐकले होते.

भाऊ म्हणाला,

'तोच..'

'त्याचे काय?'

'त्याचा जरा वेळापूर्वी प्लाझा सिनेमाजवळ खून झाला.'

ताडकन मी खुर्चीतून उठलो.

'काय म्हणालास ... खून? वहिणीकडे जात असताना? कोणी केला?'

'तो स्वत: गँगचा दादा. ह्या लोकांचे असेच खून पडतात. तेही तसेच करतात. खांडेकर प्यालेला होता. कोणाशी तरी काही तरी बाचाबाची झाली. बाळने सुरा काढला. वेळीच हल्ला केला नाही, तर आपण खतम होऊ, असा विचार करून समोरच्या माणसाने बाळला टांग मारली. झिंगलेल्या अवस्थेत खाली कोलमडायला तेवढे निमित्त पुरे होते. बाळच्या हातातील सुराही सुटला. तोच सुरा चपळाईने उचलून समोरचा माणूस बाळच्या पोटावर बसला आणि भोपळ्यात सुरा खुपसावा, तसे वार त्या माणसाने केले. भांडण कसे उद्भवले? बाळच्या गँगमधील एकाचे त्या माणसाने मानगूट पकडले होते. सामान्य माणसाप्रमाणेच गुंडांचीही काही नीतितत्त्वे असतातच. 'आपल्या' माणसावर हल्ला होताच बाळला मधे पडावेच लागले आणि भर दुपारी गर्दीत काय चालले आहे, ते कळायच्या आधीच बाळ गतप्राण झाला. सगळ्या मवाली जगात डेअर-डेव्हिल म्हणून प्रसिद्ध असलेला, त्याच्या नावावर चार-पाच खून असलेला, पोलिसांचे वॉरंट असलेला, भूमिगत बाळ असा गेला. त्याच्या अंत्ययात्रेला हजारेक लोक होते. अनेक पांढरपेशे. शाखांचे स्वयंसेवक. काही दिवस दादरकरांना 'बाळ'शिवाय दुसरा विषय नव्हता. तो खुनी सुद्धा ऑफिसात काम करणारा, सुशिक्षित (त्यात भेकडपणा आलाच.) त्याने खून केला, तो स्वत:चा होऊ नये, म्हणून! पण रातोरात त्याला घर सोडावे लागले. न पेक्षा दुसऱ्याच दिवशी बाळच्या गँगने त्याचा मुडदा पाडला असता. आपल्या 'सेनापती'च्या खुन्याचा बळी न घेणे हे त्यांच्या नीतीला सोडून झाले असते.

आपला खरा बाप कोण, हे वापूला कळले, नेमक्या त्याच वेळी हे वृत्त कानावर आहे. बापूला तसाच सोडणे त्या मनःस्थितीत अशक्य होते. प्रकरण पुरे केले आणि भावाला बाळची कथा विचारली.

(' मुक्त संवाद कादंबरीकाराशी ' या मॅजेस्टिक प्रकाशनाच्या पुस्तकातून )



अनुक्रमणिका

मधु मंगेश कर्णिक

# 'भाकरी आणि फूल'

'भाकरी आणि फूल' ही माझी एक मला विशेष आवडलेली कादंबरी. लेखकाला आपली एखादी साहित्यकृती अनेक कारणामुळे आवडू शकते. ती लिहिण्यापूर्वीचा, लिहितानाचा आणि नंतरचा निर्मितीचा आनंद, तिचा आशय, कथानकाचा वेगळेपणा आणि या साहित्यकृतीची वाचकप्रियता, यामुळे एखादी साहित्यकृती लेखकाला आवडू लागते. 'भाकरी आणि फूल' ही कादंबरी मी लिहिली त्याआधीपासून ती मला सुचली त्या क्षणापासून माझी आवडती बनलेली आहे. तिचा आशय, कथानक, पात्रे, घटना आदी तपशीलापेक्षा ती मला ज्या परिस्थितीत सुचली त्या परिस्थितीचा विचार माझ्या मनात प्रथम येतो आणि एका साध्याशा अनुभवाने आपल्याला लेखक म्हणून केवढे देणे देऊन ठेवले त्याचा प्रत्यय येऊन पुढे लिहिल्या गेलेल्या कादंबरीमध्ये मी किती खोलवर गुंतलो तेही जाणवते; या मानसिक गुंतवणुकीमुळेही कदाचित असेल, 'भाकरी आणि फूल' ही कादंबरी मला विशेष प्रिय वाटू लागली.

ही कादंबरी लिहिण्यासाठी मला उद्युक्त करणारी परिस्थिती कोणती होती?

'भाकरी आणि फूल' कादंबरीबद्दल याठिकाणी विस्ताराने सांगायचेच आहे, तेव्हा मुळापासूनच सारे सांगतो... (कादंबरीला लिहिलेल्या छोट्या प्रस्तावनेमध्ये मी त्याचा थोडा उल्लेख केला आहेच; पण आता तो भाग आणि त्या नंतरचाही बराचसा भाग सांगायचा आहे.)

एकोणिसशे बहात्तर सालची ही हकीकत आहे. तेव्हा मी महाराष्ट्र शासनाच्या नोकरीत होतो आणि माझी नेमणूक मुख्यमंत्री वसंतराव नाईक यांचा प्रसिद्धी आणि जनसंपर्क अधिकारी म्हणून (सहाय्यक प्रसिद्धी संचालक) मंत्रालयात (तेव्हाच्या सचिवालयात) झाली होती. त्याआधी मी अशाच तऱ्हेचे शासकीय काम गोवा शासनामध्ये केले होते. तेथे मुख्यमंत्री भाऊसाहेब बांदोडकर हे होते. मुख्यमंत्र्यांकडे काम करणाऱ्या अधिकाऱ्याला नाना तऱ्हेचे अवधान ठेवावे लागते. मंत्रालयात थेट सहाव्या मजल्यावर माझे कार्यालय होते. मुख्यमंत्र्यांच्या दालनाला लागूनच मला एक प्रशस्त सुसज्ञ खोली देण्यात आली होती. मुख्यमंत्र्यांच्या भेटीला येणारे ज्येष्ठ साहित्यिक प्रथम माझ्याकडे येऊन थोडावेळ बसत आणि मुख्यमंत्र्यांनी बोलाविले की त्यांच्याकडे जात. अशा साहित्यिकामध्ये तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, अनंत काणेकर, वामनराव चोरघडे, कविवर्य अनिल, ग. दि. माडगूळकर



अनुक्रमणिका

यांचा समावेश असे. एकदा ग. दि. माडगूळकर मला सहज म्हणाले की, इथे तुला खूप पहायला, अनुभवायला मिळत असेल; त्याचा तुझ्या लिहिण्यासाठी उपयोग करता येईल तर पहा. हीच गोष्ट मला गोव्यात कविवर्य बा. भ. बोरकर यांनीही सांगितली होती. पण असे कुणी सांगून काही लिहिता येत नाही. एक मात्र खरे की या दोन्ही थोर लेखकांनी माझी शासकीय काम करतानाची दृष्टी बदलण्याची कामगिरी नकळत पार पाडली. मंत्रालयात मिळणारा प्रत्येक अनुभव माझ्या लेखी उपयुक्त ठरणारा होता. त्या काळात मराठवाड्यात, पश्चिम महाराष्ट्रात 'जमीन बळकाव' आंदोलन चालू होते. एक गाव एक पाणवठा ही बाबा आढावांनी सुरू केलेली चळवळ जोरात होती. ग्रामीण भागात दलितांवरील अत्याचार वाढलेले होते. राजकीय क्षितिजावर सामाजिक असंतोषाचे ढग एकसारखे जमत होते. त्यातच कम्युनिष्टांनी राज्यकर्त्या काँग्रेसमध्ये शिरून आपला प्रभाव पाडण्यास सुरवात केली होती. मुख्यमंत्री वसंतराव नाईक हे खरे म्हणजे वंजारी समाजातून आलेले. मागासवर्गीय. पण जमीनदारांना त्यांचा पाठिंबा असल्याची हाकाटी कम्युनिस्टांनी सुरू केली होती व त्यांना 'कुलर' असे संबोधायला सुरवात केली होती. पण वसंतराव नाईक दिसायला, वागण्यात पाश्चिमात्य आधुनिक वाटत असले तरी मनातून ते पक्के भारतीय शेतकरी होते; शिवाय आपल्या मागासवर्गीय समाजाच्याच नव्हे तर एकूणच गोरगरीब वर्गाबद्दल त्यांच्या मनात सहानुभूतीची, ओलाव्याची भावना असे. त्यामुळे दलित शोषित समाजाच्या प्रश्नाविषयी त्यांना विशेष जिव्हाळा वाटायचा. ग्रामीण भागात होणाऱ्या दलित शोषितांवरील अन्यायाबाबत ते जागरूक असत. त्यांना न्याय मिळावा, असा त्यांचा राज्यकर्ता म्हणून प्रयत्न असे.

बहात्तर साली भारतीय स्वातंत्र्याचा 'रौप्यमहोत्सव' साजरा करण्याचे ठरले. शासकीय पातळीवरून चर्चा सुरू झाली. वसंतराव नाईकांना वाटले, या स्वातंत्र्याच्या रौप्यमहोत्सवामध्ये जनतेच्या आशाआकांक्षांचे प्रतिबिंब उमटले पाहिजे. या सोहळ्यामध्ये जनता सामील झाली पाहिजे. ती मुखर झाली पाहिजे. तिची सुखदुःखे विविध कार्यक्रमांतून प्रगट झाली पाहिजेत. त्यासाठी साहित्यिक, कलावंत आदींनी जनतेच्या मनाचा कौल, आविष्कार विविध कार्यक्रमातून व्यक्त करावा शासन सर्व खर्च करील, ही एक ऐतिहासिक घटना आहे.

आणि आम्ही सचिवालयामध्ये नामवंत साहित्यिक, पत्रकार, कलाकार यांना निमंत्रित केले. सुचवले की त्यांनी भारतीय स्वातंत्र्याच्या या रौप्यमहोत्सवी कार्यक्रमामध्ये असे काही सुचवावे की ज्यातून भारतीय जनतेच्या आशाआकांक्षा प्रतिबिंबित होतील.

निमंत्रित कलेले साहित्यिक, कलाकार सचिवालयामध्ये हजर झाले. त्यांनी आपापल्या सूचना मुख्यमंत्र्यांसमोर मांडल्या. प्रत्येकाने आपल्या सूचनेमध्ये केंद्रस्थानी स्वतःला ठेवलेले होते. कोणी कादंबरी लिहिणार होता, कोणी अनुबोधपट काढणार होता तर कोणी स्वतःच्या काव्यसंग्रहाबद्दल बोलत होता, कुणी स्वातंत्र्याचा इतिहास लिहिण्याचे काम करायला तयार होता तर कुणी एक शाहीर कलापथक घेऊन सबंध महाराष्ट्र ढवळून काढतो म्हणत होता. प्रत्येकाला या योजनेमध्ये आपल्या खिशात काही शासकीय द्रव्य जावे असे वाटावे, असे बोलणे चालले होते.

आणि मुख्यमंत्री वसंतराव नाईक शांतपणे ओठांत पाईप ठेवून ऐकत होते. ते नेहमीच कमी बोलत; अधिक ऐकत.

मुख्यमंत्र्यांचा जनसंपर्काधिकारी या नात्याने या बैठकांना मी उपस्थित रहात असे, टिपणे घेत असे. एका बैठकीत आपला माडगूळकरांनी प्रस्ताव मांडला ते म्हणाले, "या स्वातंत्र्याच्या रौप्यमहोत्सवाच्या निमित्ताने शासनाने स्वतःच्या पंचवीस वर्षाच्या कामाचा हिशेब सादर करावा. पंचवीस वर्षात स्वातंत्र्याने देशाला, देशातील समाजाला काय दिले? किती भाकरी दिल्या, किती फुलं दिली? आणि हे समाजातल्या सगळ्यांत खालच्या पायरीला उभ्या असलेल्या लोकांबाबत तपासून पहावं. त्यांना स्वातंत्र्याने काय दिलं?" आणि विवेचनाच्या ओघांत माडगूळकरांनी एक उदाहरण सांगितलं. ते म्हणाले, "१८५७ च्या स्वातंत्र्यसमरामध्ये ज्या गावात ब्रिटिशांविरुद्ध उठाव होई, त्या गावातून एक भाकरी व तिच्यात दुमडलेले एक शुभ्र कमळ दुसऱ्या गावात परतीची खूण म्हणून पाठवले जाई. ही खूण तिथे पोचली की त्या गावातसुद्धा बंडाचा उठाव होई! भाकरी आणि फूल हे तेव्हा ब्रिटिशांच्या अन्यायाविरुद्ध वापरले गेलेले प्रतीक स्वातंत्र्योत्तर काळात समृद्धी आणि संस्कृती यांच्या बरोबरीने परिवर्तनाचेही प्रतीक म्हणून वापरता येईल."

माडगूळकर बोलत होते आणि मी ध्यान देऊन ऐकत होतो. स्वातंत्र्योत्तर काळातील परिवर्तनाचा माझ्या परीने मीही एक साक्षीदार होतो.

साहित्यिक कलाकार यांनी शासनाने देऊ केलेली संधी स्वकेंद्रितपणाने हातची घालवली आणि शासनाला अभिप्रेत असलेला कोणताही वाङ्मयीन व कलात्मक असा सांस्कृतिक कार्यक्रम साकार होऊ शकला नाही. मुख्यमंत्री म्हणाले, "मला तर साहित्यिकांच्या चर्चेतून काहीसुद्धा कळले नाही! जो तो आपल्याच स्कीमबद्दल बोलत होता!" माडगूळकरांनी दिलेला प्रस्ताव उत्तम होता. पण सरकारी [illegible] त्याचे पुढे काहीच होऊ शकले नाही.

माझ्या मनात मात्र माडगूळकरांनी एक वेगळाच विचार रुजवला होता.

त्याच दरम्यान मी कोकणातील गावी गेलो होतो. नुकतेच मी जुने घर मोडून नवे बांधायला घेतले होते. त्याचे चिरे, मंगलोरी कौले येऊन पडली होती. पावसाळा संपताच बांधकामाला सुरुवात होणार होती.

चिरे आणून टाकणाऱ्या कामगारामध्ये गावचा कृष्णा महार होता. तो गावच्या देवासमोर ढोल वाजवायचा, सनईचा सूर धरायचा. जेवढे कौशल्य चिरेखाणीतून चिरे खोदताना तो दाखवी तेवढेच तो ढोल - सनई वाजवताना दाखवी.

कृष्णा महार माझा शाळासोबती. तो शिकला नाही नि गावातच मोलमजुरी करून राहिला. मी शिकलो, शहरात गेलो. लेखक बनलो. शासनामध्ये हुद्देदार झालो. स्वातंत्र्योत्तर परिवर्तन झाले आहे का? झाले असल्यास त्याचे प्रत्यंतर मला माझ्या गावात दिसते का? हा कृष्णा महार नि मी एकाच शाळेत शिकलो. पंधरा ऑगस्ट सत्तेचाळीस रोजी आम्ही दोघेही स्वातंत्र्योत्सवाच्या प्रभातफेरीत बेभानपणे नाचलो होतो. कृष्णा ढोल वाजवीत होता. पोरवयातही त्याच्या पोटा[illegible]वर अवाढव्य ढोल कुणीतरी चढवला होता नि तो जीव तोडून वाजवीत होता. ढोल घेऊन नाचत होता. मी हातात तिरंगी झेंडा घेऊन प्रभात फेरीत गाणे म्हणत होते. 'नवहिंद राष्ट्र झेंड्या ऽ ऽ प्रणाम घे या -"

पंचवीस वर्षापूर्वीचे पहिल्या स्वातंत्र्यदिनाचे दृश्य माझ्या डोळ्यासमोर उभे राहात होते.

तो कृष्णा महार पंचवीस वर्षांनंतरही पूर्वी होता तेथेच राहिला होता. फक्त मी पुढे गेलो होतो.

मी पांढरपेशा, सवर्ण. तो महार... एके काळचा अस्पृश्य, हरिजन. मग मनात आले एकेकाळच्या का? आजही तो अस्पृश्यच आहे. आपल्या गावच्या देवळात त्याला आजही प्रवेश मिळत नाही!

माडगूळकर म्हणाले होते 'भाकरी आणि फूल'. कुठे आहे ती भाकरी आणि कुठे आहे ते फूल? या माझ्या गावासाठी, तेथील महारवाड्यासाठी? पंचवीस वर्षाच्या स्वातंत्र्यानंतरही माझ्या गावचा महारवाडा तसाच आहे. स्वातंत्र्याच्या पंचवीस वर्षानंतरही त्याला जर काहीच मिळाले नसेल तर देशालाही काही मिळालेले नाही. समाजाच्या सगळ्यात खालच्या पायरीवर उभ्या असलेल्या माणसावरूनच समाजाची उंची आणि श्रीमंती मोजायला हवी.

माझे एकट्याचेच घर चिरेबंदी आणि मंगलोरी कौलांचे होऊन काय उपयोग?

पण मला हे वाटून काय उपयोग होता? सत्ता कोणाकडे होती? संघटना कोणाकडे होती? माझ्या हातात काय होते? केवळ अस्वस्थ होण्यापलीकडे माझ्यापाशी काही नव्हते.

गावच्या मुक्कामात असे अनेक विचार मनात येत होते. गावाहून मी मुंबईला आलो. सचिवालयात कामावर हजर झालो. स्वातंत्र्याच्या रौप्यमहोत्सवी कार्यक्रमाचा तपशील दरम्यान पक्का होत होता; तो कळून माझी अस्वस्थता वाढत होती. नेमके काय करावे, ते समजत नव्हते. पण मनात कसलातरी कल्लोळ उभा होता.

ते दिवाळी अंकाच्या लेखनाचे दिवस होते. एके दिवशी मित्रवर्य श्री. उमाकांत ठोमरे यांचा फोन आला. ते म्हणाले मधूसुदन वैराळे 'मोहर' नावाचा एक नवा दिवाळी अंक काढणार आहेत. त्यासाठी तुम्ही कादंबरी लिहावी, असा त्यांचा प्रस्ताव आहे. त्या काळात मी अनेक दिवाळी अंकासाठी लिहीत असे. त्यामुळे आणखी एका नव्या अंकासाठी कादंबरी लिहिणे कठीण वाटत होते. तरीही हो नाही करता मी होकार दिला आणि अकस्मात मला 'भाकरी आणि फूल' हाच विषय कादंबरीसाठी सतावू लागला. जणू याच विषयावर मी लिहावे, म्हणून तर ठोमरे कादंबरीचा प्रस्ताव घेऊन आले नसावेत? या निमित्ताने झाले तर लिहून होईल. एकदा विषय बाजूला पडला की -

त्यानंतर मी झपाटल्यासारखी 'भाकरी आणि फूल' कादंबरी लिहून काढली. माझ्या या लिहिण्याचा वेग मलाच स्तिमित करणारा होता. माझ्या मनातील सारा कल्लोळ, सारी अस्वस्थता माझ्या लेखनात उतरत होती आणि माझे मन पाना पानागणिक शांत, निवांत, स्वस्थ होत होते.

**तीन पिढ्यांची कहाणी**

'भाकरी आणि फूल' ही कादंबरी म्हणजे कोकणातील एक महार कुटुंबाच्या तीन पिढ्यांची कहाणी. कृष्णा महाराची एक पिढी, त्याचा शिकला सवरलेला, मुंबईला चाकरमानी झालेला, अस्पृश्यांच्या मुक्ततेसाठी डॉ. आंबेडकरांनी सुरू केलेल्या चळवळीतला एक सैनिक मुलगा, त्याची शिकलेली देशावरची बायको, 'शेकाफे' ची चळवळ, आंबेडकरी विचारांचा प्रभाव, परिवर्तनासाठी चाललेला संघर्ष. शिका, संघटित संघर्ष करा, हे सूत्र. त्यानंतरची तिसरी पिढी. जी साऱ्या प्रस्थापित व्यवस्थेविरुद्ध कडवेपणाने बंड करते. राष्ट्र आणि राष्ट्रध्वज यांचाही मुलाहिजा ठेवीत नाही. अंती या पिढीचा अपरिहार्य असा अपेशी पण यशाची किरणे दिग्दर्शित करणारा शेवट.

महार, चांभार या समाजाविषयी मी त्यापूर्वी कथा, व्यक्तिचित्रे लिहिलेली होती. जेव्हा 'दलित साहित्य' हे शब्द मराठी साहित्याला माहीत नव्हते, तेव्हा १९५८ साली प्रकाशित झालेल्या माझ्या

'कोकणी ग वस्ती ऽ ऽ ' या पहिल्या पुस्तकामध्ये मी कोकणातील महारचांभारांची व्यक्तिचित्रे रेखाटली होती . त्यानंतरही माझ्या कथाकादंबऱ्यांतून पूर्वाश्रमीचे अस्पृश्य अवतरले होते . त्या समाजात माझे निरीक्षण बारकाईचे होते आणि लेखक म्हणून माझ्या अंतःकरणात महार , चांभारांबद्दल आत्मीयतेची भावना होती . त्यामागे सहानुभूती , करुणा , अनुकंपा यापेक्षा कुतूहल आणि "हे जगतात तरी कसे ? आणि तरीही पुष्कळजण मान ताठ ठेवून वागतात कसे ? हे देवळांत 'वदतात' पण त्यांना देवळाच्या गाभाऱ्यात प्रवेश का नाही ?" असे प्रश्न होते आणि मानवी जीवनाचा सहृदय प्रेक्षक म्हणून मी त्यांचे जगणे जवळून न्याहाळले होते . त्यामुळे त्यांच्याबद्दल लिहिणे मला कठीण वाटले नाही .

प्रश्न होता दलित नसलेल्या , पांढरपेशा , सुस्थित लेखकाने कितीही आत्मीयभावाने , परोक्ष अनुभूतीने दलितांबद्दल लेखन केले तर ते दलित समाज त्याच आत्मीयतेने स्वीकारील का ? त्याला ते कळेल आणि पटेल का ? सर्वसामान्य वाचकाला तरी ते पटेल का ?

या दरम्यान आणखी एक घटना घडली . पंधरा ऑगस्टला 'साधना' साप्ताहिकामध्ये श्री . राजा ढाले यांनी एक प्रक्षोभक लेख लिहिला आणि त्यामुळे सर्वत्र खळबळ माजली . ढाले यांनी स्वातंत्र्य आणि राष्ट्रध्वज यांबद्दल काही प्रक्षोभक विधाने केली होती . स्वातंत्र्याबद्दल त्यांच्या प्रतीकाबद्दल दलित मनाला वाटणारी चीड त्यातून व्यक्त झाली होती . 'भाकरी आणि फूल' मधील महारांच्या तिसऱ्या पिढीचा प्रतिनिधी आनंदसुद्धा तसेच विचार व्यक्त करीत होता ! हा योगायोग विस्मयकारक होता . त्याच वेळी मला जाणवले की , मी जरी जन्माने दलित नसलो तरी दलित मानसिकता मी अचूकपणे माझ्या कादंबरीमध्ये व्यक्त केलेली आहे आणि लेखक म्हणून तो माझ्या लेखणीचा अस्सलपणाच आहे .

'मोहर' चा दिवाळी अंक प्रसिद्ध झाला आणि एके दिवशी एव्हांना मराठी साहित्यात मूळ धरू लागलेल्या दलित साहित्याचे प्रणेते प्रा . गंगाधर पानतावणे यांचे अनपेक्षितपणे पत्र आले . त्यांनी लिहिले होतेः आपली 'भाकरी आणि फूल' ही कादंबरी वाचली . खूपच आवडली . गेल्या पंचवीस वर्षातील एका अस्पृश्य कुटुंबाच्या स्थित्यंतराचा आलेख आपण समृद्धपणे रेखाटला आहे . बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांनी झपाटलेला परंतु परिस्थितीने कधीमधी असहाय होऊन चरफडणारा आणि मग देशाविरुद्ध , धर्माविरुद्ध , धर्मग्रंथाविरुद्ध बंडाची भाषा बोलणारा गोपाळ आणि विद्रोही मनाचा आविष्कार असलेला आनंद हे ज्वलंत आहेत .... महारांच्या घरातील , त्यांच्या वागण्यातील , समाज प्रवृत्तीतील अनेक बारकावे आपण टिपलेले आहेत . त्याचा मला विशेष आनंद झाला . 'भाकरी आणि फूल' ही एक समर्थ कादंबरी आहे ."

'भाकरी आणि फूल' ही कादंबरी १९७२ साली दिवाळी अंकात प्रकाशित झाली . त्यानंतर ती लगेचच पुस्तकरूपाने प्रकाशित व्हायची ; किंबहुना माझे प्रकाशक केशवराव कोठावळे यांचा तर प्रकाशनासाठी तगादा होता . पण मी थांबायचे ठरवले . 'भाकरी आणि फूल' ही काही मनोरंजक कादंबरी नव्हती . मी ती गांभीर्याने पक्क्या भूमिकेनिशी लिहिली होती . त्यामागे वैचारिक बैटक होती . ती एक विचारप्रवण , गंभीर विषयावरील गंभीर कादंबरी होती . दलितांच्या चळवळीबद्दल , त्यांच्या राजकारणाबद्दल , रिपब्लिकन पक्षाच्या वाटचालीबद्दल त्या कादंबरीतील पात्रे बोलत होती . आणि त्यांनी अधिक बोलावे , असे काही यापुढे आंबेडकरी चळवळीमध्ये रिपब्लिकन पक्षामध्ये आशादायी घडेल असे मी मनाशी म्हणत होतो . माझ्या त्या सामाजिक कादंबरीला अपेक्षित संभाव्य राजकीय ,

सामाजिक घडामोडीमुळे एक चांगले परिमाण लाभेल, असे मला वाटत होते आणि ते घडेपर्यंत थांबावे, एवढा धीर माझ्यापाशी होता. पण दहा वर्षे थांबूनही बहात्तर साली मी जे लिहिले होते त्यामध्ये लक्षणीय असा कोणताही बदल माझ्या नजरेला जाणवेना आणि जिथे मी ती कादंबरी संपवली, तिथून पुढे आणखी काही लिहावे अशी प्रेरणा मिळेना. मग ती कादंबरी पुस्तकरूपाने प्रकाशित करायचे ठरवले आणि दहा वर्षे मध्ये घालवून १९८२ साली 'भाकरी आणि फूल' चे पुस्तक प्रसिद्ध झाले.

कादंबरी पुस्तकरूपाने प्रकाशित झाली आणि वाचकांच्या प्रतिक्रिया समजू लागल्या. दलित वाचकांनी, विशेषतः तरुणांनी व विद्यार्थ्यांनी कादंबरीचे भरघोस स्वागत केले; तर वयस्क दलित मंडळी गोंधळल्यासारखी वाटली. कादंबरीतील वास्तव प्रखर होते, भेदक होते. त्यांच्या ते परिचयाचे होते. पण असे काही चित्रण पुस्तकामध्ये लिहून येईल आणि ते लिहिणारा पुन्हा एक पांढरपेशा ब्राम्हण आहे, हे वास्तव त्यांना पचवता येईना. हे सारे लिहायला हवे होते का? या प्रश्नापाशी त्यांचे बोलणे थांबे दलितांमधील या प्रतिक्रिया समजण्याजोग्या होत्या.

पण सवर्णांमध्ये उमटलेल्या काही प्रतिक्रिया अतिशय अनपेक्षित होत्या. उदाहरणार्थ, डोंबिवलीच्या एका ब्राह्मण वकीलाने मला जवळजवळ वकीली शब्दात नोटीसच दिली होती. ब्राह्मण समाज व हिंदू धर्म यांचा अवमान केल्याबद्दल मी त्यांची माफी मागावी, अशी त्यांची मागणी होती. मी शांतपणे त्यांना पत्र पाठवून माझी भूमिका स्पष्ट केली. त्यानंतर त्यांचे पत्र आले नाही किंवा कायदेशीर उपाययोजनाही झाली नाही! कादंबरीची नवी आवृत्तीही प्रसिद्ध झाली.

दरम्यान मुंबई दूरदर्शनसाठी त्या कादंबरीवर 'दूरदर्शन मालिका' निर्माण झाली. विषयाचे नावीन्य आणि सामाजिक संदर्भ यामुळे ही मालिका दूरदर्शन चटकन स्वीकारील असे वाटले होते. निर्माते श्री. विकास ठाकूर हे एक पुरोगामी विचारांचे, धडाडीचे तरुण होते. त्यांनी चार भाग चित्रित करण्यासाठी चारएक लाख रुपये गुंतवले होते. अरुणाराजे यांच्यासारख्या राष्ट्रीय पातळीवर नावाजलेल्या दिग्दर्शिका होत्या व कलाकार सगळे नामवंत होते. परंतु मुंबई-दूरदर्शनने ही मालिका आडवली. आडवणारे कोण होते? सारे 'दलित' अधिकारी होते! ही मालिका प्रदर्शित करायची नाही, असा जणू त्यांनी कट केला होता! निर्माते ठाकूर विलक्षण आर्थिक अडचणीत सापडले! त्यांना हे अनपेक्षित होते. दलित अधिकारी आपल्याला पाठिंबा देतील, असे त्यांना भाबडेपणाने वाटत होते. शेवटी ठाकरे निकरावर आले तेव्हा त्या दलित अधिकाऱ्यांनी सांगितले, "धर्मांतराचा प्रसंग बदला, मृतमांस खाण्याचा प्रसंग काढून टाका - महार हा शब्द गाळा." आता हे केले तर कादंबरीवर अन्यायच होत होता. शेवटी विकास ठाकरे दिल्लीपर्यंत पोचले, तेव्हा परवानगी आली. तरीही आपली कातडी बचावण्यासाठी या अधिकाऱ्यांनी सदर मालिकेचे भाग 'थर्ड पार्टी ओपिनियन' म्हणून मुंबईच्या बालमोहन हायस्कूलचे प्राचार्य विख्यात शिक्षणतज्ज्ञ प्रा. बापूसाहेब रेगे आणि विख्यात साहित्यकार प्रा. गंगाधर गाडगीळ यांना दाखवून त्यांचा अभिप्राय घेतला. अर्थातच तो अनुकूल मिळाला हे सांगायला नकोच.

दूरदर्शनवर 'भाकरी आणि फूल' प्रदर्शित होऊ लागला. त्या दरम्यानच मी साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष झालो. रत्नागिरीला अध्यक्षपदी जाताना मी वाटेतल्या सर्व थोर साहित्यिकांच्या, समाजसुधारकांच्या गावांना भेट देत जाण्याचे ठरवले आणि संमेलनाच्या आदल्या रात्री रत्नागिरी



अनुक्रमणिका

जिल्ह्यातील दुर्गम मंडणगड तालुक्यातील 'आंबवडे' या बाबासाहेब आंबेडकरांच्या मूळ गावी माझ्यासोबतच्या अनेक साहित्यिकांसह पोहोचलो. तेव्हा मध्यरात्र झाली होती! सारा आंबवडे गाव कडाक्याच्या थंडीत माझ्या स्वातासाठी जमला होता. 'भाकरी आणि फूल' या मालिकेचे लेखक म्हणून माझा परिचय करून देण्यात आला आणि आंबेडकरांच्या शिकवणीवर दूरदर्शनसाठी मालिका लिहिणारा लेखक म्हणून मला प्रेमभराने भेटत होते.

माझ्या आयुष्यातील तो अपूर्व योग होता. कधीही विसरता न येण्यासारखा! लेखक म्हणून मला फार मोठी पावती मिळत होती.

त्यानंतर ती कादंबरी मुंबई विद्यापीठानेही आपल्या एका शाखेला शिकविण्यासाठी निवडली. मुंबईच्या एका प्रख्यात कॉलेजमधील प्राध्यापिका - ज्या मराठीतील नामवंत साहित्यिकाही आहेत - म्हणाल्या : "मुंबईमधील उच्च मध्यमवर्गीयांची मुले ही कादंबरी आम्ही शिकवतो, तेव्हा समरसून ऐकतात. त्यांच्या डोळ्यात, चेहऱ्यावर उमटणारे भाव तुमच्या कादंबरीबद्दलच प्रतिक्रिया मूकपणे बोलू लागतात."

पण जी कादंबरी मुंबई विद्यापीठाने स्वीकारली तीच कादंबरी नागपूर विद्यापीठाने नाकारली!

नागपूर विद्यापीठाच्या बोर्ड ऑफ स्टडीजसाठी या कादंबरीची प्रथम शिफारस करण्यात आली होती. तोच नागपूरमधील वृत्तपत्रात (ही कादंबरी विद्यापीठात शिकवली जाणार, याचा अंदाज लागताच?) 'भाकरी आणि फूल' बद्दल काहीबाही छापून आले. (आणवण्यात आले!) अर्थातच प्रतिकूल. ही कादंबरी अश्लील आहे, हा मुख्य आक्षेप! परिणामी ज्या नागपूरात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी धर्मपरिवर्तनातून सामाजिक, सांस्कृतिक परिवर्तन होईल या अपेक्षेने 'दीक्षा' भूमीची निवड केली, त्याच ठिकाणी आंबेडकरांच्या शिकवणुकीचा उद्‌बोध करणारी एक कादंबरी तेथील विद्वज्जनांनी शिकवण्याचे, वाचण्याचे नाकारले!

मला वाटते, लेखकाला व त्याच्या पुस्तकाला असाही अनुभव केव्हातरी आलाच पाहिजे. 'भाकरी आणि फूल' ने मला असे अनेक कडू-गोड अनुभव दिले आणि ती कादंबरी मला अधिकच प्रिय होत राहिली.

(मधु मंगेश कर्णिक, ४०१ एक्स / १८ मार्व्हल, शास्त्रीनगर, चार बंगला, अंधेरी (पश्चिम), मुंबई ५८)

---

## नवे आजीव सभासद

सुमन पाटील (शिराळा), यशवंत अनंत रायकर (विरार), संध्या जगन्नाथ टिळक (ठाणे), ज्ञानेश्वर गजानन कोळवेकर (मडगाव, गोवा), सुमती विश्वासराव पवार (नाशिक), दत्तात्रय गोपाळ देशपांडे (नाशिक), भारतकुमार अंबादास दहिफळे (कुत्तरवाडी), संजीवकुमार अभिमन्यू सोनावणे (धरणगाव), गंगाधर पाथ्रीकर(औरंगाबाद) अशोक नायकवडे (औरंगाबाद), व्यंकटेश शा. वळसंगकर (गुलबर्गा), निलम रमेश माणगावे (जयसिंगपूर), अरुण पुंजाजी कडू (साभळ), बाळासाहेब गोपीनाथ सुंबे (कान्हूर), पुरुषोत्तम कोळपकर (श्रीरामपूर), विजया एन्. कुन्हे (श्रीरामपूर), सुधाकर यशवंतराव गुंजाळ (सातारा)



अनुक्रमणिका

ज्योत्स्ना देवधर

# रमाबाई

प्रिय रमाबाई,

१९६२ साल असेल. मी आकाशवाणी पुणे केंद्रावर 'गृहिणी' विभागाची निर्माती होते. पंडिता रमाबाई यांच्या जीवनकार्यावर आधारित एक कार्यक्रम करावा असं ठरलं. कोण लिहिणार? तो काळ जगलेली, पं. रमाबाईंच्या कार्याबद्दल आस्था असणारी, स्वतः स्त्री -शिक्षण, स्त्री - कल्याण यासाठी आपलं आयुष्य वेचणारी अशी लेखिका या कार्यक्रमासाठी मिळाली तर त्या लेखनाला सच्चेपणाचा, अनुभवाचा व प्रौढ विचारांचा झळाळ मिळेल असं मला मनापासून वाटत होतं.

अचानक डॉ. कमलाबाई देशपांडे यांचं नाव आठवलं. त्यांनी हा कार्यक्रम लिहिण्याचं मान्य केलं तर अर्धी लढाई जिंकली असं होणार याची खात्री पटली. कमलाबाईंना त्यांच्या घरी जाऊन विनंती केली. त्यांनी रमाबाईंना पाहिलं होतं. त्यांच्या कामाबद्दल कमलाबाईंना आस्था होती, माहिती होती. सुदैवानं त्यांनी हा कार्यक्रम लिहिण्याचं मान्य केलं. त्या, मी, निर्मला आणि आमचा लवाजमा केडगावला गेलो. मुक्तिसदनातील काही महिलांच्या मुलाखती ध्वनिमुद्रित केल्या. त्या परिसरात असलेल्या बिट्टीच्या झाडाखाली पिवळ्या फुलांनी सुशोभित रमाबाईंच्या समाधीचं दर्शन घेतलं. त्यांची लिहाय-बसायची खोली पाहिली. मुक्तीसदनात हिंडून तिथली व्यवस्था - कामकाज पाहिलं. परतलो.

'मी रमाबाई' - हे नभोनाट्य मी सादर केलं. श्रोत्यांना आवडलं. कमलाबाईंना पण समाधान वाटलं. पत्रं आली. या व्यक्तीचं एवढं कार्य असेल अशी कल्पना नव्हती असं अनेकांनी मान्य केलं. खरं तर एक कार्यक्रम केला की दुसऱ्या कार्यक्रमाचे वेध लागतात. रेडिओच्या भट्टीत सतत इंधन पुरवावं लागतं. कित्येक कार्यक्रम अक्षरशः वाऱ्यावर जातात. विसरले जातात.

पण मला रमाबाईंनी झपाटलं होतं. त्यांचे हिरकणीसारखे डोळे, घट्ट मिटलेले ओठ, भव्य कपाळ, त्यांचं मनस्वी व्यक्तिमत्त्व मला हाक घालत होतं. आज मला वाटतंय, रमाबाईंनी आयुष्याशी जी झुंज दिली, संघर्षाला, विरोधाला, प्रतिकाराला, निंदेला, अडथळ्यांना, नाना आरोपांना त्यांनी एखाद्या योद्ध्याप्रमाणे तोंड दिलं, त्याचा विलक्षण मोह मला पडला होता, त्याहीपेक्षा मृत्यूनं त्यांच्या आयुष्यात जे थैमान घातलं होतं ते पेलणं म्हणजे दिव्यच होतं. ही बाई एकटी, एकाकी, पावलापावलावर झुंजच देत राहिली. दुर्दैव तर पाठी लागलं होतंच. पण तेवढ्यानं समाधान न होता



अनुक्रमणिका



रमाबाईनी आयुष्यभर दुर्दैवी आत्मेच भोवती गोळा केले. ही ताकद, ही जिद्द कुठून आली? कशी आली हा प्रश्न पण माझ्या मनात होता.

रमाबाईंच्या आधी मी कथाकादंबऱ्यांतून ज्या स्त्रिया रंगवल्या होत्या त्यापेक्षा ही बाई किती निराळी होती! दुर्दैवाशी, अन्यायाशी, छळाशी, स्त्रीपणाशी झगडण्याचा हिचा दिमाख औरच होता. रमाबाईंचं हे निराळेपण, त्यांचा धाडशी स्वभाव मला भुरळ घालत होता. पराभव न स्वीकारणारी ही नायिका मला हाका घालत होती.

दुःखाची गोळी तोंडात ठेवून, करुण रसात टाक बुडवून लिहिताना माझी तंद्री लागते. रमाबाई तर मूर्तिमंत दुःख, दुर्दैव.... पण जरा तरी तमा ठेवली का त्यांनी कशाची? छे, जिद्द तर पराकोटीची. आपल्या आयुष्यातल्या प्रत्येक प्रसंगाचं, घटनेचं कारण सापडावं असा हट्ट धरला, त्यांची उत्तरं सापडावी म्हणून आयुष्यभर रान तुडवलं आणि पेटवलं. पण आपल्या ध्येयवादाशी टक्कर देताना पराभव काय कमी वेळा पदरी पडला? मला वाटतं, रमाबाईंना संकटं ओढवून घेण्याची नशाच चढली होती. त्यांनी स्त्रीउद्धाराचा 'यज्ञ' मांडला होता. समाजरूपी राक्षस तो यज्ञ उधळत होते. आपल्या घट्ट मिटल्या ओठांनी, तेजस्वी डोळ्यांनी आपल्या यज्ञाचा विध्वंसही त्यांनी पाहिला. उद्ध्वस्त झालेल्या तीर्थक्षेत्रावर आप्तांना तिलांजली दिली. जीवघेण्या दुःखाला 'खांदा' दिला... एकोणिसाव्या शतकात एका कोकणस्थ शास्त्र्याची ही मुलगी ख्रिस्ती होते.. यापरतं धाडस ते कोणतं असावं?

हे सगळं कुणाही लेखकाला मोह पाडावं असंच होतं. मला तर सोसल्या जीवाचं विलक्षण आकर्षण. मी 'रमाबाई'मय होऊन गेले. इतकी की ही कादंबरी लिहित असताना घरातल्या मुलीला, सुनेला, मोलकरणीला मी कित्येकदा रमाबाई म्हणून हाक मारत होते. माझं हे झपाटलेपण माझ्या माणसांना भिववून गेलं. पण मी तर रमाबाई नेसत असलेल्या बांड (साडी) चा गंध पण अनुभवला होता.

इतकं रमाबाईमय होऊनही त्यांच्या अंतरंगाचा गुंता सोडवणं अवघड जात होतं. त्यांच्या अतर्क्य, आक्रित वागण्याचे संदर्भ जोडणं कठीण होतं. रमाबाईंच्या संदर्भातली खूप पुस्तकं वाचली. पद्मनी सेनगुप्ता यांनी रमाबाईंना जाणून, समजून घेतलं होतं. पण मला सतत एक जाणीव मात्र होत होती, पद्मनी सेनगुप्ता यांनी रमाबाईंना ख्रिस्ती डोळ्यांनी जास्त पाहिलं. त्या संदर्भात जोखलं. खरं तर रमाबाईंच्या मनाच्या तळाला जायचं तर एक डोळा हिंदू धर्माचा, त्या संस्कारांचा, त्या संस्कृतीचं पाणी असणारा हवा होता असं मला तीव्रतेनं वाटलं. म्हणून मी या कादंबरीत रमाबाई आणि मोक्षमुल्लर यांच्या भेटीचा उपयोग करून घेतला. त्यात मोक्षमुल्लर रमाबाईंना म्हणतात, 'मला तुमच्या या मनाची चांगली कल्पना येऊ शकते. कारण मी हिंदू धर्माचा खूप अभ्यास केला आहे. या धर्मावर मी मनःपूर्वक प्रेम केलंय. मी ख्रिश्चन असून मनानं हिंदूच आहे. तुमच्या बाबतीत बोलायचं तर तुम्ही हिंदू होता, तेव्हा मनानं हिंदूच आहात... खरंय ना?'

'खरंय अंकल, तुम्ही माझ्या मनाचं नेमकं वर्णन केलं'. रमाबाई म्हणाल्या.

मला वाटतं, या ओळीत रमाबाईंनी ख्रिश्चन धर्म का स्वीकारला याचं उत्तर मिळतं. आपल्या धर्मात हिंदू स्त्रीला न्याय मिळणार नाही, ख्रिश्चन धर्म वेश्येला, पतितेला सुद्धा मानानं जगायचा हक्क देतो.

परधर्माची ही मनोभूमिका त्यांच्या कार्याची ऊर्जा होती. उद्धार करायचा होता हिंदू स्त्रीचा, हिंदू

विधवेचा, पतितेचा, छळल्या गेलेल्या जिवाचा. त्यासाठी पैसा हवा होता. तो अमेरिकेत हिंडून, हिंदू स्त्रीच्या हलाखीचं वर्णन करून त्यांनी गोळा केला.

रमाबाई सगळ्या आघाड्यांवर एकट्या लढत होत्या. त्यांच्या सोबतीला आपण जावं; त्यांचं एकाकीपण दूर करावं असं मला फार वाटलं. म्हणून मी राधावहिनी या पात्राची योजना केली. त्यालाही सत्याचा आधार आहेच. रमाबाईंच्या थोरल्या भावाचं, श्रीनिवासचं लग्न झाल्यावर लगेचच बायको टाकली होती. तीच ही राधा. हजारो मैल पायी प्रवास करताना रमाबाईंची गाठ पडली ती ही राधा. ही राधा, थोरली वहिनी, रमाबाईंच्या चुका दाखवते. त्यांच्या दोषांवर नेमकं बोट ठेवते. मायेनं चार गोष्टी करायला लावते. जीव लावते. त्यांना आणि मनोरमेला पण.

रमाबाईंच्या आयुष्यात घडलेल्या घटनांची मी मोडतोड केली नाही किंवा त्यात भर पण घातली नाही. घातली ती रमाबाई रानडे यांच्या अक्षय स्नेहाची, मैत्रीची. ही मैत्री दोनचार ओळींच्या सत्य घटनेच्या आधारे परिपूर्ण रंगवली. या एकट्या, एकाकी जिवाला विश्वासानं माथा टेकवता येईल, आपला मनस्वीपणा बाजूला ठेवून रडता येईल अशी मैत्रीण म्हणजे रमाबाई रानडे.. या दोन सारख्या तोलामोलाच्या रमाबाईंची मैत्री मी शेवटच्या पानापर्यंत वाढती ठेवली. राधेच्या, रमाबाई रानडे यांच्या रूपानं मी माझ्या या नायिकेशी माझं नातं जोडून ठेवलं. त्या तेजस्वी डोळ्यांच्या आड रोखलेले आसू टिपून घेतले.

१९८६ च्या जानेवारीच्या अंकापासून 'माहेर' मासिकात दीड वर्ष या कादंबरीची एकेक प्रकरणं क्रमशः छापून आली.

वाचकांनी मनःपूर्वक स्वागत केलं. पत्रं आली. प्रत्यक्ष भेटून खुशी व्यक्त केली. १९८९ मध्ये पॉप्युलर प्रकाशनानं ही कादंबरी मोठ्या आपलेपणानं छापली. १९९२ मध्ये दुसरी आवृत्तीही प्रसिद्ध झाली. १९९० साली कलकत्त्याच्या भारतीय भाषा परिषदेनं 'रमाबाई'ची पुरस्कारासाठी निवड केली. महाराष्ट्र साहित्य परिषदेनं पण पुरस्कार देऊन गौरवलं. अलिकडेच रमाबाईंचं मी हिंदी रूपांतर केलं आहे. ते अलाहाबादच्या लोकभारती प्रकाशनानं छापलं आहे.

रमाबाई पुस्तकाचं जवळजवळ सगळ्या मराठी वृत्तपत्रांनी स्वागत केलं असं म्हणता येईल. ७ नोव्हेंबर १९८९ च्या The Hindu मध्ये डॉ. प्रभाकर माचवे यांनी 'रमाबाई'वर अभिप्राय लिहिताना लिहिलंय : The writer has done justice to the struggle against odds which the poor Brahmin girl had to undergo. The author in nowhere sentimental and yet as effectively suggertive. (The novel need to be translated in English, Hindi Bengali & Tamil. It should be turned into television serial by some adaptation experts.)

Jyotsna's art of fiction has now ripened fully, which had flowered in her earlier KALYANI. Let this work win her many laurels. The book shows genuine sympathy of the Hindu for Christian human values being common. The etching of the characters is very fine.

मराठीतल्या कविश्रेष्ठानं या कादंबरीबद्दल आपला अभिप्राय स्वहस्ते पत्रानं लिहून कळवला.

त्याचा आनंद आजवर तितकाच ताजा आहे. परिपूर्ण आहे.

दि. २१ -२ -९१ च्या पत्रात वि. वा. शिरवाडकर - तात्या लिहितातः

"कादंबरी काल वाचून संपवली. केडगावच्या फलाटावर एकटी उभी असलेली रमाबाई अद्याप डोळ्यासमोर उभी आहे. तिच्या सर्व यातनांसह, अभेद्य निष्ठांसह आणि भेदक निळ्या डोळ्यांसहही. कादंबरी मला आवडली. लेखन उत्तमच झालं आहे. या कथेत विचारांचा भागही अपरिहार्य पण महत्त्वाचा. तोही तुम्ही समर्थपणानं पण क्लिष्ट होऊ न देता कथेत गुंफला आहे. (उदा. मोक्षमुल्लरशी झालेलं बोलणं). तुमचा शोध सफल झाला आहे. आणि आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासातील एक तेजोमय अद्‌भुत व्यक्तिमत्त्व तुम्ही कायमचं सजीव करून ठेवलं आहे. एक वाचक म्हणून तुम्हाला मनापासून धन्यवाद."

ता. २१ मार्च १९९० रोजी डॉ. नरेश कवडी यांनी भरगच्च इनलँड पाठवून 'रमाबाई' कादंबरीविषयी आपली खुशी हातचं राखून न ठेवता प्रकट केली आहे. "आपल्या पद्धतीनं रमाबाईंचा आपण घेतलेला शोध वेधक झाला आहे. हे चरित्र नसून ती एक कलाकृती आहे हे भान कुठेही सुटलेले नाही, आणि कलाकृतीचे यश त्यातील विविध रसांचा प्रत्यय वाचकांना आणून देण्यातच असतो हे मानले तर आपल्या कादंबरीला स्पृहणीय यश मिळाले आहे असे मला वाटते."

ता. ५ मे १९९० च्या 'केसरी'मध्ये डॉ. त्रिमूर्ती यांनी लिहिलंयः "मराठी साहित्यातील चरित्रात्मक कादंबऱ्यांत ही कादंबरी अग्रक्रम पटकावणारी आहे असे म्हटल्यास ते फारसे चूक ठरणार नाही. मला तर रणजित देसाई यांच्या 'स्वामी' कादंबरीनंतर, त्यांच्यापेक्षा कितीतरी पटीनं ज्योत्स्नाबाईंच्या या कादंबरीनं भारावून टाकले."

दै. लोकसत्ताच्या ७-१-९० च्या अंकात वि. वा. पत्की यांनी लिहिलंय : "ज्योत्स्ना देवधर यांनी रमाबाईंच्या कृतार्थ जीवनाचे दर्शन स्वतः त्या जीवनाशी समरस होऊन अशा काही चातुर्यानं शब्दांकित केले आहे की ही कादंबरी वाचून खाली ठेवताना वाचकाचे मन कासावीस झाल्यावाचून राहात नाही. म्हणून ज्योत्स्नाबाईंच्या यशाची ही पावतीच म्हणावी लागेल."

सुप्रसिद्ध समीक्षक शंकर सारडा यांनी 'साप्ताहिक सकाळ' मध्ये प्रदीर्घ परीक्षण लिहून 'रमाबाई'ला श्रेय दिले आहे. ते म्हणतात, "पंडिता रमाबाईंच्या जीवनातला अंतर्विरोध हा गेल्या शतकातल्या भारतीय व महाराष्ट्रीय सुशिक्षित स्त्रीपुरुषांच्या मानसिक ओढाताणीची व मूल्यात्मक संदिग्धतेची विविध परिमाणे प्रकट करतो. ज्योत्स्ना देवधरांनी आपल्या रमाबाई कादंबरीत ही वेगवेगळी परिमाणे अत्यंत समर्थपणे पकडून एकोणिसाव्या शतकातील एका कर्तृत्ववान, कृतिशील आणि आपल्याला पटलेल्या विचाराप्रमाणे वागू पाहणाऱ्या, तत्कालीन समाजमान्य चाकोरीबाहेर जाऊन जगण्याचे धारिष्ट्य दाखविणाऱ्या एका बुद्धिमान स्त्रीच्या शोकांतिकेचे वेगवेगळे पदर उलगडून दाखवले आहेत."

गेल्या दशकातील महत्त्वाच्या १०० पुस्तकांत 'रमाबाई'चाही समावेश महाराष्ट्र टाईम्सने केला होता. मराठवाडा, विदर्भ, गोवा, पुणे, मुंबई, नासिक येथील जवळजवळ सगळ्या मराठी वृत्तपत्रांनी रमाबाईची दखल घेतली. अनुकूल असे अभिप्राय सर्वत्र आले.

हे सगळं मला सुखावणारं, आत्मविश्वास देणारं नक्कीच ठरलं. केल्या कष्टांना यश मिळालं याचा

आनंद तर नक्कीच झाला . पण त्याहीपेक्षा जे मिळालं ते मला माझ्या या उतारवयात , सरत्या आयुष्यात फार मोलाचं वाटतं .

ते म्हणजे , रमाबाईंनी आपल्या जगण्यानं मला जगण्याचं बळ दिलं . अनेकांच्या संसारात मृत्यू , आघात संकटं येतात तशी माझ्याही आयुष्यात आली पण खचून न जाता , केविलवाणं न होता , हार मानून थकून न जाता स्वबळावर जगण्याचा मंत्र रमाबाईंनी मला दिला .

प्रिय रमाबाई , मी तुमची आभारी आहे . फार फार आभारी .

ज्योत्स्ना देवधर , १२०५- ९ शिवाजी नगर , पुणे ४११००४ . फोन ३२१६९०

## नवे आजीव सभासद

### पुणे

यशवंत गणेश कुलकर्णी | यल्लेश अशोकसा रंगापुरे | अलका अभय भोपटकर
रजनी क्रांतीनाथ रायखेलकर | क्रांतीनाथ विश्वंभर रायखेलकर | अनुपमा शिरीष बर्वे
मधुसूदन हरी भाटे | राजीव दत्तात्रय बर्वे | सुभाष बापूराव भगली
धैर्यशील बाबूराव शितोळे | सुजाता शिवराज देशपांडे | दीप्ती विजय जोशी
चंद्रकांत मिसाळ | तृप्ती माधव सोमण | अलका जयंत ताडफळे
भार्गव पद्माकर आगाशे | मधुकर हरी कुलकर्णी | सूर्यकांत गंगाधर काटकर
मधुमालती हणमंत करंवळेकर | अरुंधती सरदेसाई | सुचेता श्रीनिवास वैद्य
सुरेश आबाजी खोपडे | दीपांजली पांडुरंग जाधवराव

### पुणे जिल्हा

अनिल गंगाधर कुलकर्णी | ज्योती वसंत पाठक | विजया दत्तात्रय गाटे
अनिल रत्नपारखी | ध्रुव मोहनलाल आगरवाल
माणिकराव लालासाहेब (निगडे) देशमुख

### अहमदनगर

सी . बी . चाणोदिया | दत्तात्रय उद्धव जोशी | सुनीता रमेश भांगेपाटील
विजय सावळेराम वोठे | किशोर मोहनलाल मरकड | दशरथ सखाराम खोसे
माधुरी सुधीर हुद्देदार | रत्नमाला श्रीधर साखरे (चिंचपुरे हजरे)

### पाथर्डी

सुनील भगवान वडे | गंगाधर तोलाजी गायकवाड | विष्णू शामा वोरले
विक्रम सखाराम पालवे | शंकर श्रीधर राऊत | राजेंद्र प्रसन्नकुमार शेवाळे
अविनाश गोपाळकृष्ण मंत्री

### लासलगाव

भास्करराव कोंडाजी कदम | अनिता शिरीष गंधे | ए . पी . गद्रे
अजित सावद्रा | राजेंद्र गंगाविसन भुतडा

### डोंबिवली

मीना मु . गोडखिंड | विद्या र . वैशंपायन | सच्चिदानंद सुरेश शेवडे
शकुंतला श्रीराम मुळ्ये | सुरेश कृष्णराव पाटील | श्रीधर काणे
प्रभाकर भिडे | माणिक राजे | अशोक मोडक
राम मुंगी | संजय कुलकर्णी | लक्ष्मी देव



अनुक्रमणिका

व. पु. काळे

# पार्टनर

कोणत्याही साहित्यनिर्मितीच्या मागची प्रेरणा, कार्यकारणभाव, थोडक्यात जन्मकथा, तिचं मूळ शोधत राहण्यापेक्षा, नवी निर्मिती करावी. चर्चेसाठी किंवा अशाच एखाद्या लेखासाठी खोदकाम करावं. पण ते काही खरं नाही. 'खोदकाम' शब्दाचं नातं, 'केबल फॉल्ट', किंवा 'फुटलेल्या पाईपलाईनशी' आहे. निर्मितीची मुळं शोधणं खरंच अशक्य आहे.

'सुचणं' ही प्रोसेसच मानवी नाही. 'रचणं' कदाचित त्याच्या हातात असेल. नुकतंच डिस्कव्हरी चॅनेलवर सतराशे सालापासून त्या काळातले अल्केमिस्ट सोन्याचा शोध लावण्यासाठी कसकसे आणि किती वर्ष कष्ट करीत होते, ते प्रयोग दाखवण्यात आले. घरोघरी लहान थोरांनी निदान ह्या एका चॅनेलसाठी तरी टी.व्ही. बघावा. सतराशे सालातल्या त्या शास्त्रज्ञांना भले सक्तमजुरी, जन्मठेप, फाशीपर्यंत शिक्षा झाल्या असतील, पण त्यांच्या प्रयोगशाळा आणि ग्रंथसंपदा आजतागायत जतन केलेल्या आहेत. 'युरोप मेरा महान' अशा पाट्या ह्या देशांना लावाव्या लागत नाहीत. खरं तर 'डिस्कव्हरी चॅनेल' हा स्वतंत्र लेखनाचा विषय नसून, प्रत्यक्ष पाहण्याचा आहे.

अल्केमिस्ट एपिसोडमध्ये बहुतेक शास्त्रज्ञांना स्वप्नं पडली. त्या प्रतीकात्मक स्वप्नांतून त्यांना संशोधनाची प्रेरणा मिळाली. त्यांनी घेतलेल्या कष्टांचा मागोवा, प्रत्यक्ष प्रयोग करताना घेतलेले कष्ट आणि त्यावर भाष्य करणारा निवेदक, सगळं अलौकिक होतं. दोनशे वर्षे त्या वस्तू जतन करणं हीच संस्कृती - महाराष्ट्रात 'कट्यार काळजात घुसली' नाटकाची कॅसेटही दु(र्दैव)रदर्शन पुसून टाकतं. ते नाटक म्हणजे वसंतराव देशपांडे ह्यांच स्मारक होतं.

अर्थात् मुख्य आणि मूळ तत्त्व ह्याचीच ग्वाही देतं, की निर्मितीमागची प्रेरणा अतींद्रिय कोटीतलीच असते. मादाम क्यूरी पण त्याला अपवाद नाही.

तेव्हा नेमक्या कोणत्या शब्दांत मनातला भाव प्रकट करावा मोठा प्रश्न आहे.

मी लिहिणार आहे 'पार्टनर' ह्याच कादंबरीवर. कारणं दोन.

पहिलं कारण, मी त्याच कादंबरीत एका प्रसंगी पार्टनरच्या तोंडून वदवलेलं वाक्य.

AS YOU WRITE MORE AND MORE PERSONAL, IT BECOMES MORE AND MORE UNIVERSAL.



अनुक्रमणिका

ह्याचा अर्थ कादंबरीतला प्रत्येक प्रसंग माझ्याच आयुष्यात घडायला हवा, असं नाही. तसा तो घडलेला पण नाही. आणि तरीही 'पार्टनर' कादंबरी म्हणजे माझी आत्मकथा आहे.

दुसरं कारण आहे, ते कादंबरीतल्याच दोन प्रतीकात्मक प्रसंगाचं. किंबहुना त्या दोन हकीकतीच प्रेरणादायक ठरल्या असतील. 'आपल्याला हवा तेव्हा तिसरा माणूस न जाणं हाच नरक' हा कादंबरीचा प्रारंभ. ह्या प्रतीकात्मक लघुतमकथेपासून 'राजपुत्र आणि त्याची प्रेयसी' दोघांना एकमेकांना तीन दिवस करकचून जखडून टाकलं. एकमेकांशिवाय जगू न शकणारे ते दोन जीव, तिसऱ्या दिवशी एकमेकांचा जीव घेण्याच्या अवस्थेपर्यंत आले होते. ह्या हकीकतीपर्यंत ही दोनच रूपकं मनात घोळत होती.

ह्या दोन रूपकांना वाचकापर्यंत नेणारा एक 'पार्टनर' हवा असावा.

आत्ता हे सगळं लिहिताना अगदी ह्याक्षणी मनात एक विचार आला. हा विचार येणार आहे, हे अलिकडच्या क्षणाला माहीत नव्हतं. कादंबरी (आणि कथेतही) जी मतं किंवा विचार ठामपणे मांडले जातात, ते विचार 'कसे सुचले?' ह्याचा शोध घेताना मात्र 'बहुधा हे कारण असावं' अशा संदिग्ध भाषेतच मत मांडावं लागतं.

तेच 'पार्टनर' च्या बाबतीत, ती आत्मकथा असूनही म्हणावं लागत आहे. म्हणूनच त्या लिखाणाला 'आत्मकथा' न म्हणता 'आत्मव्यथा' म्हणणं जास्त सयुक्तिक ठरेल.

दोन सख्या पोटच्या मुलात डावंउजवं करणारे अनेक परिवार मी पाहिले. त्या मुलांमध्ये, त्यामानानं जो जीव उपेक्षित वाटला, तो माझा केंद्रबिंदू ठरला. माझ्या स्वतःच्या घरी माझं चार ओळींचं पोस्टकार्ड जरी आईनं वाचलं तरी तो विषय कौतुकाचा ठरायचा. केवळ परिस्थितीपायी माझी आई आजतागायत माझ्या मोठ्या बहिणीजवळ राहिलेली आहे. अशा प्रसंगी अतिसहवासानं मनं विटतात तरी किंवा जास्त एकरूप होतात. एकमेकांच्या स्वभावाची अंतर्बाह्य ओळख दोन्ही अवस्थांमधे होते हे निर्विवाद. आई केवळ भौगोलिक अंतरावर राहिली असं नाही. मानवी स्वभावानुसार जो अंतरावर असतो त्याच्याबद्दल जिव्हाळायुक्त काळजी आणि ज्यांच्याजवळ राहतो त्यांच्याबद्दल सहवासानं वाटणारं प्रेम अशा तणावात सगळे जगतात.

जिथं आहे तिथं न रमतं ते मन.

अशा शापित मनाचा मी 'काळे घराण्यातला' सम्राट. फोटोग्राफी, संगीत, लेखन, कथन आणि आवडलेल्या गोष्टींचा संग्रह करणं, वेगवेगळ्या विषयावरच्या रजनीशांच्या तीनशे कॅसेटस, संगीताच्या आणि माझ्या कार्यक्रमाच्या जवळ जवळ तेवढ्याच कॅसेटस, त्यांची मांडणी करणं, मधेच स्वयंपाकातला एखादा नवा पदार्थ करून बघणं, शिवाय कौटुंबिक समस्येवर सल्ला विचारीत येणारे अनोळखी वाचक, कुणाचं तरी इंटेरियर डेकोरेशन करून देणं, ग्रीटिंग कार्डसूचा वापर करून कॅसेटस ठेवण्यासाठी, विषयानुसार बॉक्सेस करणं, प्लंबिंगपासून वायरिंगपर्यंतची कामं करणं आणि स्वतःच्या घरात आजही काही ना काही सोयी करत राहणं हा दिनक्रम. तसाच हा शापही. हार्मोनियम वाजवत असताना 'आत्ता व्हायोलिन का वाजवायचं नाही' हा मनात विचार. एखादी कथा लिहिताना एखादी निगेटिव्ह शोधायची लटक.

'जे करीत आहोत, त्यातच जे रमत नाही' ते म्हणजे मन.

आता हार्टडिसीझपायी मुक्तीच मिळाली आहे. कशातच मन रमत नाही. उभारी गेली की फार भारी पडतं.

माझ्या आईच्या मनाची तडफड मला समजू शकते म्हणूनच पार्टनरऐवजी किरणला समजावण्याचा प्रयत्न श्री करतो. किरण श्रीला विचारते, 'तुमच्या आईच्या ह्या वागण्याचा तुम्हाला राग येत नाही?'

तेव्हा श्री म्हणतो, 'असं वाटतं, एक व्यक्ती आहे. आई असं नाही; JUST A HUMAN BEING. तर त्या व्यक्तीला अमुक अमुक घडावं असं वाटतं. ते घडत नाही. त्याला कुणाला तरी खूप काही काही द्यावसं वाटतं. ते त्याला देता येत नाही. स्वतःच्या अंगात काही घडवून आणण्याची ताकद नाही. केवळ परिस्थिती नाही म्हणून ह्यातलं काही जमत नाही. अशाच अनेक व्यक्तींपैकी माझी आई. अरविंदला मिळावं ही ओढ. माझ्याजवळ सरळ मागायची हिंमत नाही. स्वतःच्या मालकीचं काही नाही. मग तिला अशा काहीतरी कल्पना लढवाव्या लागतात. ही सर्कस तिला कायम करावी लागणार. नव्या मार्गांनी, आपल्यापासून लपवून, छपवून तिला अरविंदवर प्रेम करावं लागतं. ह्याचाच तिला केवढा मनस्ताप होत असेल. आणि हे सर्व करूनही तिला सुख नाही. ह्याचं वाईट वाटतं.

आता अशी ही मानसिक ओढाताण फक्त श्रीच्या आईचीच होती का?

१९३४ सालाच्या आसपास ललितकलादर्श नाटक कंपनीचा पडता काळ होता. बापुराव पेंढारकरांसारखा सत्शील निर्माता आर्थिक कात्रीत सापडला होता. माझ्या वडिलांची सगळी भिस्त 'ललितकलादर्श' वर होती. 'पेंढारकरांवर फिर्याद करा' असा सल्ला देणारी माणसं, प्रेमापोटीच बोलत होती. त्याही परिस्थितीत वडील म्हणायचे, 'माझ्याकडे आत्ता पाच हजार रुपये असते तर, मीच ते पेंढारकरांना दिले असते.

१९३४ साली मी दोन वर्षांचा होतो. वडिलांच्या मनाचा हा मोठेपणा मला आईकडून समजला. भविष्यकाळात मी लेखक होणार आहे, ह्याची चाहूलही नव्हती. पार्टनर १९७७ सालातली. पण 'दुसऱ्याला काही द्यावं, तर स्वतःच्या मालकीचं काही नाही', ह्या एका विधानात माझ्या वडिलांची सुद्धा तळमळ नव्हती का?

केवळ वडिलांचीच तळमळ असं का म्हणू? दानत आहे, पण ऐपत नाही, अशा अनेकांची व्यथा ह्या एका वाक्यात नाही का? अशी अनेक माणसं मी पाहिली इतकंच नव्हे, तर स्वतःच्या दोन सख्ख्या मुलांत, डावं उजवं करणारी, तुलना करणारी, दोघांपैकी एकालाच उजवं माप देणारी अनेक जोडपी मी पाहिली. माझ्या मुलाचा एक मित्र. त्याचे आईवडीलही आमच्या परिवारावर लोभ करणारे. मी आणि सुहासने, स्वाती-वसुंधरेसहित अचानक त्यांच्या घरी जावं, रात्रभर हार्मोनियम वाजवून कोणत्याही रात्रीची कोजागिरी करावी असा स्नेह. सुहासप्रमाणेच त्याच्या मित्राचं लग्न झालं. दोघांच्याही घरी पाळणे हलले. मुलांचे वर्ष वाढदिवस झाले. केव्हातरी सुहासचा मित्र म्हणाला, 'माझ्या वडिलांनी आजतागायत माझ्यावर प्रेम केलं नाही, लहानपणी कधी फिरायला नेलं नाही, अभ्यास घेतला नाही, सगळा वर्षाव माझ्या भावावर केला. पण आता ते माझ्या मुलाला एक क्षण डोळ्यासमोरून हलू देत नाहीत. त्यांनी नोकरीही सहा महिने अगोदर सोडली. ते माझ्या मुलाला तळहातावर झेलताना मी जेव्हा पाहतो तेव्हा मीच एक वर्षाचा झालेलो असतो.

खरं तर आईची व्यक्तिरेखा अशी रेखाटली म्हणून मला असं वाटलं होतं, की वाचकांच्या प्रतिक्रिया

अत्यंत प्रतिकूल स्वरूपात येतील. कवी यशवंतांपासून सानेगुरुजींपर्यंत सगळ्यांनी मातृत्वाचे गोडवे गायले आहेत. 'आई' हा शब्दच किंवा ही संकल्पनाच परमेश्वराच्या खालोखाल मानली गेली आहे. म. भा. चव्हाणने तर चार ओळीत मातृत्वाची भव्यता सांगितली आहे.

'आई नावाची वाटते
देवालाही नवलाई
विठ्ठलही पंढरीचा
म्हणे स्वत:ला विठाई.

केव्हा तरी 'आई' ह्या शब्दाबद्दल मी सुद्धा अशीच फोड केली होती, 'आभाळातला आ, ईश्वरातली ई' त्या दोन व्यंजनांच्या आधारावर 'आई' उभी राहते. प्रत्येक माणूस हा प्रथम माणूसच असतो. नात्याचं बंधन आलं की जबाबदारीची ओझी डोक्यावर येतात.

'Every relation is a concept and every individual is a reality.' त्या एका दृष्टिकोनातून मातृत्व प्राप्त झालेली व्यक्ती एक माणूसच आहे, हे आपण विसरतो. म्हणूनच आई म्हटलं, म्हणजे क्षमाशीलता हा तिचा धर्म, सहनशीलता ही तिची वृत्ती आणि संसाराचा सांभाळ करणं हे तिचं कर्तव्य ठरतं. मुलांचं संगोपन हा जेवढा कौतुकाचा भाग आहे तेवढाच तो एक 'मोनोटोनस' दिनक्रम आहे. 'जा, जरा बाहेर खेळून ये' असं म्हणत प्रत्येक आई केव्हा ना केव्हा आपल्या मुलाला बाहेर पिटाळते. ह्याचा अर्थ त्या क्षणी ती मातृधर्म विसरली का? खरं तर कोणतंही नातं एकदा कपाळावर चिकटलं म्हणजे गोंदण केल्याप्रमाणे ते मरेपर्यंत कातडीचाच एक भाग होतं. गोंदण म्हणजे प्रतीक. आपण नंतर कायम फक्त प्रतीकालाच महत्त्व देत राहतो. त्याच्यामागे माणूस आहे, हे आपण विसरतो.

पार्टनरमधील आई ही एक अस्थिर, कायम घाबरलेली अशी व्यक्तिरेखा आहे. स्वत:च्या बळावर काहीही करायची हिंमत नसताना तिला आपल्या दोन मुलांत प्रेम टिकावं ही पण इच्छा आहे आणि त्याच वेळेला चांगुलपणाचं श्रेय आपल्याला मिळावं, ही तिची धडपड आहे. तिच्याजवळ थोडी जरी पात्रता असती तर तिला ते श्रेय आपोआप मिळालं असतं. पण त्याच वेळेला तिचा चंचल स्वभाव तिला स्वस्थ बसू देत नाही. अरविंद कायम आजारी म्हणूनच परावलंबी. श्री स्वहिंमतीवर उभा राहिलेला माणूस. म्हणून आईच्या मनात श्री बद्दल एक अनामिक दहशत आणि परावलंबी अरविंदबद्दल जिव्हाळा. पण त्याच वेळेला 'आईला आपल्याबद्दल काही वाटत नाही' असा श्रीचा प्रयत्न आहे.. माझ्याच एका परिवारातलं एक उदाहरण त्यावेळेला माझ्या डोळ्यासमोर होतं. त्या परिवाराचं आडनाव घारपुरे. घारपुऱ्यांना दोन मुलं : एक मुलगा, एक मुलगी. मुलाचा कोल्हापूरात व्यवसाय आणि मुलीचं सासर सांगलीमध्ये. सौ. घारपुरे दोघांकडे जाऊन येऊन असत. एका मुक्कामात त्यांनी मुलाला सांगितलं, 'बहिणीला अधूनमधून माहेरपणाकरता बोलवत रहा. ती एकटी पडते.' मुलानं उत्तर दिलं, 'भावाच्या घरी येण्याकरता आमंत्रणाची अपेक्षा कशासाठी? पत्र काय पाच मिनिटात लिहिता येईल.' असं म्हणून त्याने पत्र टाकलंही. मुलीची मुलं सांभाळायची म्हणून घारपुरेबाई सांगलीला गेल्या. भावाचं आलेलं पत्र मुलीने अभिमानाने दाखवलं. आपल्या अस्तित्वाचं महत्त्व पटवण्याकरता घारपुरे मुलीला म्हणाल्या, 'तो कसला पत्र पाठवतोय? मी जेव्हा सांगितलं, तेव्हा

हे चार ओळीचं पत्र तुला आलं.

अर्थातच बहीण भावाकडे रहायला गेली नाही. नातं जोडण्याच्या धडपडीत, केवळ स्वतःच अस्तित्व टिकवायचं म्हणून घारपुऱ्यांनी जी भूमिका घेतली, त्यामुळे बहीण भावापासून आणखीन अंतरावर गेली. अशी घरं अनेक आहेत. स्वतःचं अस्तित्व अबाधित राहावं म्हणून श्रीच्या आईप्रमाणे अनेक आया आपल्या परिवारात ह्या पद्धतीनेच वागत असतील.

पार्टनर प्रकाशित होईपर्यंत आईच्या व्यक्तिरेखेबद्दल नाराजीची असंख्य पत्रं येतील असं मी धरून चालली होतो. ह्या उलट त्याच एका व्यक्तिरेखेचं सर्वात जास्त कौतुक झालं. १९७७ साली लिहिलेली कादंबरी सातत्याने वीस वर्ष वाचली जात आहे. त्याबद्दलचं माझं नवल अजून ओसरलेलं नाही. सध्या बाजारामध्ये ह्या कादंबरीची सातवी आवृत्ती उपलब्ध आहे. आजही वाचक पत्रांतून आपलं मत व्यक्त करताना म्हणतात, 'तुम्ही आमच्याच घराचं चित्रण केलेलं आहे.'

कोणतीही कथा वा कादंबरी लिहित असताना, आपल्या डोळ्यासमोर कुणाचाही चेहरा नसतो. म्हणूनच 'कुणाला डोळ्यासमोर ठेवून ही व्यक्तिरेखा रंगवली' ह्याचं उत्तरही देता येत नाही. आपल्या मनातल्या व्यक्तिरेखेला अनेक प्रवाह येऊन मिळतात. म्हणूनच त्या व्यक्तीची भव्यता लेखकाच्या प्रतिमेवर आणि वाचकांच्या कल्पनाशक्तीवरच अवलंबून असते. अत्यंत गाजलेल्या कथाकादंबऱ्यांमधून काही चित्रपट निर्माण झालेले आहेत. छायाचित्रण, नेपथ्य, संगीत, अभिनय, ध्वनिमुद्रण एवढी माध्यमं उपलब्ध झाल्यावर त्या व्यक्तिरेखा कथाकादंबरीला छेद देऊन वेगळ्या उंचीवर जायला हव्यात. तसं क्वचित घडतं. वाचकांच्या मनात निर्माण झालेल्या प्रतिमेपर्यंत पडद्यावरचा कलावंत पोहोचत नाही.

मी ह्या बाबतीत खूप भाग्यवान ठरलो. पार्टनर कादंबरी रंगमंचावर कधी साकार होईल हे माझ्या ध्यानीमनी नव्हतं. दिलीप कोल्हटकर ह्यांनी 'नाट्यांबरी'सारखा वेगळा आविष्कार प्रेक्षकांसमोर सादर केला. ह्या नाटकाने व्यावसायिक यश मिळवलं नाही. पस्तीस प्रयोगानंतर सुरेंद्र दातार ह्यांनी नाटक बंद करायचं ठरवलं. पण तोपर्यंत आम्हां सर्व कलावंतांच एक कुटुंब तयार झालं होतं. 'ह्या नाटकाचा प्रयोग करताना आम्हांला स्वतःला एक वेगळा आनंद मिळतो. शंभर प्रयोग झाल्याशिवाय नाटक बंद करायचं नाही. आम्ही विनामूल्य काम करू.'

कलावंतांचं संहितेवर प्रेम बसलं ह्याचं कारण प्रत्येक कलावंत त्याच्या परिवाराकडून ह्या ना त्या स्वरूपात काहीतरी निमित्तानं दुखावला गेला होता. नाट्यांबरीच्या सहाय्यानं त्यांच्या वैयक्तिक व्यथा समाजासमोर मांडण्यासाठी 'पार्टनर'सारखं कलात्मक माध्यम त्यांना गवसलं. त्या त्यांच्या वैयक्तिक व्यथा मला माहीत आहेत. देवधरांची भूमिका करणाऱ्या शशी जोशींनी नाशिकला प्रेक्षकांसमोर सगळ्या कलावंतांची प्रकट मुलाखत झाली तेव्हा सांगितलं, 'आत्तापर्यंतच्या आयुष्यात अमाप कष्ट करूनही मी एका खोलीत संसार करतोय, पण नाटकात मला बिल्डरची भूमिका मिळाली. मन अंशतः शांत झालं.'

जोशींचं प्रकट चिंतन ऐकून माझ्या डोळ्यात पाणी आलं.

आर्थिक परिस्थिती बेतासबात असल्यामुळे सुरेंद्र दातार ह्यांच्यासारख्यानं 'पार्टनर' नाटकाचं निर्माता व्हावं, हे शिवधनुष्य होतं. अबोल, वक्तशीर, व्यवसायाशी प्रामाणिक असलेल्यावर 'लक्ष्मी'

प्रसन्न होत नाही, ह्याचं प्रत्यंतर आलं.

नाट्यांबरीचं संपूर्ण श्रेय आणि संकल्पना, प्रतिमा, दिलीप कोल्हटकरांची. लोकनाट्याच्या अंगानं जाणारा 'नाट्यांबरी'सारखा स्वतंत्र आकृतिबंध जर यशस्वी झाला, तर कोणतीही उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिती, वाचन कमी झालेल्या समाजापर्यंत नेता येईल. एवढं विशाल स्वप्न ह्या दिग्दर्शकानं बाळगलं होतं. पत्रकारांच्या लेखणीपायी, त्या स्वप्नाचा अभिमन्यू झाला. 'नाट्यांबरी' ह्या फॉर्मचं महत्त्व आणि गरज फक्त माधव मनोहर आणि सुधीर दामले ह्यांनी ओळखली. मी तर माधव मनोहरांचं परीक्षण वाचण्यापूर्वी, चिलखत आणि शिरस्त्राण घालून बसलो होतो. पण नंतर लक्षात आलं की ही दक्षता मी कमलाकर नाडकर्णींचं परीक्षण वाचताना घ्यायला हवी होती.

A CRITIC IS AN UNSUCCESSFUL ARTIST, हे वसंत बापटांनी ऐकवलेले विधान मला पटलं.

"मुळात 'पार्टनर' कादंबरी इतकी वर्षं वाचली का गेली, हेच मला समजलं नाही" असं म्हणत नाडकर्णींनी कादंबरीच्या 'लेआउट' पासूनच कुऱ्हाड उचलली. कादंबरीची छपाई आणि नाट्यप्रयोग ह्याचा एकमेकाशी काय संबंध? नाडकर्णी यांच्या अनेक परीक्षणांबद्दल हेच म्हणावं लागतं, 'त्याच्या प्रतिभेची खोली तो लेखनाच्या लांबीनं भरून काढतो.'

भावनाप्रधान कलावंत कोणत्या आधारावर सावरतो ते सांगणं 'आत्मश्लाघा' ह्या वर्गात, नाडकर्णींसारखेच समीक्षक टाकतील. पण ज्यांनी सावरलं त्यांचा निर्देश करून ऋणमुक्त होण्यासाठी ही अशीच एखादी संधी मिळते. माझ्यातला पार्टनर मला सांगतोय, 'बेवकूफ, डरतोस काय? ज्यांनी तुझं कौतुक केलं, तो प्रतिभावंत निर्भीड आहे, म्हणूनच एकटा पडलाय. मराठी साहित्य संमेलनातला शेवटचा मातब्बर अध्यक्ष. आता जे जे अध्यक्ष होतील, त्यापैकी एखादाच अपवाद वगळला, तर उरलेले महापौर ठरतील.'

विश्राम बेडेकर हे त्या प्रतिभावंताचं नाव. त्यांनी कौतुकापेक्षा मला मार्गदर्शन केलं. ते म्हणाले, 'नाट्यसंहिता जड आहे. एका चांगल्या विचारातून बाहेर पडायच्या आत, दुसरा तितकाच जड विचार आदळतो. ह्या नाटकात तुम्ही विनोदांची आणखी भर घातलीत तर त्यातलं तत्त्वज्ञान डायजेस्ट होईल.'

समीक्षा प्रकाशात होते. मार्गदर्शन विंगमधल्या परावर्तित प्रकाशात खरं तर अंधारातच होतं. 'हे नाटक व्यवसाय करील, असं मानू नका' ही बेडेकरांची आकाशवाणी ठरली. पण माझ्या मनाचं आकाश झालं, एवढं नक्की. एक कलावंतच दुसऱ्या कलावंताला घडवतो. समीक्षक कलावंताला घडवीत नाही. प्रथम निर्मिती घडते आणि त्या नंतरच समीक्षक. तेव्हा मुळातच समीक्षा हा परधार्जिणा वाङ्मय प्रकार आहे.

कलाकृतीतल्या व्यक्ती चित्रित करताना कोणताही चेहरा समोर नसतो, असं मी म्हणालो. पण माझ्या मनांत आईची जी काल्पनिक प्रतिमा होती, त्या प्रतिमेला सगुण साकार रूप दिलं ते सौ. ज्योत्स्ना कारखानीस ह्यांनी. भूमिका जिवंत करणे म्हणजे काय हे मी अनुभवलं. समीक्षाकारांनी 'अमुक अमुक कलावंताने भूमिका जिवंत केली' असं म्हणणं आणि खुद्द लेखकाने म्हणणं ह्यात जमीन अस्मानाचा फरक आहे. जमिनीमधून वर आलेलं झाड सर्वांना दिसतं. त्या झाडाकडे जितक्या माणसांचं लक्ष जातं ते सगळे रसिक असतात, प्रेक्षक असतात, समीक्षाकार असतात. पण त्या झाडाची मुळं फक्त



अनुक्रमणिका

मातीलाच माहीत असतात. मी त्या बाबतीत भाग्यवान ठरलो. आईच्या मूर्तीची प्रतिमा, म्हणजेच त्याची मुळं माझ्या मनोभूमीत खोलवर गेलेली होती. मुळं जीवनरस देतात. वृक्षाला सौंदर्य प्राप्त होतं जे जमिनीच्या वर आल्यावर. म्हणून मुळं देखणी नसतात. झाड बघत राहावं असं असतं. पार्टनर मधील आई भावरूपानेच माझ्यासमोर होती. भावाचं भावनेत रूपांतर केलं ते ज्योत्स्ना कारखानीस ह्यांनी! त्यांचा अभिनय पाहिला आणि कोणती आई मला मांडायची होती, हे त्यांनीच मला सांगितलं.

पार्टनरमध्ये काम करणाऱ्या सात माणसांपैकी सहा माणसं कुटुंबवत्सल होती. ह्याचा अर्थ ती सगळी व्यावसायिक कलावंत मंडळी नव्हती. अपवाद फक्त क्षमा राजचा. श्री. विलास राज ह्यांच्याबद्दलच्या अनेक हकीकती मी ऐकून होतो. आम्ही सगळेजण त्यांना टरकून पण होतो. म्हणून मी दातारांना म्हणालो, 'तुम्ही आमचं मानधन दिलं नाहीत तरी चालेल. पण क्षमा राज ह्या व्यावसायिक रंगभूमीवरच्या कलावंत आहेत. तेव्हा त्यांचं ठरलेलं मानधन तुम्ही त्यांना देत राहा.'

विलास राजना जेव्हा हे कळलं, तेव्हा ते आपणहून क्षमाला म्हणाले, 'तूही मानधन घेऊ नकोस. सध्याचा नाट्यव्यवसाय कोणत्या अवस्थेत चालला आहे हे एक निर्माता म्हणून मला माहीत आहे.

मी जेव्हा हे ऐकलं तेव्हा पार्टनर पुन्हा एकदा माझ्या कानात म्हणाला, 'घायल की गती घायल जाने, ह्याचा अर्थ तुला आता समजला का? एवढ्यासाठीच एखाद्याचं नाव ऐकलं रे ऐकलं म्हणजे त्याला लेबल चिकटवायचं नसतं.'

पार्टनर कादंबरीच्या निर्मितीबद्दल लिहिता लिहिता मला हे सगळं लिहावंसं वाटत आहे, त्याचं कारण एकाच कलाकृतीची ही अविभाज्य रूपं आहेत. आम्हां सर्व कलावंतांची नाशिकच्या प्रेक्षकांसमोर प्रकट मुलाखत झाली, तेव्हा मला एक प्रश्न विचारला होता, 'तुम्ही स्वतःला अभिनेता समजता का?' अर्थातच मी 'नाही' म्हणून उत्तर दिलं. मी हेही स्पष्ट केलं की कथाकथन हा वेगळा आविष्कार आहे आणि नाटकातून भूमिका करणं ही वेगळी कला आहे. दिलीप कोल्हटकरांनी माझी निवड केली, ती एवढ्याचसाठी की पार्टनर ही व्यक्ती नसून वृत्ती आहे आणि कादंबरी तुमचीच असल्यामुळे तुम्ही नाट्यसंहितेपलिकडचं स्वातंत्र्य आवश्यक तेव्हा घेऊ शकता. त्याप्रमाणे शंभर प्रयोगात मी त्या त्या वेळी येणारे विचार व्यक्त करून पुन्हा मूळ मुद्द्याकडे येऊ शकत होतो.'

मुलाखतीत दुसरा प्रश्न तयार होता, 'तुम्हाला ह्या भूमिकेसाठी कोणता कलावंत आवडला असता?'

क्षणाचाही अवधी न घेता मी जाहीर केलं, 'विक्रम गोखले.'

प्रेक्षकांनी टाळ्या दिल्या.

हेच विक्रम गोखले दूरदर्शनवरच्या पार्टनर मालिकेत त्या भूमिकेची वाट लावतील, असं मला वाटलं नव्हतं. एकदा चंद्रकांत गोखले माझ्या घरी माझ्याच आमंत्रणावरून गप्पागोष्टी करायला आले होते. रंगदेवतेशी प्रामाणिक अशी जी कलावंत मंडळी मागच्या पिढीत होऊन गेली त्यापैकी हे एक चंद्रकांत गोखले. आजच्या रंगभूमीवर काय चालतं हे सगळ्यांनाच ठाऊक आहे. श्री. चंद्रकांत गोखले ह्यांच्याशी मनसोक्त गप्पा झाल्या. वडिलांना न्यायला विक्रम गोखले आले. चंद्रकांत गोखले ह्यांच्यासमोर मी विक्रमला म्हणालो, 'बॅरिस्टरमधील तुमची भूमिका पाहिल्यावर मनातल्या मनात मी तुमच्या पायाला हात लावून नमस्कार केला होता. पार्टनरच्या भूमिकेसाठी तुमचं एकमेव नाव माझ्या डोळ्यासमोर होतं. तुम्ही त्या भूमिकेकडे अत्यंत लाईटली पाहिलंत आणि पार्टनरची वाट लावलीत

हे मी मुद्दाम तुमच्या वडिलांसमोर सांगतोय.'

दूरदर्शन मालिकेचा आजही कुणी उल्लेख करतो तेव्हा तो नाराजीनेच करतो. 'तुम्ही तुमच्या कादंबरीची अशी विल्हेवाट का लावून दिलीत?' हा प्रश्न अनेक पार्टनरप्रेमी वाचक मला विचारतात. त्यावेळेला विनय आपटे ह्यांच्यासारखा दिग्दर्शक मूळ कथानकच बदलेल हे माझ्या गावी नव्हतं हे मी कसं सांगू? कादंबरीत न रेखाटलेले प्रसंग मालिकेमध्ये दाखवून ह्या दिग्दर्शकाने 'कॅरेक्टर'लाच धक्का लावला. कादंबरीतले संवादच्या संवाद नव्वद टक्के उचलून चंद्रकांत मेहेंदळे आणि विनय आपटेचा भाऊ आपली नावं श्रेयनामावलीत संवादलेखक म्हणून घालतील हे अगोदर कसं कळणार? आजही ह्या गोष्टी त्यांनी का केल्या हे माझ्या आकलनाबाहेर आहे. एक गोष्ट नक्की, मूळ लेखकाशी किमान तो एक माणूस आहे इतपत त्याला मान द्यावा हा मोठेपणा ज्या माणसाजवळ नाही, त्याचं नाव विनय!

गेली वीस वर्ष मी सातत्याने वाचकांच्या एकाच प्रश्नाला उत्तर देत आलो. तो प्रश्न म्हणजे, 'असा पार्टनर तुम्हांला प्रत्यक्ष भेटला होता का?' व्यक्ती कुठलीही असो. त्याचं बालपण ज्या शहरात, ज्या समाजात आणि त्याहीपेक्षा जास्त ज्या परिवारात गेलेलं असतं त्याच्यावरच संपूर्ण आयुष्याची उभारणी होते. 'EGO' हा शब्द रूढार्थानं अहंकार त्या अर्थाने वापरला जातो. पण मानसशास्त्राच्या दृष्टिकोनांतून ह्या शब्दाचा अर्थ वेगळा आहे. 'ईगो' ह्या अवस्थेच्याआधी एक 'ईद' ही अवस्था असते. मानसशास्त्राप्रमाणे 'ईद', 'इगो' आणि 'सुपर इगो' अशा तीन अवस्था असतात. त्यापैकी 'ईद' ह्या अवस्थेचा कालखंड, माझ्या माहितीप्रमाणे वय वर्ष तीन ते सहा हा असतो. ह्या कालावधीमधे मुलांच्या मनावर होणारे परिणाम हे जवळपास आयुष्यभर त्यांचा पाठपुरावा करतात. हे परिणाम नेमके कोणत्या स्वरूपाचे असतात, हे ठरवणं जवळपास अशक्य असतं. पण माणसाच्या स्वभावाचा बराचसा पॅटर्न त्या काळात पक्का होतो.

'इगो' ह्याचा अर्थ शरीरधर्मासारख्या गोष्टी, टॉयलेटमध्येच जाऊन करायच्या असतात, इत्यादी गोष्टींची जाणीव, एवढ्यापुरताच वापरला गेला आहे आणि 'सुपर इगो' म्हणजे समाजाने आणि परंपरेने लादलेले विचार. हे मानसशास्त्रीय अर्थ आहेत. माझ्या ह्या विधानामधे विसंगती असण्याचा संभव आहे. एका मानसशास्त्राच्या प्राध्यापकाबारेबर झालेली जी चर्चा मला आठवते, त्या आधाराने मी लिहित आहे. अनेक माणसांच्या काही विशिष्ट वागण्याचं आपल्याला आणि त्याला स्वत:लाही जेव्हा आकलन होत नाही, तेव्हा त्याचं मूळ, 'ईद' ह्या अवस्थेतलं असावं.

म्हणूनच कादंबरीतला श्री असा का? आणि पार्टनर असा का? हे शोधणं अवघड आहे. लहानपणापासूनच आर्थिक सुबत्ता लाभली असेल तर समाजामध्ये वावरताना माणसामधे धीटपणा उपजतच असतो. आर्थिक कोंडी झालेली माणसं सगळेच अनुभव भीतभीत घेतात. पण त्याहीपेक्षा जास्तीचा परिणाम दोन मुलांत जेव्हा डावं उजवं मुलांच्या लक्षात येईल एवढ्या प्रमाणात केलं जातं तेव्हा एक शेफारून जातो आणि दुसऱ्याची कुचंबणा होते. श्रीच्या बाबतीत हेच झालंय. काही काही मुलांना जो पाठिंबा आईवडिलांकडून मिळत नाही, तशा स्वरूपाचा आधार आजी, मामा, आत्या ह्यासारख्या जवळच्या नातेवाईकांकडून मिळतो. आपलंही कुणी ऐकून घेणारं आहे, ह्या निव्वळ मानसिक आधारावर एवढी ताकद येते, की मूळ समस्या जरी दूर झाली नाही तरीही मन शांत असतं.

'तुमचे कोणचा फ्लॅट, one bed room or two bed room ?'
किरणकडे पाहत मी शेटजींना म्हणालो.
'आम्ही दोघंही मेउर नसतांना आलो आहोत.'
'अरे! मग ते दिवस...'
किरण गडबडीनं म्हणाली,
'मी माझ्या मैत्रिणीबरोबर आले होते.'
'आणि तुम्ही एंचासंगट ?'
'नाही. मी एकटाच आलो होतो. hobby म्हणून.'
'hobby ? wonderful ! कसला hobby ?'
मी स्वतःच्याच येण्याचा अर्थ शोधत म्हणालो,
'कुणाला कसली, कुणाला कसली हॉबी असते. मला कोणतीही महागडी हॉबी परवडणार नाही. शेटजी, मी काय करतो सांगू ?'
'surely.'
'मी चाळीत राहतो. चाळीतल्या माणसाला काय काय सोसावं लागतं हे चाळीतलाच माणूस सांगू शकेल. चार बाजूला भिंती असतात म्हणून आपण त्या तसल्या खुराड्यांना घर म्हणतो. पण शेटजी, फूटपाथवर राहणं आणि चाळीत राहणं ह्यात काही फरक नाही. आपण कसं जगायचं हे इथं मरेपर्यंत ठरवता येत नाही त्याला चाळ म्हणतात.
'लई बराबर वार्ता करते.'
'म्हणून मी रिकामा वेळ मिळाला की बाहेर पडतो. जिथं बांधकाम चालू असतं तिथं मी जातो. मजल्यावर मजले उभे राहतात तिथं मी रमतो. माणसाला माणूस हवं असणारं, कुणाचं तरी घर उभं राहतं आहे पाहूनच मला विलक्षण आनंद होतो. इथं घर उभं करण्यासाठी पुरुष आणि बायका एकत्र कष्ट करतात हे पाहण्यात मला नशा चढते. ह्या नव्या इमारतीत माणसं, वारा प्यायलेल्या वासरासारखी धावत येतील. त्या कुणा भाग्यवंताचा हा दिवाणखाना असेल. ही बेडरूम, हे किचन. ही आरामखुर्ची टाकून पडण्यासाठी बाल्कनी, असं म्हणत, भिंती नसलेल्या खोल्या खोल्यांतून मी हिंडतो आणि

( विजय लोटकेयांनी स्वहस्ते लिहिलेल्या ' पार्टनर ' मधील एक पृष्ठ



अनुक्रमणिका

श्रीला असं कुणीही भेटलं नाही. जो भेटला तो पार्टनरच!

भाकरीवर स्वतःला हवं तेवढं तूप वाढून घेतल्यावर बापाच्या डोळ्यांत जेव्हा निखारे दिसले तेव्हा घर सोडणारा पार्टनर! वयाच्या सोळाव्या सतराव्या वर्षी मुंबईसारख्या शहरात समाजाला तोंड देताना किती वेळा नमतं घ्यावं लागलं असेल आणि किती वेळा झुंजार वृत्तीने मुकाबला करावा लागला असेल, हे ज्याचं त्यालाच माहित असतं. समाजाजवळ असतो तो निव्वळ व्यवहार. व्यवहार म्हणजे रेल्वेचे रूळ. आखून दिलेल्या मार्गावरूनच जावं लागतं. भावनात्मक पातळीवर जगणाऱ्या माणसाला आखून दिलेला रस्ता नसतो. अंतराची मनं सांभाळत सांभाळत स्वतःची पायवाट त्याला स्वतःला आखावी लागते. त्या पाऊलवाटेवरून ठेचकाळत चालत असताना, आखलेल्या रूळावरून भरधाव धावणाऱ्या गाड्या तो पाहत असतो. मनात विचार चालू असतो तेव्हा, 'आपल्याला असं कधी धावता येईल का?' ही पाऊलवाट त्या माणसाला कोणती सुखं नाकारायची, हेच पहिल्यांदा शिकवते. म्हणूनच श्री म्हणतो, 'माझं जग काउंटरच्या आतलं. बाहेरच्या जगातलं सौंदर्य, वैभव हे मी काऊंटर न सोडता बघायला हवं.' आणि त्याचवेळी पार्टनर त्याला सांगत असतो, 'किरणसारखी सुंदर मुलगी ही श्रीमंतासाठी आहे असं मूर्खासारखं म्हणतोस, मग हा टेरिकॉटचा शर्ट तरी तुला शोभतो का?'

श्रीची मानसिक जडणघडण, त्यात माझ्या बालपणाचं प्रतिबिंब आहे. ह्याच अर्थानं मी या कादंबरीला आत्मचरित्र म्हणतो. जी गोष्ट आपल्याला मिळवता येत नाही, त्या गोष्टीबद्दल ती आपल्यासाठी कशी योग्य नाही याची प्रत्येकजण एक फिलॉसॉफी तयार करतो. पण त्याचवेळी माणसाचं दुसरं मन ही फिलॉसॉफी किती पोकळ आहे, हे त्याला सांगत राहतं. हे दुसरं मन म्हणजेच पार्टनर! हा पार्टनर अनेक वाचकांपर्यंत पोहोचला ह्याचं मुख्य कारण प्रत्येकाच्याच मनात असा एक बंडखोर पार्टनर असतो. 'बंडखोर' ह्या शब्दाचा नेमका अर्थ काय? तर, 'लोक काय म्हणतील?' ह्या काल्पनिक भीतीपायी ज्या गोष्टी कराव्याशा वाटतात, पण आपण सहजी करत नाही अशा वेळेला जे मन 'तू बेधडक हे कर' असं सांगतं ते बंडखोर! म्हणूनच आत्तापर्यंतच्या अनेक पत्रांतून, मुलाखतींतून किंवा प्रत्यक्ष भेटीत अनेकांनी, श्री कुठे भेटला हे विचारलं नाही, तर 'पार्टनर' कुठे भेटला? अशी विचारणा केली आहे. ह्या सगळ्या लोकांना मला सांगावंसं वाटतं, 'असा पार्टनर जर तुम्हाला भेटला असेल, तर मला त्याचा पत्ता द्या. 'मलाही असा पार्टनर हवा आहे. असा पार्टनर प्रत्येकाच्या मनात असतो. आपण जेव्हा जेव्हा म्हणतो, 'मी त्यावेळी असं करायला हवं होतं' किंवा 'एक सणसणीत उत्तर जिभेवर आलं होतं, पण नाही दिलं' त्या त्या वेळेला तुमच्यातला पार्टनर अशाच कुणा श्रीला मदत करायला गेलेला असतो. किंवा तुम्ही स्वतःच त्याला मनातल्या मनात गाडून टाकलेलं असतं.

आपण जसे आहोत, तसं असायला नको होतं, हे वाटणं ह्यालाच माणूस म्हणतात. माझ्या एका मित्राच्या स्टुडिओत मी अनेकदा जातो. एकदा तो रस्त्यावरच्या एका भिकाऱ्याला समोर बसवून त्याचं पोर्ट्रेट करत होता. पोर्ट्रेट अप्रतिम झालं होतं. तो भिकारी जेव्हा जेवणाच्या सुट्टीसाठी एक तास बाहेर गेला, तेव्हा मी त्या मित्राला चिडून म्हणालो, 'गेले तीन दिवस हा भिकारी सहा सहा तास तुझ्यासमोर पुतळ्यासारखा बसून राहतो. तू त्याला जास्तीत जास्त हजार रुपये देशील. तो पुन्हा फूटपाथवर बसेल आणि ह्या पोर्ट्रेटवर तू एखाद्या प्रदर्शनात किमान दहा - पंधरा हजार रुपये किंवा गोल्ड मेडल

मिळवशील. त्या शिवाय वर्तमानपत्रातून प्रसिद्धी!' ह्यावर मित्र मोठ्यांदा हसला. तो म्हणाला, 'माझ्यासमोर मॉडेल म्हणून बसणारा भिकारी हा लक्षाधीश आहे. त्याच्या तीन गाड्या आहेत. पण भिकाऱ्याच्या वेषातलं त्याला स्वतःला आपलं पोर्ट्रेट करून घ्यायचं होतं. हे पोर्ट्रेट तोच नंतर घेऊन जाणार आहे.'

अशा एक ना अनेक घटनांच्यामधून पार्टनर उभा राहिला.

शेवटी एकच हकीकत. ह्या कादंबरीच्या संदर्भात मला एक गोष्ट नोबेल पारितोषिकासारखी वाटेल अशी मिळाली.

मेनका दिवाळी अंकात ही कादंबरी पहिल्यांदा प्रकाशित झाली. 'विजय लोटके' ह्या एका बँकेत काम करणाऱ्या रसिकाने असं ठरवलं की, पुस्तक रूपाने ही कादंबरी प्रकाशित होण्यापूर्वी आपण स्वतः ती पुस्तकाप्रमाणे लिहून काढावी. त्याप्रमाणे बँकेतली नोकरी सांभाळून रोज दोन तास लेखन करून त्याने दोन महिन्यात संपूर्ण कादंबरी लिहून काढली. छापील पुस्तकाप्रमाणे त्याचं वायडिंग केलं. दर दोन पानांच्यामध्ये, अक्षर फिसकटू नये म्हणून बटर पेपर टाकला. ते पुस्तक त्याने मला भेटीदाखल दिलं. 'Seeing is believing' असा एक वाक्प्रचार आहे. त्याची वाचकांना प्रचीती यावी म्हणून विजय लोटके ह्यांच्या हस्ताक्षरातलं एक पान या लेखाबरोबर देत आहे.

ज्याप्रमाणे, पार्टनर कुठे भेटला? हा प्रश्न वाचक विचारीत आले त्याचप्रमाणे, अमितचा मृत्यू दाखवून तुम्ही काय साधलंत? हा प्रश्न विचारणारे वाचकही कमी नाहीत. खरं तर अमितचा मृत्यू ही एकूण कादंबरीची शोकांतिकाच नव्हे. पतिपत्नींमध्ये संवाद न होणं ही खरी शोकांतिका. म्हणूनच, राजकन्येला आणि सरदार पुत्राला तीन दिवस करकचून बांधून ठेवण्यात आलं, तेव्हा तिसऱ्या दिवशी ते एकमेकांचा जीव घ्यायच्या पायरीपर्यंत आले होते. ही रूपक कथाच कादंबरीचं खरं मर्म आहे. 'लग्नानंतर माझी आई मारलीत आणि आता अमित....' असा आरोप जेव्हा किरण करते, तेव्हा श्री खऱ्या अर्थाने एकटा पडला. म्हणूनच तो म्हणतो, ' पार्टनर, असशील तसाच ये. करकचून बांधलेल्या या दोऱ्या सोड. किरण त्या राजकन्येसारखीच दिसते आहे. लवकर ये, ह्या दोऱ्या सोड!'

आज, अनेक दांपत्यांची हीच कहाणी आहे. They live together because they are tied together.' त्यांच्यातला संवाद हरवला आहे. आणि माझ्या मते, प्रत्यक्ष मृत्यूपेक्षा जित्या - जागत्या माणसांचा संवाद संपणं हेच त्याचं खरं मरण आहे. एवढ्याचसाठी पार्टनर ही जेवढ्या जित्या - जागत्या माणसाची कहाणी आहे, त्याच्यापेक्षा कितीतरी पटींनी जास्त शेजारी शेजारी बांधलेल्या थडग्यांची कहाणी आहे. अशा थडग्यात अवांतर नातेवाईकांपेक्षा, संवाद हरवलेल्या नवरा बायकोची थडगी जास्त आहेत.

( व. पु. काळे, झपूर्झा, साहित्य सहवास, वांद्रा पूर्व, मुंबई ५१ )



अनुक्रमणिका






शिवाजी सावंत

# मृत्युंजय

"तुमची अमुक अमुक कादंबरी, कथा, कविता, नाटक इ. बाबतची नेमकी प्रेरणा काय? कसा सुचला हाच विषय तुम्हाला?" असा प्रश्न हटकून कुठल्याही साहित्यकाराला आजकाल विचारला जातोच! वापरून, विचारून तो अगदी गुळगुळीत झालाय. 'मृत्युंजय' बाबत प्रत्येक मुलाखतकारानं मला हे विचारलं आहे. प्रेरणा काय असा विचार करताना अशा बृहत व बहुआयामी साहित्यकृतीविषयी हेच म्हणता येईल की, प्रेरणेचा असा अमुकच क्षण वा घटना नसते. अशी रचना ही एक प्रदीर्घ अशी प्रक्रिया असते. गुंतागुंतीची. अनंत पापुद्र्यांची.

अगदी चपखल सांगायचं तर दूर हिमालयात उंच गुंफेत कणाकणांनी बर्फ पाझरून, साकळून जसं अमरनाथच्या गुंफेतील हिमलिंग साकारतं तशी ही प्रक्रिया असते! स्वयंभू. नेमकी विकलून न दाखविता येणारी. म्हणूनच तर तिचा म्हणून एक साहित्यिक आकृतिबंध असतो. तिची म्हणून एक खास भाषाशैली असते. कथावस्तूची विशिष्ट वातावरण निर्मिती असते. हे सर्वच ती ती कलाकृती अपरिहार्यपणे, अटळपणे स्वतःबरोबरच घेऊन जन्माला येत असते. मऊसूत लोकर अंगी लपेटून येणाऱ्या नवजात मेंढरीच्या कोकराच्या लोकरीसारखी!

कर्ण ही 'मृत्युंजय' ची केंद्रवर्ती प्रमुख व्यक्तिरेखा आहे. महाभारतातील, विश्वसाहित्यात शोभून दिसेल अशी. भारत या देशाची उपलब्ध प्राग्ऐतिहासिक काळातील संहिता म्हणून, महाभारत हे महाकाव्य आज अनेक कसोट्यानंतर मान्य झालं आहे. महाभारतीय महायुद्ध झालं होतं का? हो. झालं होतं हेच त्याचं इतिहाससिद्ध उत्तर आहे.

मग महाभारत कपोलकल्पित व तद्दन काल्पनिक वाटतं ते का? तर त्यात पिढ्यान् पिढ्या, शतकानुशतके जे प्रज्ञावंत रचनाकार ऋषींनी प्रक्षेपित म्हणजे घुसडलेले श्लोक घातले त्यामुळे.

महाभारताची महर्षी व्यासकृत मूळ रचना एकच होती. 'भारत सावित्री 'किंवा' हा जय नावाचा इतिहास आहे' ही. केवळ सात हजार श्लोकांची ही रचना होती. आजचं महाभारत एक लक्ष श्लोकांचं व अठरा पर्वांचं झालं आहे. म्हणजे जवळजवळ तेरा पट ते वाढलं आहे! या प्रक्रियेत शतकानुशतकं महाभारतातील स्त्री-पुरुष व्यक्तिरेखांवर अतिशयोक्तीची, चमत्कारांची मनःपूत पुटं चढली आहेत. त्यांची मूळ रूपं पार झाकोळून गेली आहेत.

श्रीकृष्ण , कौरव - पांडव , भीष्म , कर्ण अशी प्रत्येक व्यक्तिरेखा वास्तवात नांदून गेली . त्या व्यक्तिरेखा अनेकजण मानतात तशा काल्पनिक नव्हेत. महाभारत हा उत्क्रांतीच्या दुसऱ्या कालखंडातील भारत या देशाचा उपलब्ध पण प्रक्षेपितांच्या तडाख्यात सापडलेला 'इतिहास' आहे.

'मृत्युंजय' प्रकाशित झाली १९६७ साली.

१९६२ साली भारतावर चीनचं प्रचंड आक्रमण झालं . आपला हा प्रिय देश त्यावेळी जगात राजकीय स्तरावर पूर्णतः एकाकी पडला होता . महाभारतीय कर्णासारखा ! म्हणून तर 'मृत्युंजय 'ची अर्पणपत्रिका "मायभूमीच्या संरक्षणार्थ धारातीर्थी पतन पावणाऱ्या शूर वीरांस !" अशी आशयसंपन्न आहे . ती स्वयमेव खूप बोलकी आहे .

'महाभारत' म्हणजेच 'माझा भारत' हे सूत्र चिंतनोत्तर एकदा मनी पक्क झाल्यावर जो स्वत:तील सूर्यपुत्राचा वेध घेऊ बघतो आहे , त्या कर्णाचा शोध सुरू झाला . १९६२ च्याही पूर्वी बालपणात एका नाटिकेत श्रीकृष्णाची भूमिका करताना कर्णभूमिका करणाऱ्या सोबत्याचे ऐकलेले भेदक संवाद बीजरूपानं अबोध मनावर कुठंतरी पडून होते . ते कोल्हापूरात महाविद्यालयीन अभ्यासक्रमात कविवर्य केदारनाथ मिश्र (पाटना) यांचं 'कर्ण' हे हिंदी खंडकाव्य वाचताना उमरून जागृत मनावर पसरले . अबोध व जागृत मन पूर्णतः व्यापून गेले .

एका अभूतपूर्व , मंतरलेल्या साहित्यिक अनुभवाला प्रारंभ झाला . 'कर्ण' कवचकुंडलांमुळं स्वतःचं मनोमन सतत भावणारं आगळेपण शोधतो आहे. तो 'सूर्यपुत्र' आहे. तेजाचा वंशज आहे. प्रसंगवशात चंपानगरीच्या सारथ्यांत येऊन पडला आहे . संभ्रमित झाला आहे . भारतीय समाजपुरुष साठीच्या दशकात असाच , अचानक आलेल्या चिनी आक्रमणामुळं गोंधळलेला होता . भारतीय सेनेतील पट्टीचे सेनाधिकारी त्यावेळी तेजपूर हवाई स्थानकावरून , आपले सैनिक वाऱ्यावर सोडून विमानातून चक्क पळाले होते ! पुरा देश शरमिंदा , गोंधळलेला होता . महाभारतीय कर्णासारखीच त्याची मनोवस्था होती . तेजाचा शोध , स्वत:तील दिव्यत्वाचा शोध त्याच्यासाठी नितांत आवश्यक होता . 'मृत्युंजय 'चं चिंतनविश्व त्या एकाच ध्रुवाला सामोरं ठेवून आपापतः साकारत होतं . एक सशक्त साहित्यिक अंकुर हुंकारत होता . प्रकटनास्तव सतत धडपडत होता .

या काळात मिश्रांचं खंडकाव्य मी शंभराहून अधिक वेळा एकटाच , त्यातील आशयसमृद्ध पंक्तींशी एकरूप , समरस होते धडाधड अथक म्हटलं होतं . आज तीस वर्षांनंतरही त्यातील सघन पंक्ती स्पष्ट स्मरणात आहेत .

वासंतिक स्पर्धेच्या आखाड्यात अजिंक्य ठरलेल्या अर्जुनाला निर्वाणीच्या द्वंद्वयुद्धाचं आव्हान देत कर्ण प्रवेशतो असा पहिलाच समर प्रसंग आहे . त्यावेळी तो कसा दिसला असेल याचं कविवर्य मिश्र उर्फ 'प्रभात' यांनी केलेलं वर्णन अजोड आहे . ते साक्षात कर्ण क्षणैक, सदेह वाचकासमोर उभं करण्याच्या सामर्थ्याचं आहे . ते लिहून गेलेत -

"दुःसाहस था पहुँच कर वह राजरंगशाला में -
चमके जैसे कमल चमकता कनक किरण माला में। "

या खंडकाव्यात असं कर्णाचं क्षणदर्शन ठायी ठायी होत होतं . पण त्याच्या अंतरंगाच्या दर्शनाचं काय ? मला जे आतून जाणवत होतं ते मात्र कुठंच सापडत नव्हतं . कथांकुर वधारू बघत होता .

भुईचा पापुद्रा आडवा येत होता ! मग प्रभात नि माझा सलग पाटना - कोल्हापूर असा पत्रव्यवहार सुरू झाला. पुढं तर ते माझे हिंदीतील पहिले साहित्यिक सुहृद झाले.

'कर्ण' खंडकाव्यापाठोपाठ हिंदीतील दुसरं सशक्त खंडकाव्य वाचलं 'रश्मिरथी'. कविश्रेष्ट होते श्री रामधारी सिंह उपाख्य कविवर्य 'दिनकर'. पुढं कुरुक्षेत्राच्या प्रवासात तर दिनकरांची दिल्लीत भेटच घेतली. अद्याप रचनेच्या आकृतिबंधाबद्दल पक्का निर्णय झाला नव्हता. वाटत होतं आपणही मराठीत खंडकाव्य बेतावं. त्याच काळात डॉ. कैलास, देवमाणूस, मुंबईची माणसं अशी नाटकं, आजरा या माझ्या जन्मगावाच्या रंगमंचावर सादर केल्यामुळे 'नाटक' लिहावं असंही एकदा प्रकर्षानं वाटून गेलं. ही बहुआयामी, समर्थ व्यक्तिरेखा नाटकाच्या मर्यादित आकृतिबंधात सामावूच शकत नाही हे याचवेळी प्रकर्षानं स्पर्शून गेलं. कादंबरीच्या आकृतिबंधावर येऊन मन स्थिरावलं.

आता फक्त जन्मतः सूर्यपुत्र असलेल्या व केवळ दैववशात् सूतपुत्र म्हणून पराकोटीच्या टोकाचं जीवन जगावं लागलेल्या, त्यातच आपली म्हणून जीवनदत्त तत्त्वं प्राणपणानं व कमालीच्या स्थिर, कणखरपणे जपलेल्या महानायकाच्या आंतरिक आंदोलनाचा शोधवोध, अखंड शोधबोध सुरू झाला. अखंड वाचन, चिंतनमनन, पुन्हा वाचन सुरू झालं.

कर्णावर मराठी, हिंदी, संस्कृत, इंग्रजी भाषेत संदर्भ म्हणून वाचायला मिळेल त्याचं 'शोधक' वाचन सुरू झालं. यात प्रबोधनकार ठाकरे यांच्या 'टाकलेला पोर' पासून शिवरामपंत परांजपे याचं 'पहिला पांडव' ही नाटकं आली. ती वाचताना पराजपे यांनी आपल्या नाटकाला दिलेलं 'पहिला पांडव' हे शीर्षक स्पर्शून गेलं. याचवेळी तीव्रपणे जाणवून गेलं की गेली पाच हजार वर्षे 'कर्ण' या ऐतिहासिक सघन व्यक्तिरेखेकडं आपण भारतीयांनी कमालीच्या एकारलेल्या वृत्तीने पाहिलं आहे. कुठली ती वृत्ती ? तर कर्ण हा सहावा पांडव नव्हे ! तर एकशे एकावा कौरव, कुटिल, अहंमन्य, उद्धट युवराज दुर्योधनाचा, पांडवनाशाच्या कृष्णकारस्थानातील चौकडीचा, एक सदस्य ! दुर्योधनाचा प्राणप्रिय मित्र. खरं तर 'अंगराज' म्हणून त्याच्या खाल्ल्या अन्नाला जागणारा चमचा ! किती एकांगी व न्यायशून्य होतं हे आकलन !

या आकलनात कर्ण हा कुंतीपुत्र आहे, सूर्यपुत्र आहे या वास्तवावर चक्क पडदा घातला जातोय. या व्यक्तिरेखेवर प्रचंड अन्याय होतोय हे प्रकर्षानं स्पर्शून गेलं.

'पहिला पांडव' व 'सूर्यपुत्र' या सामर्थ्यशाली अंगांचा कुणी विचारच केलेला नाही ! असं का ?

काय करावं ? जाणवतोय तो 'कर्ण' कसा व्यक्त करावा ?

काही काही सुचत नव्हतं. दिवस, महिने, वर्ष. वाचन, चिंतन, टिपणं, जाणत्यांशी चर्चा असं मंत्रभारलं जीवन सुरू झालं. या काळात व्यक्तिगत जीवन किती जगलो हा प्रश्नच आहे. आज त्याचं 'मांडवल' करवत नाही. बस्स हे एक वेड होतं. ते साकारलं.

भारताचार्य चिं. वि. वैद्य यांच्या 'महाभारताचा उपसंहार' पासून नीळकंठी संहिता, इत्यादी विविध संहितांचं वाचन सुरू झालं. त्यातच पुण्याला आलो. भांडारकर प्राच्य विद्या केंद्रात मेठा मारला. प्रज्ञावंत डॉ. पी. एल. वैद्य यांच्याशी चर्चा केली. म. म. सिद्धेश्वरशास्त्रीजींच्या संभाजी उद्यानासमोरच्या निवासात त्यांच्या पायाशी बसून अनेक उलटे सुलटे प्रश्न घालून त्यांना छळलं ! त्यांनीही न कंटाळता अनेक प्रश्नांची उत्तरे दिली. त्यांच्याकडून प्रथम समजलं की 'हस्तिनापूर' म्हणजे आजची

दिल्ली नव्हे ! हस्तिनापूर मीरतजवळ आहे. म्हणजे होतं. गंगेच्या बदलत्या प्रवाहातून ते वाहून गेलं. आज आहे तो त्या शहराचा उर्वरित एक कोपरा. आजच्या दिल्लीचं नाव पूर्वी 'इंद्रप्रस्थ' होतं. हस्तिनापूर - गंगाकाठी होतं. इंद्रप्रस्थ यमुनाकाठी होतं.

शास्त्रीबुवांशी झालेल्या चर्चेत प्रामुख्यानं जाणवलं की ही कर्णकथा सिद्ध करताना भौगोलिक भारत-आर्यावर्तही तेवढाच महत्त्वाचा आहे. कुरुक्षेत्राची नीट माहिती हवी. कोल्हापूरला परतलो. 'मृत्युंजय'च्या प्रत्यक्ष लिखाणाला प्रारंभ झाला. दोन-एक प्रकरणं हातावेगळी झाली. आकृतिबंध पक्का झाला होता. आत्मनिवेदनपर शैलीचा. तीच एक सुयोग्य शैली असं अनेक उलटसुलट पर्यायानंतर प्रकर्षानं भावलं. याचवेळी कुरुक्षेत्र विश्वविद्यालयाचे इतिहास विभागाचे प्रमुख डॉ. बुद्धप्रकाशजी यांच्याशी पत्रव्यवहार सुरू झाला. पत्रं कोल्हापूर ते कुरुक्षेत्र अशी येत होती, जात होती. मी उंटावरून शेळ्या राखत कोल्हापूरमधे वसून बुद्धप्रकाशजींचा मेंदू खात होतो! पत्राने विचारीत होतो - हे स्थळ कुठं आहे? ही नदी कशी वाहते? पांडव सैन्य कुठं होतं? कौरव सैन्य कुठल्या दिशेला असावं? कुरुक्षेत्राचा नकाशा पाठवता का? इ. इ. बिचारे वुद्धप्रकाश सुजन होते. माझ्या प्रत्येक प्रश्नाचं उत्तर धाडत होते. शेवटी शवटी महायुद्धाच्या अठरा दिवसांच्या युद्धरचनेकडं मी सरकलो! प्रश्न एकाहून एक किचकट होत होते. ते कंटाळले असावेत! त्यांनी शेवटचा उपाय काढला. लिहिलं, "आप यहाँ समक्ष आने का विचार क्यों नही करते? यहाँ अद्यावत अतिथिगृह है। अवश्य आईएगा।" मलाही जाणवलं - अगदी तीव्रपणे की - "गड्या, घरात बसून ४० लाख योद्धयांचा संग्राम मांडणाऱ्या महाभारतीय कथेचा वेध घेणं हे काही खरं नव्हे."

नाना लटपटी करून राजाराम (मेन) हायस्कूलच्या मुख्याध्यापकांकडून दोन महिन्यांची रजा मिळविली. आठएक दिवसांत चांगले अठराशे रुपये जमा केले. मग एकटाच बसलो गाडीत. 'कोल्हापूर ते कुरुक्षेत्र' हा हजार किलोमीटरचा प्रवास. जाताना मुंबईत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचं यशवंतराव चव्हाणांसाठी व बाळासाहेब ठाकरे यांचं दिल्लीच्या भालचंद्र केळकर यांच्यासाठी अशी दोन पत्रं घेतली.

दिल्लीत कविश्रेष्ठ दिनकर, संस्कृत विद्यापीठाचे प्रमुख डॉ. मंडनमिश्र, केंद्रीय वाचनालयाचे प्रमुख एम. एन. देशपांडे, ज्येष्ठ हिंदी लेखक दशरथजी ओझा यांच्या भेटी घेतल्या. त्यांच्याशी दीर्घ चर्चा केल्या. विषय एकच - 'कर्ण'. हा दौरा केवळ अविस्मरणीय ठरला. पुढं प्रत्यक्ष कुरुक्षेत्रावर तेथील गीता विद्यालयाचे मुख्याध्यापक विश्वनाथबाबू भल्ला यांच्या घरी त्यांचा एक कुटुंबसदस्य म्हणून मुक्काम टाकला. त्यांनी गोपालबाबू नावाचा एम. एस्सी प्रथम वर्ग प्रथम असा हुशार जोडीदार दिला.

रोज भल्या सकाळी उठून, स्नाननाश्ता आवरून, खांद्याला एक कॅमेरा लटकावून माझी व गोपालबाबूंची धर्मक्षेत्र - कुरुक्षेत्राच्या पर्यटनाची स्वारी निघे. कुरुक्षेत्राचा चप्पा - चप्पा छान मारला. छायाचित्रे टिपली. भेटेल त्या विद्वान, वृद्ध नागरिकाला वाटले ते ते प्रश्न विचारले. महारथी कर्णाच्या युद्धभूमीवरील टेहळणीच्या 'कर्ण का टिला' या खास जागेवर निघायच्या आदले दिवशी गवतात तासभर लेटून निळ्याशार आकाशातल्या तळपत्या रश्मिदेवाला चांगलं घंटाभर डोळाभर पाहिलं. काय नि केवढं बोलला तो गगनस्वामी माझ्याशी नि कोणत्या बोलीभाषेत ते केवळ मला नि अबोध मनालाच माहीत.

कोल्हापूरात परतलो. पुढील तीन महिन्यातच सर्व प्रकरणं बांधून झाली. हस्तलिखित चांगल्या

आठ फाईल्समध्ये १८०० पृष्ठांचं झालं ! आता हे छापायचं कुणी ? समर्थ प्रकाशकाचा शोध सुरू झाला . मुंबईला गेलो . शासनाकडून गोड नकार घेतला . कोल्हापूरच्या एका दूरदृष्टीच्या प्रकाशकानं दूरच्या म्हणजे दीड वर्षांनंतरच्या प्रकाशनाचं आश्वासन दिलं . इथं तर क्षणभराची कळ शक्य नव्हती .

शेवटी प्रत्येक दाण्यावर विधात्यानं चोचीचं नावही आपल्या अज्ञात हातांनी व मानवाला अनाकलनीय भाषेत लिहून ठेवलेलं असतं हेच खरं . पुन्हा पुण्यात आलो . महाराष्ट्र वाल्मीकी ग . दि . माडगूळकर यांच्या मध्यस्थीनं कॉन्टिनेंटल प्रकाशनाचे श्री . अनंतराव कुलकर्णी हे सार्थ साक्षेपी प्रकाशक मिळाले .

१९६७ साली गणेश चतुर्थीच्या सारस्वती , शुभ दिवशी गजानन दिगंबर माडगूळकर तथा ज्येष्ठ बंधुतुल्य अण्णांच्या गजाननी हस्ते छापील ' मृत्युंजय 'चं अगदी घरगुती साध्या पद्धतीनं अनंतरावांच्या घरी , तेही ' शारदा ' प्रसादात , पूजन झालं .

' मृत्युंजय ' ही कर्णकथा साकारली . मराठी दर्दी वाचकविश्वानं ती सहर्ष स्वीकारली . थोर कुंचला-श्रीमंत चित्रकार दीनानाथ दलाल यांनी एकाग्र साधनेनं चितारलेलं मुखपृष्ठावरचं पाकळ्यासंपन्न सूर्यबिंब वाचकांच्या मनावर लेण्यासारखं ठसलं . आजही वाचक ते बघताना क्षणैक स्वत:च्या व्यथा भुलून जातात .

' मृत्युंजय ' ही कादंबरी १९६७ साली मराठी वाचकांच्या हाती आली . आजतागायत या साहित्यकृतीनं मागं म्हणून कधीच वळून बघितलेलं नाही . आज तर ती लेखकप्रकाशकापेक्षा वाचकविश्वाची कलाकृती झाली आहे . महाराष्ट्राबरोबर भारत या देशाची झाली आहे . इंग्रजी अनुवादामुळं देशाबाहेर पोचली आहे . खोट्या ,कृतक विनयानं मुळीच नव्हे - तर सूर्यप्रकाशात वास्तव सत्य म्हणून हे नम्रपणे नोंदवतोय की हे सर्व श्रेय मायमराठीच्या कदरदानी , आबालवृद्ध स्त्रीपुरुष वाचकांना आहे . हस्तलिखित अनंतरावांच्या हाती सुपूर्त करून त्याच पावली मी व माझे कोल्हापूरचे सन्मित्र श्री . आर . के . कुलकर्णी खेचल्यासारखे श्रीक्षेत्र आळंदीला गेलो होतो . ओंजळभर शुभ्र फुलं त्या ज्ञानमाऊलींना वाहून अपार थकलेला , श्रांत-क्लांत माथा मराठीच्या त्या महासारस्वताच्या समाधीच्या कठड्याला टेकवून म्हटलेले शब्द काल उच्चारल्यासारखे आजही स्पष्ट आठवतात - " माऊली ! कुंतीनं सूर्यपुत्र अश्वनदीच्या ओटीत दिला तशी ही कर्णकथा तुझ्या पायाशी ठेवली आहे . तूच बोट धरून तिला चालव . "

' मृत्युंजय ' प्रकाशित झाली नि पहिलंच समीक्षण आलं ते तर्कनिष्ठ व बुद्धिप्रामाण्यवादी म्हणून महाराष्ट्रभर दरारा असलेल्या डॉ . पु . ग . सहस्रबुद्धे यांचं . रविवार केसरीत आलेल्या त्यांच्या समीक्षणाचं शीर्षकही खूप बोलकं होतं- ' महाराष्ट्राचे महातेज आत्मसात केलेली कलाकृती - ' मृत्युंजय ! ' पाटोपाठ आचार्य अत्र्यांनी दैनिक मराठात ' मृत्युंजय ' या शीर्षकाचा अग्रलेखच प्रकाशित केला . याच दरम्यान प्रा . चंद्रशेखर बर्वे , श्रीमती शांताबाई शेळके , सौ . इंद्रायणी सावकार यांची समीक्षणं आली .

१९७३ साली भारतीय ज्ञानपीठचे रत्नपारखी संचालक श्री . लक्ष्मीचंद्रजी जैन यांनी दिल्लीहून ' मृत्युंजय 'चं हिंदी भाषांतर प्रसिद्ध केलं . अनुवादक आहेत प्रा . ओम शिवराज - मथुरा हे . याच दरम्यान ' चंद्रलेखा ' या प्रसिद्ध मराठी नाट्यसंस्थेमार्फत श्री . मोहन वाघ यांनी याच शीर्षकाचं नाटक मोठ्या महत्त्वाकांक्षी दिमाखात सादर केलं . कर्णाची भूमिका बाळ धुरी या सालस नटानं समर्थपणे

पेलली. दुर्योधन ताकदीनं सादर केला श्रीकांत मोघेंनी. भीष्म अनुभवी रंगकर्मी श्री. परशुराम सामंत यांनी पेलला. कुंती उषा सरपोतदार व वृषाली संजीवनी बीडकर यांनी समतोलपणे साकारल्या. मला अपेक्षित अशा या महाभारतीय व्यक्तिरेखा कलाकारांनी मराठी मनामनापर्यंत पोचविल्या. आज महाराष्ट्रात 'मृत्युंजय' हे शीर्षक अनेक रुग्णालयांचं, वसाहतींचं, वाचनालयांचं तसंच रिक्षांचंही आढळून येईल. कुणी आपल्या नवथर पत्नीला, कुणी कन्येला 'वृषाली' हे नाव दिलेलं आढळेल.

याचवेळी प्रथम आकाशवाणी पुणे केंद्रावरून 'मृत्युंजय' नभोनाटिका सौ. ज्योत्स्ना देवधर, पुरुषोत्तम जोशी, श्री. जयराम जोशी, सपाटे या मंडळींनी श्रवणीय व रंगतदारपणे सादर केली.

हिंदी पाठोपाठ, कन्नड, गुजराथी, मल्याळम, बंगाली, इंग्रजी भाषांतही ही मराठी साहित्यकृती गेली. त्या त्या भाषेतील स्त्रीपुरुष वाचकांनी तिचं सहर्ष स्वागत केलं. इंग्रजी भाषांतराचं स्टेटसमन या प्रसिद्ध वृत्तपत्रात समीक्षण देताना कलकत्त्याच्या श्री. प्रदीप भट्टाचार्य, सचिव, पश्चिम बंगाल यांनी कसलाही कद्रुपणा न दाखविता अत्यंत बोलकं शीर्षक समीक्षणाला दिलं - ते होतं - ॲन एपिक-लाइक नॉव्हेल मृत्युंजय.

मृत्युंजयला साहित्यिक गुणवत्तेसाठी अनेक लक्षणीय पुरस्कार प्रदान झाले. यावर्षी भारतीय ज्ञानपीठाने आपला बारावा मूर्तिदेवी पुरस्कार दि. ६ फेब्रुवारीला दिल्लीत उपराष्ट्रपती के. आर. नारायणन यांच्या हस्ते प्रदान केला. मराठीला मिळणारा तो पहिलाच सन्मान असल्यानं आदरणीय तात्यासाहेब शिरवाडकरांनी आत्मभावानं नाशिकहून ९ फेब्रुवारीला लिहिलेल्या पत्रात लिहिलंय - "हा गौरव तुमचा, तुमच्या लेखणीचा आणि पर्यायानं मराठीचाही आहे. फार आनंद वाटला. माझे शुभाशीर्वाद सतत तुमच्यासोबत आहेतच. श्रीकृष्णही असाच दिग्विजयी होईल. होवो." मी हे आशीर्वादच सर्वाधिक मोलाचे मानत आलो आहे. मानत राहीन.

(शिवाजी सावंत, राधाकुंद, विवेकानंद सोसायटी, पर्वती पुलाजवळ, पुणे ३०)

---

## साभार स्वीकार

- प्लीज युअर ऑनर : अ. रा. जोशी. इंद्रायणी, पुणे. पृष्ठे १३२. सत्तर रुपये.
- पृथ्वीराज : जया मोरे (गटकुळ). पृथ्वीराज प्रकाशन, इंदापूर. पृष्ठे ८८. दहा रुपये.
- स्वरयात्रा : मधुवंती पेठे. सुमधुरा प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १३६. पन्नास रुपये.
- सेवेचे फळ (एकांकिका) : ज्योत्स्ना चांदगुडे. प्रती प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७८. पंचवीस रुपये.
- उपयुक्त वाक्प्रचार : दीपक भागवत. श्रीपाद प्रकाशन, कोल्हापूर. पृष्ठे ८८. वीस रुपये.
- आचार्य जावडेकर पत्रे : सं. तारा भवाळकर. लोकवाङ्मय गृह, मुंबई. पृष्ठे ८०. पन्नास रुपये.
- ऋग्वेदातील हवामान : हेमकांत वळकुंदी, पुष्पक प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६०. पंचावन्न रुपये.
- विराणी गाणी : वृषाली मगदूम, अंजली प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४७. सव्वीस रुपये.
- पोळा : तुकाराम खिलारे : मायवोली प्रकाशन, मुंबई. पृष्ठे. ६३
- असे हे रम्य गणपती पुळे : दिनकर कुलकर्णी. प्र. निर्मला कुलकर्णी, पुणे. पृष्ठे १०. सहा रुपये.
- घडई : श्रीराम दुर्गे. केदार सप्लायर्स, पुणे. पृष्ठे १८८. ४८ रुपये.
- वेध : वाळ दाते. वाळ दाते प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६. पाच रुपये.
- युगान्त : महेश घाटपांडे. सुयश प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६६. पंचवीस रुपये.
- चांगभलं : अरुणा श्रीखंडे. कोल्हापूर. पृष्ठे २६. दहा रुपये.
- संवेदना : आनंद शहापूरकर. सावित्री प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ८०. पन्नास रुपये.

बाबा कदम

# 'आय ओ यू'

आजपर्यंत माझ्या सत्तर एक कादंबऱ्या प्रकाशित झालेल्या अहेत. त्यापैकी चाळीसपंचेचाळीस कादंबऱ्यांच्या २-३ आवृत्त्या निघाल्या आहेत.लेखकाचे एक लेखनवय समजले जाते आणि ते सर्वसामान्यपणे दहा ते बारा वर्षांचे असते असे मानता येईल.माझ्या बाबतीत सांगायचे तर सुदैवाने हे लेखनवय दीर्घकालीन ठरले आहे. माझी पहिली कादंबरी प्रलय १९६० साली कोल्हापूरच्या चंद्रकांत शेट्ये यांनी प्रकाशित केली. आचार्य अत्रे यांनी तिच्यावर 'मराठा'मध्ये अग्रलेख लिहून माझी पाठ थोपटली. अग्रलेखाचे शीर्षक होतेः एक जबरदस्त लेखक महाराष्ट्रात उदयास येत आहे. तेव्हापासून स्वर्गीय आचार्यांच्या आशीर्वादाने झपाटल्यासारखा होऊन मी आजतागायत कादंबऱ्या लिहितच आहे. प्रकाशकही त्यासाठी क्यू लावून उभे असतात. शिवाय केवळ महाराष्ट्रातूनच नव्हे तर जिथे जिथे मराठी वाचक आहे तिथून तिथून (इंग्लंड-अमेरिका-इझ्राएल इ. देशांतून) कादंबऱ्या आवडल्याची पत्रे येतात. आतापर्यंत आलेल्या पत्रांची संख्या पाच हजारांच्या घरात सहज जाईल.

पण मी नम्रपणे सांगू इच्छितो की मी कोणी मोठा अक्षर वाङ्मय किंवा कलात्मक, दर्जेदार असं लिहिणारा लेखक नाही. केवळ जाता जाता वाचकांचे मनोरंजन व्हावे, त्यांना आपल्या दैनंदिन जीवनात दोन घटका विरंगुळा मिळावा हाच माझ्या लिखाणाचा हेतू आहे.आचार्य अत्रे यांनी मला आशीर्वाद दिले तसेच कोणत्या प्रकारचे लेखन करावे याबाबत स्वर्गीय ग. दि. माडगूळकर, आण्णांनीही मला दोन अतिशय महत्त्वाच्या सूचना दिल्याः पहिली, केवळ कल्पनेवर आधारित असं काही लिहू नकोस आणि दुसरी, सिनेमावाल्यांच्या नादी लागू नकोस! जोपर्यंत तुझ्या लिखाणाला वास्तवतेचा आधार आहे तोपर्यंत तुझे लिखाण महाराष्ट्रातला मध्यमवर्ग अतिशय आवडीने वाचेल. दुसरी सूचना सिनेमावाल्यांबद्दल! आण्णा म्हणाले, 'सिनेमावाल्यांच्या नादी लागून मी माझ्या आयुष्यातला उमेदीचा काळ वाया घालवला.' मी आण्णांच्या दोन्हीही सूचना आजपर्यंत कटाक्षाने पाळत आलेलो आहे. आता माझ्या सातआठ कादंबऱ्यांवर चित्रपट निघाले हे खरं, पण 'भालू' या चित्रपटाखेरीज मी दुसऱ्या कुठल्याही चित्रपटासाठी पटकथा - संवाद लिहिण्याच्या भरीस पडलो नाही.

माझ्या सत्तर कादंबऱ्यांतील बहुसंख्य घटना, प्रसंग आणि व्यक्ती मी जवळून अवलोकन केलेल्या आहेत. वानगीदाखल सांगतो, आता नुकतीच मी लिहिलेली कादंबरी 'आय ओ यू' ही इंग्रजी शीर्षक





असलेली कादंबरी प्रकाशनाच्या वाटेवर आहे. तिची जन्मकथा अशी : माझे मित्र रिटायर्ड डी. वाय. एस. पी. श्री. गणपतराव सावंत आणि मी एकदा गप्पा मारत बसलो होतो. मी त्यांना म्हणालो, "तुम्ही तपास केलेली, एखादी लक्षात राहण्यासारखी केस सांगा ना!" क्षणभर आठवल्यासारखे करून ते म्हणाले, 'ही तशी केस किंवा खटला नाही, पण चिरस्मरणीय अशी एक घटना आहे.

"जरूर सांगा", मी म्हणालो.

"सावंतसाहेब सांगू लागले, "१९६० च्या सुमारास मी मुंबईत कुलाबा पोलीस स्टेशनला नेमणुकीस असताना, मला कुलाबा येथील चर्चच्या मागे वास्तव्य करणाऱ्या धर्मोपदेशकाचा फोन आला की, 'आमच्या चर्चच्या आवारात तीसपस्तीस वर्षांची रंगानं सावळी अशी एक बाई मरून पडलेली आहे. आश्चर्य म्हणजे त्या प्रेताजवळ दीड एक वर्षाचं गोरंगोमटं, डोळ्यांत निळसर छटा असलेलं जिवंत मूल आहे.' मी तत्काळ तेथे पोहोचलो. प्रेताच्या स्थितीचा पंचनामा केला. त्या स्त्रीच्या मृत्यूचे कारण शोधण्यासाठी तिचे पोस्टमार्टम (उत्तरीय तपासणी) करून घेतली. त्यात Cause of death due to pneumonia (न्यूमोनिया) as a result of malnutrition म्हणजे अन्नाच्या अभावी न्युमोनिया होऊन ती स्त्री मयत झालेली आहे, असा वैद्यकीय अहवाल आला.

पण ते जिवंत मूल कोणाचे? ते तर रंगानं गोरेगोमटे, डोळ्यात निळसर छटा असलेले हे कोणाचे असावे?

त्या मुलाला अनाथालयात पाठवून मी त्या बाईच्या ठावठिकाण्याची चौकशी सुरू केली. मृत बाईचा फोटो पोलिस गॅझेट व स्थानिक वृत्तपत्रातही दिला. पण तीन महिने झाले तरी काही धागा सापडेना.

कुलाब्यात शांती नावाची एक बाई वेश्यांचा अड्डा चालवते असा एक तक्रार अर्ज माझ्या पोलिस स्टेशनला आला. मी शांतीला बोलावून घेतलं. तिच्याकडे विचारपूस करताना मी तिला सहज त्या चर्चच्या आवारात सापडलेल्या मृत स्त्रीच्या बाबतीत विचारले. शांती म्हणाली - तिच्या अंगावर काही सापडले का? मी तिला सांगितलं की तिच्या कमरेला एक छोटी कापडी पिशवी होती. आणि त्या पिशवीत अशी IOU अशी अक्षरं असलेल्या १८-२० चिठ्ठ्या होत्या. त्या चिठ्ठ्याखाली Frank अशी सही आहे.

शांती लागलीच टाळी वाजवून म्हणाली, "मग हे सोपं आहे! ही वेश्या असली पाहिजे! पी. एल. ४८० या स्कीमखाली भारताला गहू घेऊन येणाऱ्या बोटीवरच्या खलाशांना कृष्णवर्णीय तरुणी मजा करायला खूप आवडतात. जवळचे पैसे संपले की त्या वेश्यांना IOU, ISO, IOU, 250 असे आकडे घालून सही करून चिठ्ठ्या देतात. दुसऱ्या खेपेस ते आले की त्या बायकांचे देणे असलेले पैसे भागवतात. त्या चिठ्ठ्या म्हणजे खलाशांना वेश्यांनी दिलेल्या प्रॉमिसरी नोटस्‌च असतात."

सावंत म्हणाले, "मला तपासाची दिशा शांतीने दाखवून दिल्यानंतर मी मुंबईतले सर्व वेश्यांचे मोहल्ले पालथे घातले. फोरासरोडवरसुद्धा त्या मृत स्त्रीचा फोटो एकीनेही ओळखला नाही. मग मी जिथं तिथं अमेरिकन बोटी गहू उतरत होत्या त्या सर्व बंदरात चौकशीला लोक पाठवले. केरळला त्रिवेंद्रम बंदरात बोटीवर 'फ्रँक' नावाचा खलाशी येत होता व तो एका सावळ्या वेश्येच्या प्रेमात पडला होता हे समजले. अधिक चौकशीसाठी मी स्वतः केरळला गेलो. तर तिथं आणखीन एक गूढ उकलले. तो फ्रँक तिला म्हणाला, "माझ्यापासून जर तुला मूल झाले तर ते मला हवे आहे. मी तुझ्यासह मुलाला

अमेरिकेला घेऊन जाईन. पण एक अट, यापुढं तू वेश्याव्यवसाय करता कामा नये!"

तिने ती अट मान्य केली. तीही अनिश्चित अशा देहविक्रयाला कंटाळली होती. फ्रँकनं तिला दरमहा खर्चासाठी पैसे पाठवायचे वचन दिले. फ्रँक परत गेल्यानंतर ४ - ६ महिने पैसेही पाठवत होता पण नंतर पैसे बंद झाले. इकडे ४ - ५ महिन्यांची गरोदर असलेली ही वेश्या बाळंत झाली. मुलगा झाला. फ्रँकचा शोध घेत वणवण हिंडू लागली. कोणीतरी तिला सुचवले ;'मुंबईला जा, मुंबई बंदरात तुला फ्रँक सध्या कुठे आहे ते समजेल.' दीड वर्ष ती अक्षरशः त्या मुलासह भीक मागून जगली. शेवटी कुलाब्याच्या चर्चच्या आवारात येऊन मरून पडली!

"मग तुम्ही पुढं काय केलंत?" मी विचारलं.

" मी फ्रँकचा अमेरिकेतला पत्ता शोधून काढला. तर त्याची 'ड्युटी' बदललेली होती. तो हाँगकाँग, टोकिओच्या बोटीवर जात होता. पण मी त्याच्या घरच्या पत्त्यावर नेवर्क या न्यूयॉर्क शेजारच्या गावी सविस्तर पत्र पाठवलं. त्यात त्या अनाथालयातील मुलाचा आणि त्या मृतस्त्रीचा फोटोही पाठवला. आणि आश्चर्य असं की पुढे तीन आठवड्यांनी फ्रँक विमानानं मला भेटायला मुंबईला आला. मी त्याला त्या अभागिनीची शोकांतिका सांगितली; तेव्हा तो धाय धाय रडला. Where is my child?' असं त्यानं विचारलं; तेव्हा मी त्याला अनाथालयात नेऊन ते मूल दाखवले. ते मूल म्हणजे फ्रँकची छोटी प्रतिकृतीच होती. त्या मुलाला उचलून घेऊन तो पुन्हा ढसाढसा रडला.

"बाबा, आश्चर्य असं की येताना तो अमेरिकन सरकारची त्या मुलाला अमेरिकेला आणायची लेखी परवानगीच घेऊन आला होता. मी विमानतळावर त्याला व त्या मुलाला निरोप द्यायला गेलो होतो. विमानानं उड्डाण केलं तेव्हा माझ्याही गालावरून अश्रू ओघळले."

सावंतांनी सांगितलेली ती रोमहर्षक हकीकत ऐकून मीही भारावून गेलो होतो. त्याच क्षणी मी निर्णय घेतला. 'आय ओ यू' याच शीर्षकाची आपण कादंबरी लिहायची. Truth is stranger than fiction याचा मला अनुभव आला होता.

अर्थात या मूळ 'जर्मला' फुलवण्यासाठी मला केरळला जावे लागले. तिथले त्रिवेंद्रम बंदर पाहिले. वातावरणाचा बारकाईने अभ्यास केला. नवीन काही पात्रांना 'जन्माला' घातले आणि कादंबरी जन्माला घातली.

बाबा कदम गेली तीसवर्षे महाराष्ट्रात फार मोठ्या प्रमाणावर का वाचला जातो? असा प्रश्न बऱ्याच समीक्षकांना भेडसावतो. पण त्यामागचं रहस्य हे असं आहे. He writes on reality and facts, and uses his imagination skillfully and artistically. पण हे उघडपणे मान्य करण्याचा प्रामाणिकपणा आजपर्यंत एकाही समीक्षकानं दाखवलेला नाही. असो. समीक्षकांच्या अभिप्रायापेक्षा मला माझ्या वाचकांचेच अभिप्राय अधिक मोलाचे वाटतात. ते जेव्हा लायब्ऱ्यांतून बाबा कदम सोडून दुसऱ्या लेखकाचं पुस्तक मागू लागतील तेव्हाच मी पेनला टोपण लावेन.

(बाबा कदम, आनंद, ताराबाई पार्क, कोल्हापूर)

मनोहर शहाणे

# पुत्र

तसा मी कनिष्ठ मध्यमवर्गातला, म्हणून सांसारिक गरजेच्या वस्तू जेवढ्या माफक किंमतीत मिळतील तेवढ्या बघणारा. पूर्वी मी पंचवटी भागात राहात होतो, तिथं गुजराती लोकांची पांजरापोळ ही विश्वस्त संस्था आहे. गायीगुरं वाळगणाऱ्या या संस्थेतर्फे अगदी कमी दरात लोकांना गाईम्हशीचं दूध दिलं जातं.

आमच्याकडील दुधाचा रतीब तिथंच होता. अट एवढीच होती की, गिऱ्हाइकाला खुद्द तेथील गोठ्यात जाऊन दूध आणावं लागे.

मला ही कामगिरी खूप आवडत असे. दूध देणं अगदी भल्या पहाटेपासून सुरू असल्यानं मीही ते आणण्यासाठी काळसर निळसर कबुतरी प्रकाशात घरनं निघत असे. त्या काळात पंचवटीची वस्ती आजच्या मानानं बरीच विरळ आणि गोदातीर अगदी घराच्या उंबरठ्याजवळ. पारलौकिकाची पोतडी घेऊन वसलेला. गोदेचं पाणी वहात असो, नसो. अहल्याबाई पुलाच्या कमानीखालनं वाऱ्याचे धुरासारखे लोट निघायचे आणि पांजरपोळाकडे जाण्यायेण्याच्या रस्त्यावर माझ्या अंगावर येऊन आदळायचे. त्या वाऱ्यानं अंगावरल्या केसाळ लवेमध्ये सुखद खळबळ माजायची. रस्त्यावरली तुरळक धुंदूरमासी रहदारी थेट स्वप्नातून उचलून आणल्यासारखी वाटायची.

आणि मग एके पहाटे मला माझ्या 'पुत्र' मधील अच्युत असाच पहाटे पहाटे सापडला.

माझ्याप्रमाणे पांजरपोळकडे जाणारे आणखीही लोक असायचे. माझ्या पुढं आणि माझ्या मागं. तर एकदा एक तरुण आपल्या समवेतच्या दोघातिघांना काही तरी ऐकवत होता. पहाटेच्या शांततेत सिमेंट कॉंक्रिटवर पडणारी पावलंदेखील टपटप वाजतात. तर याचा आवाज त्याहीपेक्षा वरच्या पट्टीचा होता. आणि त्यानंच माझं लक्ष त्याच्याकडं वेधलं गेलं. लक्ष म्हणण्याऐवजी कान वेधले गेले असं म्हणणं अधिक बरोबर होईल.

तो बाजूच्यांना म्हणत होता, "आमच्या बापाला आम्ही म्हणालो की बघ रे, असा मंकसपणा चालायचा नाही. आम्ही बापाला ठणकावून सांगितलं की, स्वर्गातनं पितर जरी खाली उतरले तरी आपण कॉलेजात जायचं सोडणार नाही."

त्या पहाटे आपल्या बोलण्याच्या स्टाइलनं लक्षात आलेला तो तरुण मग त्या दिवसानंतरही दोन

चार वेळा सारखा भेटतच गेला. तरीही त्याच्या बोलण्याच्या आगळिकीमध्ये नंतर तसूभरचाही फरक पडला नाही. त्याच्या तोंडून तुच्छतेनं बाहेर पडणाऱ्या प्रत्येक वाक्याच्या कपाळावर 'आमचा बाप'चा टिळा भगभगीतपणे टिपलेला असायचाच. त्या दोन शब्दांविना जर त्यानं वाक्य उच्चारलं असतं तर ते निश्चितपणे एखाद्या विधवेसारखं वाटलं असतं.

एवढ्या अहंभावीपणे सतत बोलणारा हा तरुण पोरगा आहे तरी कोण? हे जाणून घेण्यासाठी माझं मन बेचैन झालं.

एक दिवस योगायोगान तो पांजरपोळमधील दुधाच्या रांगेत, चारपाच माणसं टाकून, माझ्या पुढं होता. त्याचा नंतर लागेपर्यंत त्याच्या पिछाडीला असलेल्या त्याच्या मित्राशी त्याची ताशेरेबाजी चालूच होती.

माझा नंबर येईतो तो आपल्या दुधानिशी पांजरापोळच्या भल्यामोठ्या लोखंडी फाटकाबाहेरही पडला होता.

तोंडावर तोंड पडणारा, दूध वाटणारा कर्मचारी माझ्या ओळखीचा झाला होता. त्याला मी विचारलं, "एवढ्या दणदणीत आवाजात बोलणारा मघाचा तो तरुण कोण हो?"

"तो? बापाला शिव्या घालणारा?" त्यानं मला विचारलं.

"तोच."

"माहीत नाही? तो xxxxx च्या मंदिराच्या पुजाऱ्याचा मुलगा आहे."

त्यानं सहजपणे उत्तर केलं आणि मीही ते सहजतेनं घेतलं.

आणि मग माझ्या मनात विचारांची आवर्तनं सुरू झाली की, हा तरुण असं बोलण्याइतपत असा का घडला गेला असावा? माणसाचं तारुण्यच असं असतं की, ते त्याला इतरांविषयी तुच्छता दर्शविणारी नजर देतं. चेहरा देतं आणि त्याच्या स्वरयंत्रात तशा शब्दांची रुजवातही करतं.

परंतु हा ब्राह्मण होता. पुजाऱ्याचा मुलगा होता. कॉलेजात जाणारा होता. कदाचित त्याचं काळ्या रामाच्या मंदिराच्या ओसरीतल्या अथवा अन्यत्र असलेल्या संस्कृत पाठशाळेत वेदमंत्राचं अध्ययनही झालं असेल!

...... अगदी निश्चितच!

कुठलाही वेदमंत्र तुम्ही घ्या. मनःपूर्वक वाचा. त्या वेदमंत्राचं अपूर्पत्व मला अनेक अंगांनी, विजेनं स्पर्शून जावं तसं जाणवून गेलेले आहे.

विजनवासात आत्मलक्ष्यी तपस्या करणारे ते ऋषी!

ऐहिकतेला जाळून टाकणाऱ्या साक्षात्कारी स्फुल्लिंगाद्वारे उजळणाऱ्या मार्गावर त्यांना दिसलेली तत्त्वं.

आणि तो तत्त्वं गुंफून पंचमहाभूतांना आवाहन करणाऱ्या त्यांच्या त्या तेजस्वी प्रार्थना!

पाचदहा ब्राह्मणांच्या वृंदानं तालबद्धरीत्या केलेला मंत्रघोष नुसता ऐकतानाही आपल्या शरीरात, चैतन्यात किती वलयं जागृत होऊन फिरू लागतात.

एकातून एक निघणाऱ्या अशा विचारशलाकांमधून 'पुत्र'मधील नायक अच्युत माझ्यासमोर साकार होऊ लागला. संस्कृत संस्कारशास्त्रान्वये 'पुत्र' या शब्दालाही मला अनेक अर्थछटा मिळाल्या.

'नरकापासून वाचवणारा', 'वोट धरून इप्सिताकडं नेणारा' वगैरे आणि 'अच्युत' या शब्दाची अर्थफोड तर करायला नकोच.

आता नायक जन्मला, त्याला भूमी तर हवीच. ती तर माझ्या मनात दीर्घ कालावधीपासून निर्माण होत होती. माझं जन्म, शिक्षण, बालपण, मोठेपण सर्व काही गोदेच्या काठी बसलेल्या नाशिकमध्ये गेलेलं.

आणि प्रत्येक शहराला असतं तसं एक आपलंपण नाशकालाही आहे आणि ते म्हणजे तीर्थक्षेत्र. देव आणि दानव यांनी केलेल्या मंथनानंतर इथं एक अमृताचा थेंब सांडलेला. वनवासात असताना राम आणि सीता इथं राहून गेलेली. (रात्र संपली होती तरी त्यांच्या गोष्टी संपल्या नव्हत्या.) इथनंच रावणानं सीतेला पळवून नेलेलं. पोथ्यापुराणातल्या या गोष्टी सोडून दिल्या तरी श्राद्ध पिंडदान यासाठी हे जास्त प्रसिद्ध. पवित्र गोदा. काही मैल अंतरावर बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक त्र्यंबकेश्वर. अशा नाना तऱ्हांनी नाशिक हे सततच्या धर्मकर्मांनी गजवजलेलं. सिंहस्थ, रामजन्म, निवृत्तीनाथ यात्रा.... नेहमी काही ना काही चालू असलेलं. ही ना ती कर्मकांडं अहोरात्र चाललेली. आता ही कर्मकांडं प्रत्यक्षात धर्माचं अंग असलेली अशी असतीलच असं नाही. तरीही धर्माच्या महावस्त्राला ती अस्तरासारखी 'आतनं' शिवलेली असतात.

मी राहात होतो पंचवटीत तर माझ्या कामाचं ठिकाणं होतं नाशिकमध्ये. तेही अगदी पल्याड नदीकाठीच. नाशिकला भटजी महाराजांचा म्हणून जो मठ प्रसिद्ध आहे त्या मठाच्या एका इमारतीत 'अमृत' मासिकाचं कार्यालय होतं. मी 'अमृत' मासिकाचा संपादक. घर ते कार्यालय आणि कार्यालय ते घर हा माझा पायी प्रवास नदीकाठानं आणि घाटानं व्हायचा. (अर्थातच पावसाळ्यात गोदेला पूर आला की, या प्रवासात खंड पडे.) आणि या प्रवासात मला नाशिकची जी महत्त्वाची म्हणून धर्मकार्ये चालायची ती अगदी जवळून पहायला मिळायची. रामकुंड, कुशावर्ताच्या भटाभिक्षुकांचा सर्व व्यवहार मला साद्यंत पहायला मिळायचा. नाशिकच्या अस्सल भटांची मुलं माझ्या नित्य परिचयातली होती. भटब्राह्मणांबरोबरच नदीच्या घाटांना त्वचेसारखा चिकटलेला विविध भिकाऱ्यांचा थवाही माझ्या दररोजच्या पहाण्यातला असायचा. याशिवाय नाशकातल्या प्रमुख देवळांचे उत्सव, वेगवेगळ्या कारणांनी भरणाऱ्या यात्रा, जत्रा.....

हा सारा व्यवहार वर्षानुवर्षे डोळ्यांपुढून सजीवनिर्जीवपणे सरकत जात असताना माझ्या मनातल्या मनात, कळतनकळत या मनुष्यपटलाच्या अनुषंगानं काही प्रश्न निर्माण होत गेले.

धर्म म्हणजे काय?

माणूस आणि धर्म यांचा आंतरिक संबंध कसा असायला हवाय?

माणसासाठी धर्म की धर्मासाठी माणूस?

आणि त्यावरनं शेवटी माणूस आणि त्याचं आयुष्य यांची व्याख्या काय करायची? माणूस स्वतंत्र आहे की परतंत्र? प्रत्येकजण हा त्याचंच आयुष्य जगत असतो की दुसऱ्या कुणाचं? आपल्याला जे दिसतं, जाणवतं, स्पर्श करतं त्याचा खरोखरी आपल्याशी संबंध असतो काय?

असे कितीतरी प्रश्न!

आपल्याला प्रश्न तर सुचतात. उत्तरं मात्र सुचतातच असं नाही. त्यामुळं आपला कोंडमारा

होतो. आपण चिडतो, उद्विग्न होतो, अश्रद्ध होतो, तुच्छतावादी होतो.

गंगेच्या घाटावरील मानवी जीवन, मानवी व्यवहार पाहताना धर्मानं माणसासाठी नेमकी काय भूमिका पत्करली पाहिजे, हा संदेह मनोमन छळत राही. केव्हा तरी बुद्धधर्माविषयी वाचत असताना धर्मानं रुग्णालयाचं काम करायला हवं, मानसिक आधीव्याधी या रुग्णालयात बऱ्या व्हायला हव्यात, असं सूचन करणारं मी काहीतरी वाचलं. त्यानं समाधानही वाटलं आणि असमाधानही.

आणि मग मला 'पुत्र' कादंबरी लिहावीशी वाटली. अच्युत तर प्रत्यक्षात मनानं उभा केला होताच. त्याला जी मनःस्थिती हवी होती, ती संपूर्ण गंगाकाठानं, त्यावर उरकल्या जाणाऱ्या व्यवहारानं आणि त्या व्यवहारांच्या सावल्यांमध्ये उभ्या असलेल्या प्रश्नांनी मला दिली. 'पुत्र'मध्ये मी अच्युत रंगवला तो 'फाटक्या पंखांचा देवदूत' म्हणून. 'जगात जे काही काळं कृत्य घडतं, वाईट घडतं, त्याला आपणच कारणीभूत आहोत', असं स्वतःला समजणारा 'Guilt ridden' तरुण म्हणून. तर त्याचा बाप हा त्याच्या भूतकाळाचा प्रतिनिधी, किंबहुना 'जनक' म्हणून मांडला गेला आहे. हा जनक भ्रष्टाचारी, स्त्रीलंपट, अपराधी, धर्माचा अपलाप करणारा, धर्माला स्वतःच्या सुखलालसेसाठी बटिक म्हणून वापरणारा.. आणि 'अशा' त्यानं जन्माला घातलेला 'पुत्र' हा काही, त्याला हवं तसं त्याचं प्रतिबिंब म्हणून उमटलेला नाही. बापानं वंशसातत्याच्या साखळीनं आणलेलं सर्व काही उद्ध्वस्त करून आपल्या स्वतःच्या स्वतंत्र जगाची उभारणी पुत्राला करायची असते. त्या दृष्टीनं तो बंड उभारतोही. परंतु त्याच्या बंडाच्या मर्यादा केवळ त्याच्या शब्दांच्या बुडबुड्यांपर्यंतच टिकतात. त्याला लवकरच कळून येतं की आपल्या हातात काहीच नाही. वारशानं आपल्याला जे मुखवटे मिळले आहेत ते पालखीत ठेवून, ती पालखी आपल्या खांद्यावरनं मिरवायची आहे. मुखवट्याचे नवनवीन उत्सव भरवायचे आहेत. जत्रा सजवायच्या आहेत.

आशय पेलणारा रुंद खांद्याचा नायक अच्युत, आणि आशयाला उठाव देणारी पार्श्वभूमी माझ्या अगदी मनानजिक उमलल्यानं मला ही कादंबरी लिहून काढायला केवळ तीनेक महिन्यांचा काळ पुरला. माझ्या दोन कादंबऱ्यांमधला काळ तसा खूपच दीर्घ ठरणार आहे. परंतु एकदा कादंबरी सुचली की कागदावर उतरवून काढायला मात्र मला तीनचार महिन्यांपेक्षा जास्त कालावधी लागला नाही.

'पुत्र' कादंबरी प्रसिद्ध झाल्यानंतर तिचं चांगलंच स्वागत झालं. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्यासारख्या खूपच जाणत्या समीक्षकानं 'ललित'मध्ये 'पुत्र'वर आणि त्या अनुषंगानं माझ्या एकंदर साहित्यावर एक दीर्घ लेख लिहिला. त्या वर्षी मला 'पुत्र'चं राज्य पारितोषिक मिळायचं होतं, परंतु महाराष्ट्रात भीषण दुष्काळ पडला आणि त्यानं त्या वर्षीचा राज्यपुरस्कार समारंभ रद्द करण्यात आला.

'पुत्र' कादंबरीवर एक चांगलं नाटक होऊ शकेल, असं दामू केंकरे, माधव वाटवे इत्यादी लोकांनी मला सांगितले. मी तसं दुर्लक्ष केलं. परंतु नाशिकच्या नाट्यनम्रता या संस्थेनं आणि विशेषतः सुभाष सोनावणे आणि सौ. जयश्री खिरे यांनी खूपच प्रोत्साहन दिल्यानं एकदाचं नाटक लिहिलं. ते १९७७ च्या सुमारास राज्य नाट्यस्पर्धेत सर्वप्रथम आलं. त्याला विक्रमी पारितोषिकं मिळाली. मलाही नाट्यलेखनाचं पारितोषिक मिळालं.

अल्बेर काम्यूच्या 'आउटसायडर' कादंबरीला पंचवीस की कितीतरी वर्षे झाली म्हणून श्री. वसंत

आबाजी डहाके यांनी 'आउटसायडर'चे मराठी समकालीन असा एक निबंध लिहिला, तो त्यांनी फ्रेंच कॉन्सुलेटच्या एका परिसंवादात वाचला. (पुढं तो महाराष्ट्र टाइम्समध्ये प्रसिद्ध झाला.) त्यात त्यांनी 'पुत्र'चा एक अस्तित्ववादी कादंबरी म्हणून गौरवपूर्ण उल्लेख केला आहे.

---

O १९४७ साली मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर वृत्तपत्रक्षेत्रात प्रवेश. त्यापूर्वीही कथा, विनोदी लेख, प्रसिद्ध. ना. सी. फडके संपादित 'संचार', 'झारापकर', 'विसावा' वगैरे. साप्ताहिक गावकरीचे काही काळ संपादन. नंतर 'अमृत' मासिकाचे संपादन (१९५४).

O १९६२ पासून 'सत्यकथा' मासिकात कथालेखन.

O पहिली कादंबरी 'धाकटे आकाश' प्रसिद्ध (१९६३) आतापावेतो नऊ पुस्तके प्रसिद्ध.

O १९९३ साली जगन्नाथपुरी येथे भरलेल्या All India Little Magazine's Conference' मध्ये 'Little Maganzines of Maharashtra -A Retrospechive' या इंग्रजी निबंधाचे वाचन. नंतर अध्यक्षपदी निवड.

O सत्यकथेत प्रकाशित 'लकवा' कथेचे फ्रेंच भाषेत रूपांतर.

O साहित्य अकादमी, नवी दिल्ली, ' Primary Panel Adviser म्हणून निवड

**प्रकाशित कादंबऱ्या** O १. धाकटे आकाश (राज्य पुरस्कार), २. झाकोळ, ३. देवाचा शब्द, ४. पुत्र, ५. ससे, ६. लोभ असावा आणि एखाद्याचा मृत्यू (राज्यपुरस्कार), ७. इहयात्रा. आरसे (मौज दिवाळी अंक)

आगामी - 'संचित'

(मनोहर शहाणे, सुनीती सोसायटी, वावरे मार्ग, नाशिक)

---

o स्ट्रॉबेरी उत्पादन तंत्र : आर. एम. खर्चे, द्वारका प्रकाशन. पृष्ठे १६० सव्वादोनशे रुपये
o युगान्त : महेश घाटपांडे, सुयश प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६६. पंचवीस रुपये
o याही अवस्थेत : एन. यी. मिसाळ, सुरभी प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४. साठ रुपये
o हिंदी - इंग्लिश - सिंधी शब्दकोश : देवदत्त शर्मा, सुपर साहित्य. पृष्ठे १००० रुपये
o रोजगार : मोहन निकम, पाटील, अनघा प्रकाशन, ठाणे. पृष्ठे ६७. चोवीस रुपये
o इशारा : शोभा गायकवाड, अजिंक्य प्रकाशन, अमरावती. पृष्ठे ५६. तीस रुपये
o पप्पू आणि टॉमी : शोभा गायकवाड, अजिंक्य प्रकाशन, अमरावती. पृष्ठे ४०. वीस रुपये
o चार एकांकिका : मधुसुदन शहा, सुविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे ८८. पंचवीस रुपये
o जीवनाच्या संदर्भात : रा. श्री. जोग, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे३१ छप्पन्न रुपये
o फोर्टस इन महाराष्ट्र : श्रीकांत तापीकर, चंद्रमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६६ पन्नास रुपये
o फडके कुलवृत्तांत : सं. ल. वि. फडके, फडके प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २११. शंभर रुपये
o क्वेट्टा टेरेस : ज्योती सोमण, शुभदा सारस्वत प्रकाशन, पृष्ठे २३२. सव्वाशे रुपये
o नाते कोश : द. के. साठे, अपूर्वा प्रकाशन, ठाणे. पृष्ठे ६८. चाळीस रुपये
o सिकंदर : प्रमोद ओक, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे २३०. एकशेचाळीस रुपये

अनुक्रमणिका






विद्या सप्रे

# नादनदी

कोणत्याही बाबतीत झाकली मूठ सव्वा लाखाचीच असल्यानं

'अवचित जशि कधि तळपुनि जाई सौदामिनि अंबरी।
मी न कथावे, कशी स्फुरते मज बृहदशि कादंबरी॥

ही माझी भूमिका! साहित्य निर्मितीसारख्या गुंतागुंतीच्या प्रक्रियेसंबंधीचं गूढ स्वतः लेखकालाही पूर्णपणे उमगत नसता ते इतरांना उकलून सांगण्याच्या प्रयत्नामुळे आस्वादप्रक्रियेवरही दुष्परिणाम घडायचा संभव असतो.

पण शंकर सारडा यांच्या कल्पनेमुळे असं विचारमंथन घडलं तर नव्या दिशाही गवसण्याचा संभव असल्यानं लिहावंसं वाटलं.

लिहीत असताना प्रत्येक कादंबरीच प्रिय वाटते. पण प्रकाशनानंतर मात्र तिच्या मर्यादा ध्यानात येतात आणि ती मनातून उतरते हा माझा अनुभव. तेव्हा कोणत्या कादंबरीविषयी लिहावं हा प्रश्नच होता. पण अनेक पुरस्कारप्राप्त कादंबरीकारांच्या पंगतीत पानावर बसताना नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या कादंबरीविषयी लिहिलं तर पुरस्कार वगैरे मिळण्याएवढा कालच व्यतीत झालेला नाही, असं गंमतीनं सांगून आब राखून घेता येईल, या दृष्टीनं 'नादनदी'ची निवड केली, एवढंच!

वर्तमानकालातून वक्तव्यं निपजतात तर साचलेल्या कालातून साहित्यनिर्मिती घडते, असं बर्नार्ड शॉयानं म्हटलंय, त्याची प्रचीती 'नादनदी'च्या संदर्भात प्रकर्षानं येते. लेखन हे आत्मचरित्रच असल्यानं आणि अनेक लेखकांची आत्मवृत्तं वाचल्यावर त्यांच्या अन्य साहित्यातली मजा जातेय असं वाटल्यानं आत्मपर काही लिहू नये हा माझा (वय होण्यापूर्वीचा तरी) विचार! पण लेकीच्या जन्माची कथा सांगायला निघाल्यावर पार्श्वभूमी म्हणून आईचा वृत्तांतही अपरिहार्यपणे कथन करावाच लागतो.

शिवाय 'नादनदी' या त्रिवेणी संगमात अध्यात्म व संगीत या गंगायमुनांबरोबर (योग्यतेनं नव्हे, पण लेखिकेचं नाव त्या आशयाचं असल्यामुळे) सरस्वतीही गुप्त रूपानं वसते आहेच, असं चेष्टेखातर म्हणता येईल.

एका सुखवस्तू, सुशिक्षित, रसिक, कला व वाङ्मयप्रेमी काही मूल्यं कटाक्षानं पाळणाऱ्या सनातनी कुटुंबात माझा जन्म झाला, हे माझं सुदैव! अध्यात्म आणि संगीताच्या दूधसाखरेवर मी







डोळे उघडता उघडता आईच्या हातातले 'विशाखा' आणि 'वाग्वैजयंती' हे काव्यसंग्रह दिसले. देवाधर्मांचे ग्रंथ वाचणारी आजी दुपारी आडवी झाली असता हरिभाऊ आणि नाथमाधवांच्या कादंबऱ्या वाचत असलेली दिसायची. घरी सतार, हार्मोनियम, फोनो आणि शास्त्रीय-नाट्यसंगीताच्या ढीगभर ध्वनिमुद्रिका!

धारवाडमध्ये आयुष्य गेलं ही तर मला भाग्याची परमावधी वाटते. शाळेच्या वाटेवर मध्यावर यम्मीकेरी तळे. तळ्याच्या उजवीकडे गंगूबाई हानगलांचं घर. डावीकडे दोन पावलं वर गेलं की देसायांच्या आमराईत रखवालदाराच्या पडवीवर एक उंच सडसडीत माणूस समोरच्या म्हशीला रागदारी गाणं ऐकवत बसलेला दिसायचा. ते पं. मल्लिकार्जुन मन्सूर हे नंतर समजलं. शाळेच्या पलीकडच्या रस्त्यानं परतताना माडीवरून पं. बसवराज राजगुरू यांचे सूर भूल घालायचे.

पण संगीत या विषयासह पदवी घेता आली तरी, अगदी बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर हे माझ्या गुरूंचे परात्पर गुरू असूनही मी काही गायिका बनू शकले नाही. मला गाणं शिकवणारांच्या माझ्याकडून खूप अपेक्षा होत्या. संगीतावर खूप प्रेम असलं तरी नृत्य, चित्रकला, भरतकाम, कशीदा, विणकाम - सगळ्यातच मला पारंगत व्हायचं होतं. खूप खूप वाचायचं होत. अध्यात्माची ओढ असल्यानं कीर्तनं करायची होती. खूप प्रवास करून शिल्पकलेचा आस्वाद घ्यायचा होता आणि या सगळ्यापूर्वी शैक्षणिक कारकीर्दीत विक्रम करायचे होते. या प्रत्येक गोष्टीप्रीत्यर्थ एकेक जन्म पुरणार नसता देवानं दिलेल्या एकाच आयुष्याचा विनियोग केवळ संगीत-साधनेत करायची माझी तयारी नव्हती.

मी स्वभावानं उत्कट. जन्मापासूनच्या काळात सारेच दीप जणू मंदावलेले!

सारीच क्षेत्रं किडत असलेल्या या दिवसात एखाद्या तत्त्वाचा वा कलेचा ध्यास घेणाऱ्या व्यक्ती त्या तत्त्वापेक्षा वा कलेपेक्षाही मला अधिक प्रिय वाटतात.

मी फक्त स्वप्नं पाहात राहिले. माझ्या आदर्शांनी आयुष्यभर तपस्या करून आपली विराट स्वप्नं मूर्तरूपात आणली. त्यांना प्रेरणा वा सामर्थ्य कुठून लाभलं असेल? साध्या माणसातून हे नानाविध क्षेत्रातले मानदंड उभे राहिले कसे, याचा रसिकतेनं शोध घेण्यात मन गुंतलं होत. आतून काही उचंबळत होतं, अंकुरत होतं, उमलत होतं.

याच वेळी बाल असूनही बालवाङ्मयात न रमणारा माझा मुलगा 'खादाड असे माझी भूक, चतकोराने मला न सुख' म्हणत रोज दोन तरी नव्या जाडजूड पुस्तकांची मागणी करत होता. त्याला पुस्तकं पुरवत असतानाचे ते दिवस माझे आत्मभानाचे दिवस ठरू लागले.

जवळची पुस्तकं मला मुलाच्या हाती ठेववेनात.

नजरेसमोरचे कथाकार स्वतः आयुष्याचा सर्वांगानं उपभोग घेत वाचकांना मात्र उदास वातावरणात नेणाऱ्या एकसुरी, नियतीशरण कथा लिहीत होते आणि वेदनेची नस पकडण्यासाठी खोलात उतरणारा, प्रतिभावंत असं त्यांना म्हणत अन्य कथाकार त्यांचं अनुकरण करत होते.

लोकांना दुःख, यातना देणं हेच नियतीचं एकमेव कार्य मानून चाललं तर आजचं जग आहे याच स्थितीत दिसलं असतं का, असा मला प्रश्न पडायचा.

ध्येयवाद, बोधवाद आणि रंजनवादाची कुंपणं उडवून देत आपली कादंबरी माणसात आली, अशी घोषणा करणारे श्रेष्ठ कादंबरीकार लैंगिक रंजनाच्या चकव्यात स्वतःच सापडलेले असूनही

ना. सी. फडके यांच्या ठराविक रिंगणातली कादंबरी मुक्त केल्याची शेखी मिरवत होते.

वृत्तछंदांवर नियंत्रण तर राहोच; त्यांचं सोयरसुतकही नसलेल्या कवि-कवयित्रींच्या छोट्या छोट्या ओळी उत्तम काव्याचा आनंद देऊ शकत नव्हत्या.

ललित साहित्य प्रयोजनशून्य असते असं थोर लेखक म्हणाले तरी वाचक हेतुशून्यपणे पुस्तकांकडे वळत असतात का?

"मी प्रबोधनाच्या हेतूनं नव्हे, हौसेनं पत्रकारितेत आलो" असं तीस वर्षे प्रतिष्ठेच्या वृत्तपत्राचं संपादन करणारे विद्वान उद्गारतात तेव्हा श्रोत्यांना धक्का बसणारच.

"मी उत्पन्नाचं एक साधन म्हणून लेखन करतो. साहित्यावरच्या प्रेमानं नव्हे." असं जीएंच्या तोंडून ऐकत असता ते गंमतीनं बोलताहेत असं वाटायचं.

पण सुनीताबाईंना लिहिलेल्या पत्रातही 'मी इतरांप्रमाणे लेखन हा एक श्रेष्ठ व्यवसाय मानत नाही. मराठी वाङ्मयाला उत्तुंग स्थानी पोचवण्यात मला रस नाही. लेखनामागची माझी निष्ठा देखील कदाचित साहित्यिक नसेल' असं जीए म्हणताना आढळतात, तेव्हा मन धक्का बसण्यापलीकडील स्थितीला पोचलेलं असतं.

या पार्श्वभूमीवर संजीव कपूरसारखे पंचतारांकित नंबर एकवर मुख्य शेफ 'मला भारतीय पाककला जगात नंबर एकवर नेऊन ठेवायची आहे' अशी महत्त्वाकांक्षा व्यक्त करतात, तेव्हा जगावंसं वाटतं.

सामाजिक बांधिलकीच न मानणाऱ्या असल्या साहित्यिकांच्या कृती याच समाजात राहून प्रगती करू इच्छिणाऱ्या तरुण पिढीला मग काय देऊ शकणार?

"प्राप्तकाल हा विशाल भूधर, निजनामे त्यावरती खोदा ।
बसवूनी का वाढविता मेदा, विक्रम काही करा चला तर ॥"

अशी केशवसुतांनी आम्हाला बालपणीच स्फूर्ती दिली.

कुसुमाग्रजांनी 'रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल' असा अनंत काळपर्यंत टिकणारा दिलासा दिला. पृथ्वीच्या प्रेमगीतात वैज्ञानिक सत्यं काव्यमय कल्पनांत गुंफून विज्ञान आणि कलेचा अभूतपूर्व संगम घडवला.

कुसुमाग्रजानंतरच्या अनेक कवींनी कुसुमाग्रज पारितोषिकं मिळवली; पण या पाच तपांत चिरंजीव होऊ शकणारी एक काव्यपंक्ती कुणी रचू शकलं का?

गीतरामायणातून 'अंत उन्नतीचा पतनी होई या जगात, सर्व संग्रहाचा वत्सा नाश हाच अंत' अशी त्रिकालाबाधित सत्यं सांगणारे अपर वाल्मिकी गदिमा हा एक सुखद अपवाद!

सृष्टिकवी म्हणून ख्याती पावलेल्या बालकवींनी आपल्या अत्यल्प आयुष्यातल्या प्रगल्भतेच्या चार क्षणात आनंदाचं उद्गान केलं. फुलराणीला अवगत नसलेल्या प्रणयचंचला भ्रूलीलांच्या निमित्तानं प्रणयजीवनाचं चित्रण केलं.

'दिन पक्षमास ऋतुवर्ष भराभर गेले हे रक्त जसेच्या तसेच साकळलेले' अशा शब्दात आणि 'पारवा' कवितेच्या रूपानं त्यांनी आत्यंतिक औदासिन्याला वा विलक्षण व्यथेला वाचा फोडली.

हल्ली महाकाव्याची निर्मिती नसेना का! ती उणीव कादंबऱ्यांनी भरून काढायला हवी ना?

माणसाला सुखोपमोगांची तीव्र लालसा असते. पण दुसऱ्याचं सुखही स्वतःच्या सुखाइतकंच महत्त्वाचं असतं हे त्यानं ओळखून स्वतः सुखी होताना दुसऱ्याच्या सुखाला छेद देऊ नये, हा संयम सुचवण्यासाठी खांडेकरांनी 'ययाती' लिहिली.

पण त्यानंतर एका तरी लेखकानं अशा योग्यतेची कादंबरी लिहिली का? नवरसांचा प्रत्यय कुणी आणून दिला? विसाव्या शतकाच्या अखेरीस जगात जर ज्ञानाचा स्फोट झालेला आढळतो, तर त्याचं प्रतिबिंब साहित्यातही पडावं. नव्या पिढीला इतिहास, अध्यात्म, विविध कला इ. संस्कृतीच्या अंगांचा परिचय व्हावा. बीभत्स हा देखील एक रस गणला गेला असला तरी त्याचं अस्तित्व शांत, उदात्त, रौद्र, करुण रसांना अधोरेखित करण्यासाठी, हे कुणीतरी पटवायला हवं. हेतुपूर्वक कादंबरीलेखन घडायला हवं, असं मला आतून वाटत होतं.

ज्ञान आणि रंजन हे ललित साहित्याचे निकष. लालित्याच्या अवगुंठनाखालून थोड्या तरी ज्ञानाची प्रचीती यायला हवी. साहित्याची चालून आलेली थोर परंपरा पाहता कादंबरीपासून वाचकांना लाभणाऱ्या प्रबोधन आणि कलात्मक आनंद यांच्या टक्केवारीविषयी मतभेद होऊ शकतील; पण कादंबरीवाचनामुळे माणसाच्या मनाचं क्षितिज विस्तारलं पाहिजे, त्याचं जीवन अधिक अनुभवसमृद्ध, व्यक्तिमत्त्व अधिक उदात्त झालं पाहिजे, हा विषय तर वादग्रस्त ठरणार नाही ना?

ज्या कादंबऱ्यांच्या वाचनामुळे जगाचं, मानवी जीवनाचं सम्यक् ज्ञान होतं आणि वृद्धिंगत होतं, या आयुष्यातली सुखं भोगण्याची आणि दुःख सोसण्याची एक विशिष्ट मनोवृत्ती तयार होते, अशा श्रेष्ठ कादंबऱ्या लिहिणारे किती लेखक आज आढळतात? साहित्य निर्मितीत विद्वत्तेचा सहभाग आवश्यक आहे की नाही?

साहित्याकडून प्रबोधनाची अपेक्षा करणं हे बालबोधपणाचं लक्षण नाही.

कलेसाठी कला एवढंच नव्हे तर जीवनासाठी कला म्हणणारे देखील ('माझं जीवन, एक कादंबरी.' पृ. २१५-१६) म्हणाले आहेत, "ललित साहित्यात मतप्रचार आणायचाच झाला तर ज्या योगे समाज अधिक बलिष्ठ, तेजस्वी होइल त्या विचारसरणीचं प्रतिपादन लालित्ययुगाला धक्का न लागेल अशा कौशल्यानं साहित्यात करावं. गांधीवादीची भलावण करणाऱ्या साने गुरुजींच्या साहित्यामुळे वाचक रडवे, पौरुष्यहीन होण्याचा धोका असल्याने संस्कारक्षम तरुण पिढीच्या हाती देण्याच्या लायकीचं हे साहित्य नाही. सावरकरांचं बुद्धिवादी, पराक्रमाची शिकवण देणारं साहित्य द्यायला हवं."

या पार्श्वभूमीवर लोकप्रियतेसाठी लैंगिक रंजनाचा अवलंब करणाऱ्या लेखकांच्या कृतींना निदान प्रतिष्ठा तरी मिळू नये, असं कुणालाही वाटेल.

लेखकांच्या नैतिकतेवर भर देणाऱ्या भालचंद्र नेमाडेंनी 'टीकास्वयंवर' मध्ये साहित्यातील लैंगिकतेच्या अवास्तव वापराविषयी आक्षेप घेत आपल्या कादंबऱ्यांच्या निमित्तानं हितोपदेशही होऊन गेला तर खूपच झालं असं आपण समजू, असं म्हटलं आहे. (पृ. २७६, २७७)

आणि स्वतःला नास्तिक, अश्रद्ध, बुद्धिवादी म्हणवण्यात भूषण मानणारे लेखकही शांती, समाधानापासून वंचित का राहातात? सुनीताबाई वा जीएंसारख्या बुद्धिवाद्यांना कायम अस्वस्थताच का वेढून असते?

अत्यंत प्रगत अशा विज्ञानशाखेशी संबंधित असल्याने श्रद्धा आणि अंधश्रद्धा यांच्यातला फरक मला कळत असावा. विज्ञानामुळे सृष्टिनिर्मिती कशी झाली, याचं ज्ञान होत असलं तरी ती का झाली याचं आकलन होत नसल्यामुळे आधुनिक काळात सर्वश्रेष्ठ बुद्धिवादी आइनस्टाइन यांचा परमेश्वरी शक्तीवर विश्वास होता.

म्हणूनच लिंगवाद, इहवाद, बुद्धिवाद वा अन्य अनेक वादांच्या झेंड्यांच्या बरोबरीने आपण श्रद्धेची एक पताका साहित्याच्या आकाशात फडकवायला हवी, अशी मला ऊर्मी आली.

'श्रद्धावान् लभते ज्ञानम्' असं भगवंतानं गीतेत सांगितलं आहे. ज्ञान हेच परमेश्वराचं स्वरूप असतं. आणि 'संभवामि युगे युगे' असं परमात्म्यानं कधीकाळी अर्जुनाला दिलेलं वचन स्मरता स्मरता अचानक माझ्या मनात कोटिसूर्यांचा प्रकाश उजळला.

' आम्ही असू लाडके

देवाने दिधले असे जगत हे आम्हांस खेळावया' या केशवसुतांच्या विधानाचा वेगळाच अर्थ मला प्रतीत झाला.

आपल्या वाट्याला मर्यादित जीवनच आलं असलं तरी कल्पनेच्या पंखांद्वारे त्या पलीकडे जाऊन साऱ्या विश्वात संचारण्याचं, प्रत्येक व्यक्तीच्या मनात डोकावून पाहाण्याचं सामर्थ्य आपल्यात असतं. आणि युगायुगांत संभवणारा परमात्मा आज चतुर्भुज स्वरूपात थोडाच प्रकटणार आहे? तो कुणाच्या तरी– साहित्यिकांच्या माध्यमातून प्रेरणारूपाने अवतरत असतो.

या दृष्टीनं कवी (प्राचीन अर्थानं तत्त्वज्ञ, विद्वान) देवाचे लाडके म्हणजे देवानं आपल्या कार्यार्थ निवडलेले सुदैवी जन असावेत. म्हणून लेखकांनी आपण शून्यातून विश्व निर्माण केल्याची वल्गना न करता अधिक विनम्र असायला हवं.

आणि हा विवेक सुचलेल्या क्षणी तरुण पिढीला स्फूर्ती देणारं, आकांक्षा जागवणारं, सश्रद्ध बनवणारं लेखन करण्याची मला प्रेरणा झाली.

गर्भसंभव झालेला समजत नाही. जन्म दिसतो.

म्हणूनच माझ्या प्रत्येक कादंबरीच्या जन्मामागे असलेली साक्षात्काराची ही कथाच मला कादंबरीपेक्षा जास्त महत्त्वाची वाटते.

कलकत्त्यामध्ये बंगाली वधूवरांसाठी भेंडाचे मुकुट वगैरेंचं दुकान पाहाताना पुलंना इंग्रजी पेहेरावावर टोपी व मुंडावळ्या धारण करणारे आपल्याकडचे नवरदेव आठवले आणि पुलंना हिंदूधर्माचीच दया आली. ('व्यंगचित्रे.' पृ. १७)

'सामना' मध्ये 'नामस्मरणाचा रोग' हा लेख लिहिताना पुलंनी हिंदू धर्मातील अवडंबरावर कोरडे ओढले पण अन्य धर्मातील कर्मकांडाचा समाचार घ्यायचा धीर त्यांनी दाखवला नाही.

कुणीही उठावं आणि दया करावी इतपत हिंदू धर्माची खरोखरच अवनती झालेली आहे का?

आपला अंमल सुस्थापित होण्यासाठी इंग्रजांनी हिंदू लोकांना स्वतःच्या धर्माविषयी अनादर आणि पाश्चात्य संस्कृतीविषयी जिव्हाळा वाटावा, असंच शिक्षण दिलं.

म्हणून मग आपले तथाकथित सुशिक्षित लोक धर्माचं उच्चाटन करायला सरसावले.

कोणत्याही धर्मात अनुयायांच्या अज्ञानामुळे अनिष्ट प्रथा आणि अर्थशून्य कर्मकांड यांना वाव

किंव करू धजतात, हे पाहून कुणाला खेद वाटणार नाही?

हिंदूंना आपल्या श्रेष्ठ धर्माची कदर नसल्याचा प्रत्यय क्षणोक्षणी येत असता त्याची महती गाण्याची इच्छा मला कधीपासून होत होती.

अध्यात्म आणि संगीत या दोन्ही प्रीतिविषयांवर ललित स्वरूपाचं तरीही व्यासंगपूर्ण लेखन करावं, हा विचार मनात घोळत असता मला पं. मल्लिकार्जुन मन्सूर हे त्या दोन्हींचंही प्रतीक भासले.

हा 'नादनदी' चा उगम!

ऐतिहासिक वा पौराणिक वा चरित्रात्मक कादंबरी म्हणजे संवादातून सांगितलेला इतिहास, पुराण वा चरित्र असं भारदस्त विधान करायची काही लोकांना सवय असते.

आता 'नादनदी' मधील मध्यवर्ती व्यक्तिरेखा ही वास्तवाधिष्ठित की काल्पनिक, असा प्रश्न साहजिकच पडणार.

सत्य सांगावं पण अप्रिय वाटणारं सत्य न सांगण्याची पद्धत असते. तेव्हा कादंबरीमधलं पं. मन्सूर हे पात्र काल्पनिक नसलं तरी वास्तवातलं, असंही म्हणता येणार नाही.

एकूणच अत्यंत सुलभीकरण करून एक समीकरण मांडण्यात येतं.

साहित्य वा अन्य कोणतीही कला = $\frac{१}{४}$ वास्तव + $\frac{३}{४}$ कल्पित.

सत्य आणि कल्पितातलं हे प्रमाण लेखकानुसार बदलत असतं आणि कल्पिताची जमा वाढत गेल्याप्रमाणे कलात्मकताही वाढते, असं म्हणतात.

मन्सूरांच्या कन्नड आत्मवृत्ताचा अनुवाद उपलब्ध असल्यामुळे त्यांचं चरित्र आणि 'नादनदी' यांच्यातल्या फरकाचं आकलन कुणालाही होईल.

माझ्या दृष्टीनं मन्सूर हे पात्र बरंचसं कल्पित मानलं गेलं तरी हरकत नाही. कारण कादंबरीचा नायक मन्सूर नसून अध्यात्म व संगीत ही जोडगोळी आहे.

कंठसंगीत व वाद्यसंगीत हे दोन प्रमुख प्रकार.

कंठसंगीतात शास्त्रीय -, लोक -, सिने -, सुबद्ध व सुगम संगीतासारखे प्रकार.

शास्त्रीय संगीताची गंगोत्री असं ग्वाल्हेर घराणं आणि त्यातून निपजलेली आग्रा, जयपूर, अगोली व किराणा ही घराणी आणि त्यांची तुलनात्मक वैशिष्ट्यं.

ग्वाल्हेर घराण्याचे मूळपुरुष नत्थन पीरबक्ष. त्यांचे नातू हस्सूखां, हद्दूखां आणि शिष्य बडे महंमद खां.

बाळकृष्णबुवा व वझेबुवा यांनी ही गायकी दक्षिणेत आणली. बाळकृष्णबुवांचे शिष्य पं. विष्णु दिगंबर आणि नीलकंठबुवा आलूरमण. नीलकंठबुवांनी मन्सूर आणि अंधगवई पंचाक्षरी यांना विद्या दिली. पंचाक्षरींनी बसवराज राजगुरू यांना तयार केलं.

जयपूर घराण्याच्या संगीत सम्राट अल्लादियाखांचे पुत्र मंजीखां, भूर्जीखां आणि शिष्या मोगूबाई, केसरबाई. मन्सूरनी मंजीखां - भूर्जीखांची तालीम घेतली. मोगूबाईंच्या कन्या किशोरी आमोणकर यांनी नाव काढलं. श्रुती काटकरांपर्यंत चालून आलेली ही परंपरा.

आग्रा घराण्याचे फैयाजखां आणि गुणिदास.

किराणा घराण्याचे अध्वर्यू अब्दुल करीम खांसाहेब. त्यांचे शिष्य सवाई गंधर्व भीमसेन जोशी

व गंगूबाई हानगल यांना सवाई गंधर्वांनी तयार केलं.

जयपूर -आग्रा -ग्वाल्हेर या तीन घराण्यांचं सत्त्व ज्यांनी प्राशन केलं असे भास्करबुवा बखले.

ध्रुपदगायक डागर बंधू, टप्पागायक कृष्णराव पंडित, ठुमरी गायक बडे गुलाम अली खां आणि गझल सम्राज्ञी बेगम अख्तर! लोकसंगीतात शास्त्रीय संगीताची मुळं शोधणारे आणि पलुस्कर परंपरेतले कुमार गंधर्व.

सवाई गंधर्व, मा. दीनानाथ आणि बालगंधर्व हा नाट्यसंगीतातला त्रिवेणी संगम. सिने संगीतातल्या लता व आशा. शास्त्रीय आणि सुगम संगीत गाणाऱ्या माणिक वर्मा. भीमसेन जोशींची संतवाणी. गदिमा आणि सुधीर फडके यांचं गीतरामायण.

बिस्मिल्लाखान, पं. रविशंकर, हाफिजअली खां, अमजद अली खां आणि अल्लारखां -झाकिर हुसेन हे वाद्य संगीतातले दिग्गज.

आणि संगीतसमीक्षक केशवराव भोळे, कृ. द. दीक्षित, रामकृष्ण बाक्रे, वामनराव देशपांडे देखील!

माझ्या संकल्पित कादंबरीच्या या फलकाची व्याप्ती पाहाता हे काम या जन्मी होईलसं मला वाटेना.

एकूण विसाव्या शतकातल्या या देशीच्या संगीताच्या पार्श्वभूमीवर मला मन्सूरांविषयी लिहायचं होतं.

शिवाय उत्तरायुष्यात मन्सूरना मृत्युंजयस्वामींनी आध्यात्मिक उपदेश दिला हे सांगणं सोपं आहे. धर्म म्हणजे काय, हे देखील जाणत नसलेल्या शिष्याला गुरूनं कसल्याप्रकारे उपदेश केल्यास त्या आर्त भक्ताचं समाधान होईल? हा खरा प्रश्न होता.

धर्माचा उगम, त्याच्या विकासाचे टप्पे, द्वैत - अद्वैत - विशिष्टाद्वैत ही मतं, नवविधा भक्ती, मधुरा भक्तीचा महिमा. खूपखूप खोलात जाणं अवश्यक होतं.

असंख्य कलाकारांची वासस्थळे, त्यांचे प्रसिद्ध कार्यक्रम, कोणत्या काळी ते कुठे होते याचं भान राखत मन्सूरांचा आणि त्या कलाकारांचा संबंध जोडताना दमछाक होत होती. कल्पनाशक्तीच्या पंखांमुळेच हा प्रवास संभवला.

आणि अध्यात्मावर रंजक प्रवचनं देताना प्रमुख पात्र असीम जिज्ञासू दर्शवायला हवं.

तर अशा कल्पिताचा आश्रय केल्यावरच नादनदी प्रवाहित होऊ शकणार.

'नादनदी'तला संघर्ष विशेषकरून आंतरिक स्वरूपाचा आहे. मन्सूरना अगदी लहानपणापासून दारिद्र्याशी सामना द्यावा लागतो. तरुणपणी कृष्णा रामदुर्ग या सुंदर गायिकेचा मोह आवरणं साधत नसल्यामुळे आपल्याच दुबळेपणाशी आणि याच कारणानं कुटुंबियांच्या विरोधाशी झगडावं लागतं. वैफल्यावर मात करावी लागते.

प्रेमभंग झाला की सामान्य माणसं उद्ध्वस्त होतात, व्यसनांच्या आहारी जातात. पण ज्या विवेकी लोकांचं उत्कट प्रेम असफल ठरतं ते लोक प्रेमभंगाचं दुःख विसरण्यासाठी दुसऱ्या उदात्त विषयाकडेच वळतील, हे मला वाचकांवर बिंबवायचं होत. नकळत पण प्रेम कायमचं गमावलं - याचं भान आलेल्या रवींद्रनाथ ठाकूरनी साऱ्या विश्वावर प्रेम केलं नाही का? निराश मन्सूरनी जगापासून पळ काढला नाही तर संगीतातलं गौरीशंकर गाठायची महत्त्वाकांक्षा धरली आणि ती पूर्ण केली.



अनुक्रमणिका

या बिकट वाटेवरून चालताना त्यांना कमी का कष्ट झाले असतील ? पण देवावरील श्रद्धा हेच त्यांचं फार मोठं बळ होतं. श्रद्धेच्या आधारे आकाशकुसुमाचीही प्राप्ती होऊ शकते, हेच मला ठसवायचं होतं.

मन्सूरांचा जन्म एकोणीसशे दहा सालचा. पहिल्या महायुद्धाच्या आसपासच्या त्या काळी मुलांना शर्ट - चड्डी - दोन्हींचं काम संयुक्तपणे भागवणारा एकच सदरा घालत. थाट म्हणजे डोक्यावर जरीची टोपी. लिंगायत समाजातल्या ग्रामीण संयुक्त कुटुंबाच्या राहणीची मला कुठून कल्पना असणार ? ते सारं विचारून समजून घ्यावं लागलं.

ग्वाल्हेरचा किल्ला, काशीक्षेत्र, श्रीशैल, पंढरपूर - भारताला तीन वेळा प्रदक्षिणा घातली असल्यानं सारा परिसर मनश्चक्षूसमोर उभाच होता.

मन्सूरनी आपल्या प्रेमरहस्याचा सूचक उल्लेख केला. पण एका नावाभोवती तपशील कसे गुंफायचे, हा मला पडलेला प्रश्न अनेक बुजुर्ग लोकांनी सोडवला. मन्सूरांच्या मुलींनी सविस्तर माहिती दिली. जावयानं विविध रागातल्या चिजांचं भांडार माझ्यापुढे उघडं केलं. शरणसाहित्यातली वचनं मी शोधून काढली. गंगूबाई, राजगुरू यांचं वास्तव्य तर इथेच ! इथं रहिमतखांची पुण्यतिथी साजरी होते. अल्लादियाखांच्या पुण्यतिथीनिमित्त मन्सूर इथं अनेक कलावंतांना पाचारण करत. कुंदगोळ आणि पुणे इथल्या सवाई गंधर्व महोत्सवावेळी मोठ्यामोठ्या कलावंतांनी मुलाखती दिल्या. पुस्तक लिहायची योजना बऱ्याच वर्षांपासूनची असल्यानं वेगळा प्रवास करावा लागला नाही. अशोक बाजपेयींना परमणीच्या साहित्य संमेलनाच्या वेळी ठरवून भेटले. अल्लादियाखांचे नातू अझीझुद्दीन खां ऊर्फ बाबा यांना कोल्हापूरात दोन वेळा भेटून मुलाखती घेतल्या. पुस्तकात मी वापरलेल्या चिजा शुद्ध स्वरूपात आहेत ना, याची खात्री करून घेण्यासाठी ते सज्जन गृहस्थ मुद्दाम धारवाडला आले.

अशा कित्येक मुलाखती, असंख्य आठवणी, संगीत विषयाला वाहिलेलं ग्रंथालय आणि अगणित स्फुट लेख सगळं असून एवढ्या प्रचंड विषयाची सुरुवात कशी करायची हे सुचत नव्हतं. मन्सूरांच्या जीवनातला खरा सोबती एवढंच नव्हे तर कित्येक शतकं संगीताचा विकास ज्याच्या साक्षीनं झाला अशा तंबोऱ्याच्या मुखातून निवेदन करायची कल्पना सुचली आणि मग किल्ली लागण्याची वाट पाहात बंद असलेले अनेक दरवाजे आपोआप उघडत गेले.

मन्सूरांच्या बिहारी रागातल्या आवडत्या

'ये ऽ हो नींद न आये<br>
नैनन में पिया के मुख देखे हो ।'

या चिजेचा आशय मनाशी घोळत असता एकदम या चिजेतून दुःख भोगत अधिकाधिक विकसित होत जाणाऱ्या मन्सूरांच्या व्यक्तिमत्त्वाच्या उमलत्या पाकळ्या दर्शविता येतील अशी खूणगाठ पटली. उमेदीच्या वयात कोसळलेल्या आपत्तींची भरपाई म्हणून मन्सूरांच्या उत्तरायुष्यात त्यांच्यावर मानसन्मानांचा अक्षरशः वर्षाव झाला. पण कोणत्याही परिस्थितीत अत्यंत सश्रद्ध वृत्तीच्या मन्सूरना श्रीशैलीच्या चन्नू मल्लिकार्जुनाचा कधी विसर पडला नाही.

तरुणपणी अत्यंत उत्कट प्रेमाचा आविष्कार करताना

'ये ऽ हो नींद न आये ।

उमर सारी बीत गई
तुम्हरी सोच में सजीले
अब तो आवो, तब ही होवे सुख ॥

ही चीज प्रेयसीला उद्देशून मन्सूर यांनी आळवली असेल. सोशिक पत्नीनं संयमानं संसार सांभाळला म्हणून आपण इथवर येऊन पोहोचलो, ही जाणीव झाल्यावर मन्सूरनी मध्यवयात शारीर आणि आत्मिक प्रेमाच्या संगमात स्नान करत हीच चीज पत्नीला उद्देशून म्हणत रंगवली असेल. आणि उत्तरायुष्यात 'अन्य सारी प्रेमविधानं खोटी! त्या परमेश्वराच्या मीलनाखेरीज सारं व्यर्थ!' हा साक्षात्कार घडल्यावर मन्सूरनी समर्पित भावांनं याच चिजेतून भगवंताची प्रार्थना केली असेल.

अध्यात्माची छिन्नी आणि संगीताचा हातोडा यांच्या सहकार्यातून निर्माण झालेल्या मन्सूर या स्वरशिल्पाची कहाणी सांगताना ही चीज प्रतीकात्मक रीतीनं उपयोजिल्यावर अनेक उपकथानकं असूनही कादंबरीत एकसंधपणा आला.

सफल संगीतसाधना म्हणजे आधी लोखंडाचे चणे पचवल्यानंतर ब्रह्मपदी नाचण्याचा येणारा योग! या दृष्टीनं मन्सूर लहानपणी गुरुगृही गेले त्या निमित्तानं एकूणच पूर्वीच्या गायकांनी विद्या मिळविण्यासाठी किती कष्ट काढले, याचा निर्देश केला.

उत्तम गायक कसा घडतो, या विषयी मलाच कुतूहल होतं. 'नीलकंठबुवांनी वा मंजीखांनी मला फार चांगलं शिकवलं'- असं मन्सूरनी मला सांगितलं. त्यावरून काय अर्थबोध होणार? म्हणून अनेक पुस्तकांच्या आधारे शिष्याला कोणतं ज्ञान अवगत व्हायला हवं, हे समजून घेऊन मी मन्सूर या प्रकारे तयार झाले, असे तपशीलवार वर्णन केलं.

खरं म्हणजे संपूर्ण कादंबरी ही मेहनतीचं फळ आहे. मन्सूर पुढे फारच धार्मिक झाले. त्याचा पाया नीलकंठबुवांनी घातला हे दर्शविण्यासाठी मल्लूला त्यांनी लिंगायत धर्माची दीक्षा दिली. पंचाचार, अष्टावरणं यांचा उपदेश केला असं दाखवलं. केशदराव भोळे यांच्या परिचयामुळे मन्सूरना सौंदर्यदृष्टीचा लाभ झाला. नारायणराव व्यासांचं गाणं दीर्घकाळ ऐकून गायकानं अभिरुची घडवायची, वगैरे माझ्या मनात उद्‌भवणारे प्रश्न मन्सूरांना सुचले वगैरे दर्शविल्याशिवाय नायकाच्या खोलात शिरायचा, स्वभाव वाचकांना उमजला नसता. केसरबाई केरकरांच्या गाण्याची भरमसाट स्तुती करायची. लोकांना सवय असली तरी त्यांच्या गाण्यातल्या त्रुटी जाणकारांना खटकतातच. या संदर्भात अतिरेकी स्तुतीच्या दबावामुळे समीक्षेची द्वारंच बंद होतात, हे माझं आवडतं मत ठासून मांडता आलं.

मुख्य म्हणजे मला संगीताविषयी सगळंच सांगायचं असल्यामुळे गाजलेल्या कलावंतांच्या प्रेमप्रकरणांचाही परामर्श घ्यायचा होता. तरी प्रेमातील शारीरिक भागाला माझ्या दृष्टीनं फारसं महत्त्व नाही. सृष्टी चालावी म्हणून कुत्र्या-मांजरांनाही ती उपजत प्रेरणा असतेच. पण हल्ली लेखिकादेखील 'मादी' या शब्दाचा मोकळेपणानं वापर करत असलेल्या पाहून मला नवल वाटते.

माणूस- ज्या पातळीवरील माणूस मी गृहीत धरते, तिथं त्याचं शारीर अस्तित्व केवळ या जगाशी संबंध ठेवणं अपरिहार्य असल्यामुळे लक्षात घेणं भाग पडतं. अतिश्रृंगारिक वा लैंगिक रंजन करणाऱ्या साहित्याविषयी माझ्या मनाची ही उत्स्फूर्त प्रतिक्रियाही असू शकेल.

पं. रविशंकरांविषयी सुकन्याला दहाव्या वर्षापासून ममत्व वाटू लागलं आणि त्यांच्याशी राजरोस

विवाह असंमव्य असतानाही तिनं निर्मयपणे अनुष्काला जन्म दिला. सुबुद्ध लोकांची उत्कट प्रीती म्हणजे एकमेकांच्या गुणवत्तेविषयी वाटलेला पराकोटीचा आदर, असीम आत्मीयता असते.

अशा प्रीतीच्या वर्णनाचा आस्वाद घेताना वाचकाला कलानंदाची प्राप्ती व्हावी आणि कामुक वर्णनांविषयी त्याला अप्रीती निर्माण व्हावी (अर्थात मी वाचक देखील एका विशिष्ट स्तरावरचा जमेत धरलाय), या उद्देशानं आणि तऱ्हेनं देखील - मी हस्सूखां आणि बडे महंमदखांची विधवा मुलगी सकीना, बालगंधर्व आणि जोहरबाई, कुमार गंधर्व आणि भानुमती कंस, भीमसेन जोशी व वत्सला मुधोळकर, सत्यजित रे आणि विजया दास यांच्या प्रेमकथांचा वापर केलाय.

खुद्द मन्सूर आणि कृष्णा रामदुर्ग यांच्या समाजाच्या दृष्टीनं निषिद्ध असलेल्या प्रेमाचं वर्णन करतानाही मी पराकोटीचा संयम त्यांना पाळायला लावला.

आणि अशा प्रकारची शारीरिक प्रेमाची वर्णनं नसूनही, कादंबरी धर्मविषयक संवादातूनच पुढे सरकत असूनही, ती कुणाला जड, कंटाळवाणी वाटली नाही की तिच्या लोकप्रियतेत उणं आलं नाही.

खरं म्हणजे लोकांची अभिरुची हीन नसतेच. हिंदी सिनेमाच्या प्रेक्षकांना नायक नायिकेची शारीरिक लगट पाहायला आवडते म्हणून वाचकांना त्याच दर्जाचे समजून सवंग लोकप्रियतेसाठी लैंगिक रंजनात्मक लेखन करणं म्हणजे चांगल्या वाचकांची अभिरुची बिघडवणं आहे. उत्तमोत्तम विषयावरच्या व्यासंगपूर्ण कादंबऱ्या वाचायला मिळाल्या तर वाचक सामान्य पुस्तक हाती धरणारच नाहीत. छापील शब्दांचं सामर्थ्य ओळखून साहित्यिकानं रसिकांची आवड वरच्या पातळीवर नेण्याचा प्रयत्न करावा, या भूमिकेतूनच मी कादंबरी लिहिली.

१९९० सालच्या सुरुवातीला या पुस्तकांसाठी संदर्भ शोधण्याचं काम सुरू केलं. 'तुझा अभ्यास म्हणजे पंचवार्षिक योजना! मला काय तुझं पुस्तक पाहायला मिळतयं?' असं म्हणणाऱ्या मन्सूरांच्या निधनानंतर लगेच म्हणजे ९२ सालच्या सप्टेंबर अखेरीस प्रत्यक्ष लेखन सुरू केलं. नवे नवे संदर्भ मिळत गेले आणि मनातील कल्पनांत परिवर्तन घडत गेलं म्हणून चारवेळा पुनर्लेखन करून १९९५ च्या सप्टेंबरमध्ये म्हणजे तब्बल साडे पाच वर्षे रोज सहा सात तास काम करून हे पुस्तक पूर्ण झालं. प्रत्येक वर्षी सुट्टीच्या महिन्यात दिवसभर अभ्यास, लेखन करता यायचं. एखादी दीर्घकथा लिहायला देखील अभ्यासामुळे मला चार सहा महिने लागतात. तेव्हा कादंबरीनं फार काळ घेतला असं नव्हे.

सहा महिन्यांपूर्वी संक्रांतीला डॉ. किशोरी आमोणकरांच्या हस्ते 'नादनदी' चं प्रकाशन घडलं. (त्यापूर्वी या कादंबरीचं फक्त पहिलं व शेवटचं प्रकरण वाचून ती प्रकाशनार्थ स्वीकारली गेली.) समारंभाचे अध्यक्ष डॉ. अशोक रानडे यांनी यांनी मन्सूर या कलाकाराच्या जीवनाचं चित्रण करायचं शिवधनुष्य लेखिकेनं चांगल्या प्रकारे पेललं असल्याचं प्रशस्तिपत्र दिलं. सर्वात प्रथम कादंबरी वाचून अभिनंदनपर पत्र आलं ते शिरीष पै यांचं. मग तो क्रम सुरू झाला. साप्ताहिक सकाळ, बेळगाव तरुण भारत, मुंबई तरुण भारत मध्ये 'नादनदी' च्या लेखिकेच्या व्यासंगाचं व कादंबरीचं कौतुक करणारी उत्तम परीक्षण प्रसिद्ध झाली. 'सामना' मध्ये ज्येष्ठ समीक्षक ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनी 'नादनदीची श्रेष्ठता स्वयंभू आहे. हा एक कलात्मक संदर्भग्रंथ आहे' या शब्दांत कादंबरीचा गौरव केला. साहित्याला वाहिलेल्या 'ललित' मासिकानं 'नादनदी' वर मानाचं पान प्रसिद्ध केलं आणि त्याच्या लेखिका नीलिमा भावे यांनी सातत्यानं तीन कादंबऱ्यांना मानाचे पान मिळवणाऱ्या विद्या सप्रेंचं मनःपूर्वक अभिनंदन केलं.

खूप अभ्यास केला की फळ हे मिळतंच, हा सुखद अनुभव मी बालपणापासूनच घेतेय. आणि लोकप्रियतेपेक्षा विद्वन्मान्यता मिळवण्यातच मला कृतार्थता वाटते.

मराठी रसिकांनी 'नादनदी' चं कौतुक केलं तर नवल नाही. कन्नडमध्ये तीनच दिवाळी अंक निघत असूनही माझ्या दीर्घकथेच्या अनुवादाला आवर्जून दरवर्षी स्थान देणाऱ्या कन्नड वृत्तपत्र 'संयुक्त कर्नाटक'नं 'नादनदी' वर 'संगीताचा कोश, अध्यात्माचा प्रदीप' या नावानं विस्तृत परीक्षण प्रसिद्ध केलं. 'प्रजावाणी' या कन्नड दैनिकानं 'नादनदी' हा अत्यंत प्रशंसनीय प्रयत्न असल्याचं सांगितलं. 'कस्तुरी' नावाच्या कन्नड पुस्तक डायजेस्टमध्ये 'नादनदी' चा सारांश येतोय. पुस्तक प्रसिद्ध होईपर्यंत त्याच्या अनुवादाची प्रक्रिया सुरू झाली.

केवळ सहा महिन्यातला हा प्रतिसाद पाहाता कुणाला आणखी व्यासंगपूर्ण लिहायला स्फूर्ती येणार नाही?

प्रा. मुरलीधर सायनेकर यांनी 'नादनदी' ला ग्रंथराज ही पदवी दिली. पण माहिती विपुल असल्याबद्दल नाराजी व्यक्त केली.

आता प्रत्येक घाटाच्या काही मागण्या असतात, हे मान्य!

पण कथा, कविता, लघुनिबंध यांच्या स्वरूपाविषयी नेमक्या शब्दात सांगता येतं, त्या धर्तीवर कादंबरीची व्याख्या करता येते का? इसवीसनाच्या सातव्या शतकात बाणाची कादंबरी लिहिली गेली. जपानमध्ये कादंबरी प्रथम बाराव्या शतकात व चीनमध्ये पंधराव्या शतकात अस्तित्वात आली. तरी एकूण अर्वाचीन कादंबरी युरोपातून आपल्याकडे अवतरेपर्यंत संस्कृतचा संस्कार एक वगळता तिच्यात थोडं का परिवर्तन घडलं? आधुनिक काळात महाकाव्याची उणीव कादंबरी भरून काढते, असं म्हणतात ना? मग महाकाव्याच्या आवाक्याची छाया तरी कादंबरीत पडायला नको?

इंग्रजीत Novel, Fiction, Historical Romance असं वर्गीकरण केलं जातं. क्लॅरा रीव्ह या विदुषींनं Romance आणि Novel यांच्यातला फरक फार चांगल्या रीतीनं स्पष्ट केलाय. भव्य विषय, उत्तुंग व्यक्तिमत्त्व, सखोल जीवनदर्शन आणि सर्वसमावेशकता हे बाईंनी सांगितलेले निकष आपल्या कादंबऱ्यांना लावल्यास अनर्थ घडेल. आपल्याकडे कथेची पृष्ठसंख्या वाढली की ती कादंबरी ठरते. मनोरंजन करणाऱ्या एकाच फूटपट्टीनं मोजल्या जातात. 'वॉर अँड पीस' सारखी महाकाव्यतुल्य रचना आणि पु. शि. रेगेंची लघुनिर्मिती 'सावित्री' – दोन्हींचाही समावेश कादंबरी याच वाङ्मय प्रकारात होणं योग्य आहे का? कोणत्याही सोम्या-गोम्याला कादंबरीकार म्हणवून घेण्याची आपल्याकडे छान संधी आहे.

सर्वव्यापी निसर्गाच्या पार्श्वभूमीवर, समाजाच्या सामूहिक-सांस्कृतिक संदर्भांसह माणसांच्या वैयक्तिक मनाचा व जीवनाचा वेध घेणं हे कादंबरीचं उद्दिष्ट असतं.

अतिशय गुंतागुंतीचा (complex), कालिकदृष्ट्या मोठा स्पॅन असलेला; जास्तीत जास्त व्यक्ती, प्राणी - एकूणच निसर्गाचं, विश्वाचं देखील चित्रण करण्यास पूर्ण वाव असणारा; वाटेल तो आकार धारण करण्याची क्षमता असलेला, ऐसपैस, अगदी everything under the sun चा समावेश आपल्यात करून घेण्याचं सामर्थ्य असलेला, क्षितिज हीच एक विस्तारार्थ सीमा असलेला, असंख्य आशयकेंद्रे आपल्यात सामावून घेणारा कादंबरी हा एक सर्वंकष, व्यामिश्र आणि अत्यंत लवचिक

असा फॉर्म आहे.

लघुकथेचा परिणाम एका ताऱ्याच्या रूपात मान्य केल्यास कादंबरीच्या परिणामाचं वर्णन करण्यास आपली आकाशगंगा अपुरी पडेल. म्हणूनच कादंबरीची स्वभाववैशिष्ट्यं सांगता येतात पण तिची व्याख्या करता येत नाही.

बदलत्या समाजजीवनानुसार कादंबरीच्या स्वरूपात जसं परिवर्तन घडत गेलं तशी तिची उद्दिष्टंही बदलत आली आहेत. कथा सांगून वाचकांना रंजवणं हे कादंबरीचं ध्येय नव्हे, असता कामा नये.

शाळेच्या अभ्यासक्रमात मोठे मोठे विषय आता समाविष्ट होताहेत तर या पातळीवरील तरुण पिढीला ललित साहित्य वाचताना देखील उदंड माहिती, महत्त्वाचं ज्ञान मिळवत असल्याचं समाधान लाभलं पाहिजे. म्हणूनच अमेरिकेत एखाद्या विषयावरील संशोधन समाविष्ट असणाऱ्या प्रबंधसम कादंबऱ्या अस्तित्वात आल्या. फाउंटनहेड सारख्या कादंबऱ्यांचं तिकडं स्वागत होतं; तर आपल्या तरुणांहाती देखील त्या दर्जाच्या कादंबऱ्या पडायला हव्यात, या दृष्टीनं मी कादंबरीलेखनाला प्रारंभ केला. 'प्रायश्चित्त' या माझ्या पहिल्या दीर्घकथेसह प्रत्येक कादंबरीचं जाणकार रसिकांनी मनःपूर्वक कौतुक केलं. पुष्कळशा साहित्याचं कन्नडमध्ये भाषांतर झालं.

आपल्याकडच्या अनेक पुरस्कारविजेत्या लेखिका समीक्षा न भेटल्याबद्दल वैषम्य व्यक्त करतात. ती माझ्या वाट्याला उदंड आली, हे समाधान हेच खरं लेखकाचं भाग्य!

तेव्हा समकालीन कादंबरी वाङ्मयात माझ्या 'नादनदी'चं वा अन्य कोणत्याही कादंबरीचं स्थान कोणतं, हे मी कशाला सांगायला हवं?

'नादनदी' ला लाभलेल्या प्रतिसादामुळे माझा आत्मविश्वास बळावला आणि वेगळ्या वाङ्मयसाधनेची मला प्रेरणा मिळाली, हे स्वीकारायलाच हवं!

वाचकांचं प्रेम आणि विद्वन्मान्यता या पलीकडे माझे "लई नाही मागणे!"

(**प्रा. विद्या सप्रे**, सुदर्शन, माळमड्डी, धारवाड ५८०००५)

---

प्रा. विद्या सप्रे - धारवाडच्या कर्नाटक सायन्स कॉलेजमध्ये न्यूक्लिअर फिजिक्सच्या रीडर. शालेय शिक्षण कन्नड माध्यमातून.

**प्रकाशित साहित्य :-** १) प्रायश्चित्त - अमृतसर येथील सुवर्णमंदिरात पंजाबी दहशतवाद्यांनी कोंडून ठेवलेल्या शेकडो स्त्रियांवर केलेल्या अत्याचारांची कहाणी

२) कृष्णमयी - संत मीराबाईवरील कादंबरी

३) गूढयात्री - जी. ए. कुलकर्णी यांच्यावरील कादंबरी. महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार

४) अर्घ्यदान - इंदिराजींवरील कादंबरी

५) वज्रलेख - कोणार्कच्या सूर्यमंदिराच्या पार्श्वभूमीवरील, ऋग्वेदकालापासूनच्या सूर्योपासनेचा आणि स्थापत्य शिल्पकलेचा आढावा घेणारी कादंबरी. कर्नाटक साहित्य परिषदेचा पुरस्कार.

६) छान छान गोष्टी - किशोर कथासंग्रह

७) नादनदी



अनुक्रमणिका

अनंत तिबिले

# शापित राजहंस

मला लिहिता येतं आणि तेही बऱ्यापैकी, हे मला माझ्या वयाच्या तेरा-चौदाव्या वर्षीच कळलं होतं. त्यावेळी मी नववी किंवा दहावीत असेन. कोल्हापूरला निघणाऱ्या साप्ताहिक 'शांतिदूत'च्या कथास्पर्धेत मला पारितोषिक प्राप्त झाले होते. माझं दुर्दैव असं की, त्यावेळी माझं कौतुक करणारं घरी आणि दारी कुणीच नव्हतं. घरचे लोक सारे निरक्षर-गरीब; त्यांना माझ्या या यशाचं कोडकौतुक का नि कसं वाटावं? दिवसभर पोटाच्या मागे धावणाऱ्यांना इतरत्र पहाणं जमतच नाही; नाही का? आणि एक दरिद्री कुटुंबातल्या पोराच्या यशानं समाजानं हुरळून का जावं? उलट त्याने मनोमन हेवा करीत दुर्लक्ष करावं, यात निराळं असं काय होतं?

पारितोषिक मिळवणाऱ्या लेखकांना प्रकाशक मिळतातच असं थोडंच आहे? अन्यथा आजही पारितोषिक प्राप्त झालेले काही लेखक 'कृपया मला एखादा प्रकाशक मिळवून द्या' असं म्हणत माझ्याकडे आलेच नसते.

माझ्याही बाबत नेमकं हेच घडलं. पारितोषिक प्राप्त झालं नि माझी उमेद वाढली. उत्साह दुणावला. यापुढे काही कथा लिहून मग कादंबरीकडे वळायचे असा निर्धार करून मी लिहिता झालो.

पण परिचय, वशिला आणि पाठबळ नसलेल्या माझ्यासारख्या अल्पवयीनाला प्रसिद्धी मिळविणं किती अवघड आहे हे तत्काळ उमगले. स्थानिक प्रसिद्धी माध्यमांनी माझी नेहमीच उपेक्षा केली. मी पाचपंचवीस कथा पाठविल्या, पण त्यातील एकाही कथेला प्रसिद्धी मिळाली नाही.

सहाजिकच माझा स्वाभिमान दुखावला गेला. वडिलांच्याकडून मिळालेली केवळ एकमेव देणगी ही! त्यांनी अगदी लहानपणापासून मनावर विंबवले होते, "उपाशी असलास तरी ओठावरचं हसु मावळू द्यायचं नाही. कधी कुणापुढे हात पसरावयाचा नाही. जगायचं तर ते स्वाभिमानानं जगायचं."

वडिलांचे शब्द मनावर कायमचे कोरले गेले होते. शिवाय उरात एक जिद्दही होती. इतरांनी कितीही अव्हेरले तरी वाट सोडायची नाही. चालत रहायचे. जिद्दीने - निश्चयाने. शक्य तेवढा इप्सिताप्रत पोहोचण्याचा आटोकाट प्रयत्न करायचा. ज्यांनी अव्हेरले - उपेक्षा केली त्यांना आपलं कर्तृत्व दाखवून द्यायचं. निदान एक का होईना, कादंबरी लिहायची, ती प्रसिद्ध करून दाखवायची. समीक्षकांकडून वाहवा मिळवायची.



अनुक्रमणिका

तब्बल पंचवीस वर्षे झगडलो मी. या अवधीत काही कथा, दोन दीर्घकथा प्रसिद्धही झाल्या. या कामी पुण्याच्या श्री. ग. वा. बेहरे यांनी आपल्या बुवा, पैंजण, कादंबरी या मासिकांमध्ये मला स्थान देऊन खरोखरीच उपकृत केले.

तरीही पुस्तकरूपानं बाजारात जाणं सोपं नाही हे मी अनुभवत होतो. प्रकाशक आपल्याला तशी संधी देणार नाहीत हे जाणत होतो.

याच मुदतीत म्हणजे १९७२ साली 'पंत गेले (मेले नव्हे) राव चढले' या उक्तीचा मला प्रत्यय आला. पुण्याची सदानंद प्रकाशन संस्था ही रहस्यकथा प्रकाशनास अग्रेसर होती. या संस्थेत श्री. गुरुनाथ नाईक, दिवाकर नेमाडे, सुभाष शहा लिहीत असत. श्री. गुरुनाथ नाईकांनी स्वतःची प्रकाशन संस्था काढली नि काहीशी प्रसिद्धी प्राप्त करण्यासाठी त्यांची जागा मी घेऊन रहस्यकथालेखनाला मी प्रारंभ केला. १९७२ ते १९७७ म्हणजे सुमारे सहा वर्षे मी रहस्यकथा लेखन केले. २५० रहस्यकथा लिहिल्या. शिवाय स्टार पब्लिकेशन्स (दिल्ली) यांच्यासाठी पाच हिंदी रहस्यकथा लिहिल्या.

माझा हा व्याप- खडतर परिश्रम केवळ कादंबरी लेखनासाठीच होते. माझ्या पहिल्या कादंबरीचा विषय मी १९५४-५५ सालीच ठरवून टाकला होता. त्यावेळी मी इंटरला होतो. आणि अभ्यासक्रमात बेबंदशाही हे औंधकर यांचे नाटक होते. या नाटकाचे नायक होते छत्रपती संभाजी -

हे नाटक मला तसे रुचले नव्हते.

कारण एकीकडे व्यसनी - विषयांध ठरविलेल्या नायकाचं ज्वलंत नि आदर्श असं धर्मप्रेम चित्रित केले होते. आणि त्याच वेळी माझ्या अल्पबुद्धीला वाटले होते की धर्माभिमानी माणूस व्यसन नि विषयांधता यांना कधीच जवळ करू शकणार नाही. कारण काही झालं तरी ही परस्परविरोधी दोन टोके होती.

याच दरम्यान मी धर्मवीर संभाजी या नाटकात संभाजीची भूमिका केली. तब्बल सहा महिने तालमी नि प्रत्यक्ष प्रयोग यात गेले. या कालावधीत मी संभाजी जगलो. ह्याही नाटकात संभाजी हा व्यसनी विषयांध, पण धर्मप्रेमीच दाखवला होता. का कुणास ठाऊक, हा एका अत्यंत कर्तबगार माणसावर अन्याय केला गेला आहे, असं मला त्या वेळेपासून वाटू लागले होतं नि संधी मिळाली तर हा अन्याय मी त्याची कारणं शोधून काढून दूर करण्यासाठी कादंबरीलेखन करायचे मी मनाशी ठरवले.

पण अजुनी तो योग यावचा होता.

एकोणीसशे चौऱ्याहत्तर साल असावे ते. कसे कोण जाणे, डॉ. कमल गोखले यांचे 'शिवपुत्र संभाजी' हे पुस्तक हातात पडले. डॉक्टरेटसाठी लेखिकेने साडेनऊ वर्षे संशोधन करून लिहिलेला हा प्रबंध म्हणजे जणू खजिनाच वाटला. मी त्या पुस्तकाची पारायणं केली. मग मात्र मला राहवले नाही. मी शिवाजी विद्यापीठाच्या ग्रंथपालांशी संपर्क साधला. ग्रंथपाल श्री. जाधव, इतिहास विभाग प्रमुख श्री. कांबळे, श्री. नलवडे यांच्याबरोबर सल्लामसलत केली. त्यांनीही मला संदर्भग्रंथ देऊन मोलाचं सहाय्य केले. मी आणि माझी पत्नी सौ. उर्मिला तिबिले - उभयता नोकरीत असूनही टाचणं काढायला सुरवात केली. केवळ ग्रंथ वाचून हवं ते साध्य करता येणार नाही याची खात्री पटताच मी प्रवासासाठी बाहेर पडलो. अनेक गडकोट पालथे घातले. आग्रा शहराला भेट दिली. गोवा पालथा घातला. लोककथा, दंतकथा जे काही सापडेल ते गोळा केले. माझा हा खडतर, खर्चिक खटाटोप

दोन वर्षे सुरू होता. यासाठी मला सहा महिने बिनपगारी रजा घ्यावी लागली. दहा बारा हजार रुपयांचा खर्च करावा लागला. एप्रिल १९७७ मध्ये मी प्रत्यक्ष कादंबरीलेखनास सुरवात केली. कादंबरीचे नाव मी आधीच निश्चित केले होतेः 'शापित राजहंस'. संभाजी जरी राजहंस असला तरी त्यावेळच्या बखरकारांनी (जे स्वतःला इतिहासकार म्हणवून घेत होते) आपली व्यंगं झाकण्यासाठी संभाजीला बदनाम केले होते. व्यसनी-विषयांध असा शिक्का त्याच्या चारित्र्यावर मारला होता आणि त्याचं कारणही तसंच होतं. संभाजी तापट होता. कर्तबगार होता. शूर होता. स्वतःचा निर्णय स्वतः घेण्याइतपत खंबीर होता. अन्याय, मग तो कुणाकडूनही होऊ दे, त्याला सहन होत नव्हता. आणि म्हणूनच छ. शिवरायांच्या अष्टप्रधान मंडळापैकी काहींनी स्वार्थासाठी सत्तेवर अन्याव केला आहे हे ध्यानी येताच तो त्यांच्या समक्ष त्यांना लबाड अमात्य असं संबोधू लागला होता.

सहाजिकच, महाराजांच्या पश्चात त्यांना असा राजा हवा होता की, जो दुबळा असेल. एकदा संभाजीला बदनाम केले की, शिवराय त्याला बाजूला करून राजारामाला वारस नेमतील नी आपलं फावेल हाच त्या मागचा उद्देश होता.

मी कादंबरीलेखनाला सुरवात केली त्यावेळी आपल्या कादंबरीला प्रकाशक मिळेल की नाही हा विचारही माझ्या मनाला शिवला नव्हता. मी लिहीत होतो. सौ. उर्मिला वाचत होती. दुरुस्त्या सुचवत होती.

अर्धी अधिक कादंबरी लिहून झाली असेल.

मी ती माझ्या एका मित्राला वाचायला दिली.

त्याने ती आपले प्रकाशक मित्र अनिल मेहता यांना वाचायला दिली. 'मला ताबडतोब भेटा.' असे मेहतांचे पत्र आले. मेहतांचा व माझा परिचय नव्हता. शिवाय त्यांच्याकडे माझं हे हस्तलिखित पोहोचले आहे याचीही मला कल्पना नव्हती. मला का बोलावले असावे याचाही अंदाज आला नाही.

काहीशा उत्सुकतेपोटीच मी त्यांना भेटलो.

नि त्यांनी मला एक सुखद धक्का दिला.

'शापित राजहंस' त्यांना आवडली होती. ते ती प्रसिद्ध करू इच्छित होते. मी ती कादंबरी लवकर पूर्ण करून द्यावी अशी त्यांची मागणी होती. मला विनासायास प्रकाशक मिळाला.

मी कादंबरी पूर्ण केली. आज या कादंबरीचा पसारा पावणेचारशे पानांपुरता मर्यादित दिसतो. पण प्रकाशकांनी 'एडिटिंग'चे कारण पुढे कात्री लावली नसती तर सहा साडेसहाशे पृष्ठांची मोठी कादंबरी वाचकांच्या हातात पडली असती.

मला या प्रकाशकांची गंमत वाटते.

हे लोक गगनाची लांबीरुंदी मोजू पहातात. आणि मोजणाऱ्याच्या हातात पाच फूटी टेप देतात. यांना मोती हवे असतात. पण मोती काढणाऱ्या पाणबुड्याला पाचपंचवीस फूट खोलच बुडायचं अशी अट घालतात. केवळ आपलं भांडवल अधिक गुंतू नये म्हणून. पण यामुळे गगनाची लांबीरुंदी सापडणार आहे का यांना? की मोती हस्तगत होणार आहेत?

माझं स्पष्ट मत आहे. प्रकाशकाने लेखकाला पृष्ठमर्यादेचं बंधन घालूच नये. अशा बंधनाने लेखकाचे पंखच दुबळे होतात नि त्याला साहित्यविश्वात हवी तशी भरारी मारता येत नाही.

अखेर १९७८ मे मध्ये 'शापित राजहंस' प्रसिद्ध झाली. ही माझी पहिली कादंबरी. या नंतर आजतागायत सातत्याने मी लिहीतच राहिलो. गेल्या अठराएकोणीस वर्षांत शंभरावर कादंबऱ्या निघाल्या. आजही लिहितोच आहे. यात माझ्या आवडीच्या अनेक कादंबऱ्या आहेत. पण 'शापित राजहंस' चं माझ्या आयुष्यातलं स्थान फारच वेगळं आहे.

एक तर या कादंबरीच्या प्रकाशनाने मी तब्बल पंचवीस वर्षे जी खडतर उमेदवारी केली होती, तिचे चीज झाले होते. प्रचंड रहस्यकथालेखन करून मला जी मान्यता पावली नव्हती ती 'शापित राजहंस' ने दिली. याच कादंबरीमुळे मी कादंबरीकार म्हणून ओळखला जाऊ लागलो. स्थानिक हितशत्रू साहित्यिकांनी माझ्यातील साहित्यिक मारण्याचा कुटिल कावा केला होता तो नेस्तनाबूत झाला होता. आणि याच कादंबरीमुळे माझा पुढचा साहित्यिक प्रवास सुखाचा नि समृद्धीचा ठरला होता.

माझं एक स्वप्नं होतं -

किमान एक तरी कादंबरी प्रसिद्ध व्हावी. ती एखाद्या ख्यातनाम प्रकाशकाच्या हस्ते प्रसिद्ध व्हावी आणि ती साहित्यरसिकांच्या उपस्थितीत प्रसिद्ध व्हावी .

माझी ही सारी स्वप्नं साकार झाली.

१९७८ मे मध्ये पुण्याच्या कन्याशाळेत कवी सुधाकर नेर्लेकर यांच्या पुढाकाराने 'पहाट' या नावाने एक संस्था स्थापन झाली होती. महाराष्ट्रातील समस्त नवोदितांचा मेळावा आयोजित करण्यात आला होता. दोनतीनशे नवोदित हजर होते. त्यांच्या उपस्थितीत माननीय आप्पा तथा गो. नी. दांडेकर यांच्या शुभहस्ते या कादबंरीचं थाटात प्रकाशन झालं. या कार्यक्रमाला कवी दिलीप चित्रेही हजेरी लावून होते.

रहस्यकथाकाराला कादंबरीकार बनविणारी ती साहित्यिक विश्वात स्वैर विहार करण्याची संधी देणारी 'शापित राजहंस' ही कादंबरी म्हणूनच मला अनमोल वाटते.

शापित राजहंस बाजारात आली. वाचकांनी उदंड प्रतिसाद दिला. अनेक पत्रं आली मला. शिवाय तरुण भारत, सकाळ, महाराष्ट्र टाइम्स, लोकसत्ता, पुढारी आदी वृत्तपत्राच्या समीक्षकांनी तिचं चांगल्या प्रकारे स्वागत केलं.

'शापित राजहंस'च्या निमित्ताने मी सारा शिवकाल अभ्यासिला होता. नुसता शिवकालच नव्हे तर भोसले कुल वृत्तांतापासून सारा इतिहास डोळ्याखालून घातला होता. याचा फायदा मला आणखीन एका वेगळ्या प्रकाराने झाला. मी 'आम्ही शर्थ केली' (छ. शहाजी), 'विडा रंगलाच नाही' - 'प्रीत रंगली अशी' (छ. राजाराम), भद्रकाली (महाराणी ताराबाई), सखी राज्ञी जयती (महाराणी येसुबाई), अग्निरेखा (महाराणी जिजाबाई), गरुडझेप (छ. शिवराय) व शिवकालीन गुप्तहेर यंत्रणा, अग्निरेखा, एक तारा निखळला, अधुरी एक कहाणी, खुदा का बंदा, उजाडण्याआधी आदी दहा कादंबऱ्या लिहू शकलो. यातील अग्निरेखा व गरुडझेप याच दोन कादंबऱ्या अजून प्रसिद्धीच्या मार्गावर आहेत.

मी स्वतः एका माध्यमिक शाळेतील शारीरिक शिक्षणाचा शिक्षक. साहजिकच स्पर्धा मला नव्या नाहीत. तालुका, जिल्हा, राज्य नि आंतरराज्य स्तरावर दर वर्षी या स्पर्धा भरविल्या जातात. स्पर्धा होतातही; पण तालुक्यापासून देशपातळीपर्यंत अशा खेळाडूंची निवड होते, ज्यांच्याकडे वशिला, पैका



अनुक्रमणिका

आहे. शिवाय यातील राजकारणात सक्रिय भाग घेणारे आमदार, खासदार, मंत्रीही मला ठाऊक आहेत. मला या गोष्टींचा अनुभवही आहे. जिल्हास्तरावर पहिला क्रमांकपटकावणाऱ्या माझ्या रिले संघाऐवजी आयत्या वेळी दुसऱ्याच संघाला आंतरजिल्हा स्पर्धेत उतरविल्याचं मी या डोळ्यांनी पाहिलं आहे. आणि पाहिला आहे एक वेगळा प्रकार. ज्याने हातात खडू धरला नाही, कधी फळा पाहिला नाही, विद्यार्थ्यांचं साधं मुखावलोकन केलं नाही; मात्र सत्तारुढ पक्षाच्या आमदाराच्या धोतराचा एकदाही सोगा सोडला नाही अशा एका परिचित व्यक्तीला उत्तम शिक्षकाचं (?) राष्ट्रीय पारितोषिक मिळतं, स्वतः राष्ट्रपती त्याचा सन्मान करतात, तो राष्ट्रपतीसमवेत आपला फोटो घेऊन मिरवतो. हो! मी हे सारं पाहिलंय.

नि पारितोषिकासाठी कुणाच्या मागून हिंडून स्वाभिमान गमावण्याची माझी मूळचीच प्रवृत्ती नसल्याने मी कधीच स्पर्धेत भाग घेतला नाही - घेणार नाही. त्यामुळे मला पारितोषिक प्राप्त होण्याची सुतराम शक्यता नाही.

याच विषयावर 'पुरस्कार' ही कादंबरी मी माझं मन उघड करण्यासाठी लिहिलीय. मला एकच म्हणायचंय, आपण लिहितो ते नेहमी रसिक वाचकांसाठीच. आणि रसिक वाचक आपल्या साहित्यकृतीच्या बऱ्या वाईटपणावर पत्र लिहितात.. ही पत्रे म्हणजे साहित्य सन्मानच नव्हे का? आणि जोपर्यंत हा साहित्य सन्मान प्राप्त होत राहील तोपर्यंत लिहायचं हा माझा निर्धार आहे.

'शापित राजहंस' मुळेच मी अनेक ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या आणि त्या वाचकाला भावल्याही. साहजिकच माझ्यावर ऐतिहासिक लेखन करणारा लेखक असा शिक्काही बसला. माझ्याकडे ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या मागण्याही वाढल्या. मी त्यातील काही पूर्णही केल्या. पण मला एकाच साच्यात बसायचं नव्हतं. कारण समाजात अनेक समस्या होत्या आणि त्या मला गप्प बसून द्यायला तयार नव्हत्या. उदाहरणार्थ, स्त्री-समस्या, दलित समस्या, भ्रष्टाचार, व्यसनाधीनता, जीवघेणं राजकारण, पाश्चात्य जीवनाचा हिन्दू संस्कृतीवर झालेल्या परिणामामुळे मलीन झालेलं नागरी जीवन, बेकारी.. एक ना दोन, अनेक विषय. सहजिकच या विषयावर मी विपुल लेखन केलं. स्वातंत्र्यपूर्व काळातही सर्वस्वावर पाणी सोडून स्वातंत्र्य सागरात उडी घेतलेल्या खऱ्या खुऱ्या स्वातंत्र्यसैनिकांवर सरकार नि समाज यांनी केलेले अत्याचार; हे शोधून काढून त्यांनाही मी कादंबरीरूप देऊन वाचकांसमोर ठेवलं. मूळातच जातीयवादाच्या विळख्यात सापडलेल्या या देशाची दुर्दशा कमी होती म्हणून की काय साहित्यिक म्हणविणाऱ्या बुद्धिमंतांनी साहित्यातही ग्रामीण, दलित, नागरी असे तट पाडण्याचा जो हास्यास्पद प्रयत्न केला, त्यावर व्यंगात्मक अशाही काही कादंबऱ्या लिहिल्या.

प्रत्येक कादंबरी लिहिताना मी शक्यतो 'वास्तवता'पूर्ण कथानक निवडलं. शक्यतो साधी- सोपी भाषा, वेगवान प्रसंग मांडणी केली, चटका लावणारा शेवट करून मी वाचकांनाही काही काळ स्तंभित करून सोडलं.

अर्थात 'शापित राजहंस' ने मला हे दार उघडून दिलं म्हणूनच मला हे जमलं. एवढं प्रचंड लेखन करू शकलो मी.

यापुढेही माझ्या नजरेसमोर काही व्यक्ती आहेत. उदाहरणार्थ, जयप्रकाश नारायण, गौतम बुद्ध,

बाळाजी विश्वनाथ, पुरुषोत्तम श्रीराम ... ही सर्व चरित्रं कादंबरी रूपानं वाचकांसमोर ठेवण्याची माझी इच्छा आहे. आज साठीत आहे मी. शरीर काहीसं थकलंय. हातही पहिल्यासारखा चालत नाही. रात्रीचं जागरणही झेपत नाही. वेग मंदावलाय; पण उमेद सरलेली नाही. शापित राजहंसने दिलेली उभारी मावळलेली नाही. आणि म्हणूनच मी लिहिणार आहे... उरलेल्या क्षणापर्यंत. फक्त हा अखेरचा क्षण केव्हा येणार आहे हेच ठाऊक नाही. हे सारे संकल्प पुरे होतात की नाही हीच एक शंका.

पण शंकेने ग्रासून घाबरणाऱ्यांपैकी मी नाही. कारण मी थांबलो तर तो अखेरचा क्षण मला लवकर गाठेल हे मी जाणतो.

आजवर एकांड्या शिलेदारासारखी झुंज दिली मी. नि हवं ते हस्तगतही केलं. हे सारं 'शापित राजहंस'नेच दिलं हे मी मुळीसुद्धा विसरू शकत नाही.

आणि म्हणूनच शापित राजहंसचं माझ्या जीवनात अनन्यसाधारण महत्त्व आहे हे आवर्जून मी इथं नमूद करतो आहे.

(**अनंत तिबिले**, अस्मिता, २० दीपसेवक सोसायटी, रत्नाप्पा कुंभार नगर, कोल्हापूर)

---

**अनंत दत्तात्रय तिबिले**. जन्म - २४-११-१९३६ कोल्हापूर. प्राथमिक शिक्षण म्हणून अनेक वर्षे काम. नंतर माध्यमिक शाळेत शारीरिक शिक्षक. तीन वर्षांपूर्वी निवृत्त.

१९५२ ते १९७२ या काळात कथालेखन. पुढे ५ वर्षात २५० रहस्यकथा लिहिल्या. त्या पत्नीच्या नावे प्रसिद्ध. गुप्तदूत या टोपण नावाने हिंदीतही पाच रहस्यकथा स्टार पब्लिकेशनने काढल्या. बालवाङ्मय लेखनही विपुल. १९७८ मध्ये शापित राजहंस ही पहिली कादंबरी प्रसिद्ध. त्यानंतरच्या काळात शंभरावर कादंबऱ्या लिहिल्या.

**काही कादंबऱ्यांची नावे :-**

शापित राजहंस, आम्हीही शर्थ केली, विडा रंगलाच नाही, प्रीत रंगली अशी, भद्रकाली, पद्मिनी, अधुरी एक कहाणी, स्वप्न भंगले, यंत्रणा, पितामह, आचार्य, गौतमी, सखी राज्ञी जयती, बंधमुक्त, अग्निशय्या, अग्निकुंड, अग्निपथ, अग्निदिव्य, अग्निपरीक्षा, एक तारा निखळला, गौरा गोवेकरीण, ओलेती, प्रारब्ध, पारध, लाटेमागुनी लाट धावते, पहिली रात्र, वैर, वैजयंता, आग, वणवा, हिसका, रूपगर्विता, संकेत मीलनाचा, शापित पुण्य, अभिषेक, बदला, बळी, बाधा, सुकली बकुळ फुले, संघर्ष, प्रतिशोध, अखेर जमलं पण, तुझ्याचसाठी, कैफियत वारांगनेची, बुकी, भुजंग, हाय हॅंडसम, पेईंग गेस्ट, अभिनेता, अभिनेत्री, वास्तु, कांवळ, सतीचं वाण, आम्ही दोघी, शह, मात, असाही सूड, उद्रेक, पत्रकार, ज्वालामुखी, बंदिनी, खुदाका बंदा, कळी फुललीच नाही, सौदा, एकसष्ठी, कार्पोरेटर, विनाकारण, पुरस्कार, इन्स्पेक्शन, नरव्याघ्र, उजाडण्याआधी, अवलिया, हिंमत, झुंज, दोन डोळे दहा हात, अपराजिता, तृप्ती, निवांत, वेवंद, लाल हवेली, परमिट रूम, कुऱ्हाडकडा, तुफान, आहुती, परिवर्तन, वढाळवाडी, गावगुंड, समिधा, स्त्रीयश्चरित्रम्, इये मराठीचिये नगरे, हाऊज दॅट, हरपलेले मोती, सावज, वारस, मानिनी, निर्माल्य, द्वंद्व, अर्घ्य, अग्निरेखा, विद्रोह.

---

## नवे आजीव सभासद

### सोलापूर

लक्ष्मणराव कोंडीबा ढोवळे
दीपक पुरुषोत्तम कसवे
प्रभाकर यशवंत नाडगौडा
अनुराधा लक्ष्मण ढोवळे
सदाशिव भगवान वनसोडे
मारुती दत्तात्रय वनसोडे
सुधीर शामराव देव
वृंदा रघुनाथ लिमये (मुंबई)
प्रवीण परशुराम पाटकर (मुंबई)

## रेखा बैजल

# युगावर्त

एखादी घटना ... व्यक्ती ... कालखंड मनाला भावतो... त्यांचा रंगपट मोठा असतो. कादंबरी हा प्रकार असा आहे की जो लिहिल्याखेरीज आता उपाय नाही एवढं मनात खदखदत असतं अशाच वेळी लिहिला जातो. ( किती तरी कथा कथाबीजं फारशी स्वतःलाच आवडलेली नसतात तरीही लिहिल्या जातात. असं कादंबरीचं घडत नाही.) त्यामुळे ज्या कादंबऱ्या हातून लिहिल्या गेल्या त्या सर्व आवडणाऱ्याच आहेत. विशेषतः 'अग्निपुष्प' व 'युगावर्त'.

अग्निपुष्प आधी लिहिलेली. दोन पुरस्कार मिळवलेली. राजदत्त, विद्याधर गोखले यांच्यासारख्या ऋषितुल्य व्यक्तींकडून नावाजली गेलेली. कुणा विनय केळुसकरांना स्वतःच्या नावावर तिचं नाट्यरूपांतर करण्याचा मोह घालणारी. 'तिसऱ्या महायुद्धानंतर' असा विषय आहे असं सांगितल्यावर नाक मुरडून इंग्रजी कादंबरीवरून उचलली असेल अशीही वक्तव्यं ऐकायला लावणारी.... ह्या कादंबरीचं कोडकौतुक, टीकाटिप्पणी सारं काही झालं.

पण माझी 'युगावर्त'! सध्यातरी उपनिषदातल्या एखाद्या योग्यासारखी प्रसिद्धीविन्मुख होऊन शांतशी तपश्चरण करत असल्यासारखी सारस्वतात बसली आहे. म्हणून आज ह्या 'युगावर्त'बद्दल लिहायचं ठरवलं.

मला मुळातच तत्त्वज्ञानाची ओढ आहे. गीता, ज्ञानेश्वरी, विवेकानंद वाचले. त्यातही स्वतःचा जीवनाबद्दलचा एक विचार. त्यामुळे माझ्या कथाकादंबऱ्यांमध्ये तत्त्वज्ञान न आलं तरच नवल. मी स्वतः माझ्या विचारात एक शोध घेत असते तोच माझ्या लिखाणातही नकळत येत राहतो. आणि अशात पुण्याच्या साहित्यसंमेलनात श्री. शंकर सारडा यांची भेट झाली. बोलण्याच्या ओघात सारडा बोलून गेले "तुम्ही एवढं तत्त्वज्ञान 'अग्निपुष्प'मध्ये मांडलं आहे.... तर वेदउपनिषद काळावर एखादी कादंबरी का लिहित नाही?"

आणि त्यांच्या त्या शब्दासरशी डोक्यात आवर्त सुरू झालं. वेद उपनिषद काळावर कादंबरी... पण नक्की कोणता कालखंड निवडायचा? ऋग्वेदाच्या जन्माचा कालखंडच मुळी एक हजार वर्षांचा आणि वेदांनंतर वेदान्त... म्हणजेच उपनिषदं.. गीता वाचली असल्यामुळे उपनिषदांची तोंडओळख होती. उत्सुकतेपोटी ऋग्वेद वाचायला घेतला... आश्चर्यचकित होत गेले. खूप काही लक्षात येत गेलं.



अनुक्रमणिका

उपनिषद आणि वेद ह्यांच्यात फार मोठा फरक आहे. वेद ऐहिकाच्या सुखसमृद्धीसाठी जन्म घेतात; तर उपनिषदं आत्मिक उन्नतीसाठी. कित्येक उपनिषदांत (व गीतेतही) वैदिक कर्मकांडांवर (यज्ञ) टीका केली आहे.

उपनिषदंही अभ्यासपूर्ण वाचली.

गीतेच्या सौंदर्यवान लेण्यातून उपनिषद व वेदांच्या गहन अरण्यात बुद्धी शिरली. बाहेरून अंधारून आलेला.... पाच हजार वर्षांच्या भूतकाळात गडप झालेला हा कालखंड अंतर्यामी प्रकाशमान आहे. उपनिषदरूपी झगमगते कल्पतरू ह्या कालखंडात आपली वाट दाखवायला उभे आहे. प्रत्येक माणसाला समाधान हवे असेल तर ह्या 'आरण्यकां'मध्ये फेरफटका मारून यावा लागतो. एखाद्या बुंध्याशी श्रांतपणे टेकावं लागतं. आणि वेद... ह्या वेदांमधून एक वाट सरळपणे आपल्याला तत्कालीन जनजीवनापर्यंत नेते. विजिगीषु वृत्तींचे आर्य.... त्यांच्या समृद्धीसाठी पंचमहाभूतं व इतर इंद्रादि देवतांना उद्देशून केलेल्या प्रार्थना, त्या काळातलं स्त्रीजीवन... तत्कालीन नीती, तत्कालिन पुरुष, त्यांची व्यसनं ...(द्यूत) अतिसोमरस सेवनाने विकल झालेला इंद्र... हे सगळे वेदांमधे सापडतात. आरण्यकातील श्वेतकेतू तत्त्वज्ञ आहे. वेदातील श्वेतकेतू अशा मातेचा मुलगा आहे ज्याची माता एका तरुण ब्राह्मणाच्या हाती हात देऊन घराबाहेर पडते आहे. ती स्वेच्छेने जात असल्याने तिचा पती .. उद्दालक... तिला अडवू शकत नाही. आणि ते पाहून स्त्रीच्या अमर्याद स्वातंत्र्यावर श्वेतकेतू निर्बंध घालतो. वेदांमध्ये तत्कालीन जनजीवनावर, नीतीवर प्रकाश पडतो तो असा. वेद जेवढे मनाला भावणारे तेवढीच उपनिषदं बुद्धीला पटणारी.

मग विषय निश्चित केला. कादंबरी लिहायची ती वेद आणि उपनिषदांच्या संधिकालावर. वेदाची भूमिका हळू हळू उपनिषदात बदलत जाते. ह्या बदलत्या समाजरचनेचा व सामाजिक कारणांचा वेध घ्यायचा प्रयत्न करायचा. मग त्यादृष्टीने अभ्यास करायला सुरवात केली. जालन्याला साधनसामुग्री कोठून मिळणार? मग पुण्याच्या भांडारकर इन्स्टिट्यूटमध्ये जाऊन बसायचे. अनेक मतं मतांतरं वाचली. कुणाचं मत आर्य बाहेरून आले. कुणाचं आर्य सप्त सिंधूच्या प्रदेशातलेच; पण माझ्या काळाला ते आगमन अपेक्षित नव्हतं. माझ्या काळातले आर्य स्थिर झालेले होते. एकीकडे अश्वमेध करून भूमी संपादन करण्याबरोबर ते आता न इति असं म्हणू लागले होते... यज्ञाच्या वाढलेल्या कर्मकांडांना लोक कंटाळले होते. आणि त्यातून कठोपनिषदासारखं महत्त्वाचं उपनिषद निर्माण झालं होतं. मी युगावर्तमध्ये तीन उपनिषदांचा अंतर्भाव केला आहे. यज्ञस्थंडीलापलिकडे परमेश्वरावा प्रत्येक चराचरामध्ये चालू असलेला अपान यज्ञ .... सूर्याचं जीविताच्या ठायी ठायी रुजलेलं असणं आणि ह्या दर्शनानं रचलं गेलेलं ईशावास्य उपनिषद.

ईशावास्याला उपनिषद म्हणायचं; पण ते एक काव्य आहे. एक सौरऊर्जेचा (सोलर एनर्जीचा) घेतलेला शास्त्रीय मागोवा आहे.

यज्ञाच्या आहुतीपेक्षाही ॐकार साधनेला महत्त्व देणारं छांदोग्य उपनिषद. माणसाला सतत भेडसावणारी मृत्यूची भीती .: व मृत्यूनंतर काय ह्याचा आपल्या बुद्धीच्या सहाय्याने नचिकेताने घेतलेला शोध म्हणजे कठोपनिषद. सर्व भारतीय तत्त्वज्ञानाचं मानस म्हणजे ही उपनिषदं. ह्या सर्व उपनिषदांचं एकत्रीकरण म्हणजे गीता.

आव्हान मोठं होतं. माझे हात छोटे होते. समोर प्रकाशाचा मेरू होता. मला त्यातून ओंजळभर प्रकाश घ्यायचा होता. . त्या प्रकाशानं प्रकाशाची आरती करायची होती. ह्यात माझं काय आणि कितीसं होतं? होते फक्त माझे ओंजळ केलेले सावळे दुर्बल हात.... जमेल तेवढं लिहिलं. जमेल तसं लिहिलं.... कदाचित कुणाला भावलं, कुणाला भावलं नाहीही. पण मला समाधान मिळालं.

माझ्या मनात लिहायची तळमळ होती. ती तळमळ ह्या ग्रंथांनीच जाणली असावी. प्रथम फारसं काही न वाचता शौनक ही व्यक्तिरेखा वर्णव्यवस्थेचं तेव्हाचं शिथिल स्वरूप दाखवण्यास आधी राजा व नंतर ऋषी अशा तऱ्हेनं निर्माण केली. शौनक हे नाव केवळ आवडलं म्हणून.

पण भांडारकर संग्रहालयात व्यक्तिकोश वाचायला घेतला. त्यात शुनकराजाचा पुत्र शौनक हा खरोखरच आधी राजा व नंतर तत्त्वज्ञ होतो असं लिहिलेलं वाचलं. ह्या ग्रंथांनी ही इंट्युएशन मला दिली?.. की केवळ योगायोग? ही घटना आशीर्वाद समजून मी लिहायला सुरवात केली.

उपनिषदांवर विलक्षण श्रद्धा व तत्कालीन शोध घ्यायचा.. ह्या परस्पर विरोधी भूमिकांतून लिखाण केलं. मला उपनिषदं मानसिकतेला खूप प्रबळ करणारी जाणवतात. कमकुवत मनाला शक्ती देणारी.

कादंबरी लिहिली पण मनात धाकधुक होत होती. ललित वाङमय रंजक असायला हवं. ही कादंबरी तर तत्त्वज्ञानाची चर्चा करणारी. उपनिषदातले, वेदातले उतारेच्या उतारे ह्या कादंबरीत आहेत. ही कादंबरी कुणी हातांत घेईल? ही कादंबरी वाचक वाचेल?

मी ही शंका श्री. सारडा यांना व नंतर प्रा. शिवाजीराव भोसलेसरांना विचारली. दोघांनीही एकच उत्तर दिले..."ह्या कादंबरीचा वाचकवर्ग कमी असेल कदाचित; पण तो चोखंदळ व वेगळा असेल."

मी ही वस्तुस्थिती स्वीकारली.

मी फार मोठं संशोधन केलं असं नाही. फक्त तत्कालीन स्थितीचा व तत्त्वज्ञानाचा प्रवाह वाचकांना दाखवायचा प्रयत्न केलाय. टी.व्ही, सिनेमा ह्या संस्कृतीत सध्या लोक 'प्रेक्षक' आहेत... 'वाचक' नाहीत. पण यदाकदाचित एखाद्या चांगल्या वाचकाच्या हाती... मुलाच्या हाती ही कादंबरी पडली तर एका कालखंडाची थोडीफार ओळख ह्या कादंबरीद्वारे मिळू शकेल.

कादंबरीवर परीक्षणं लिहून आली, चांगली... एखादं वाईट.. ह्या सगळ्याला मनाची तयारी केली होती. चांगलं काही असलं तर ते आपल्या तत्त्वज्ञानामुळे मिळालेलं.. काही वाईट असेल तर ती माझी अक्षमता.

ही कादंबरी लिहिली. इतर लिखाणाप्रमाणे ह्या लिखाणाबाबत वाचकांची पत्रं फारशी आली नाहीत. पण तरीही एक फार मोठं समाधान मनाला मिळालेलं आहे.

ह्या कादंबरीमुळे मी वेद वाचले. उपनिषदांचा अभ्यास केला. एक संपूर्ण कालपट माझ्या डोळ्यांपुढे उभा राहिला आणि मी तो जाणून घेतला. भारतीय तत्त्वज्ञान केवढं सखोल आहे, सर्वंकष, सर्वव्यापी आहे हे जाणून घेतलं.

नीतीच्या कल्पना केवढ्या तकलादू आणि बदलत्या असतात हे लक्षात आलं. नीती ही काळ आणि परिस्थितीच्या गरजेप्रमाणे बदलते. आपल्या पतीच्या समोर परपुरुषाबरोबर त्याला संतती देण्यासाठी जाणारी स्त्री वेदकाळात आहे. आपल्या पतीच्या शवापुढे विलाप करणाऱ्या स्त्रीला "स्त्रिये, तो आता

गेला आहे. तू परत ये... आणि इथे तुझा दीर आहे. त्याला तू तेजस्वी संतती दे." असं म्हणणारी ऋचा आहे.

वेदातल्या दहाव्या मंडलातले नासदीय सूक्त. हे विश्व निर्माण होण्याआधी काय होतं... ह्याचा शास्त्रीय विचार करणारे एक सूक्त आहे.

सूर्यामुळे आपली उत्पत्ती झाली आहे हे जाणणारे मंत्र ईशावास्यामधे आहेत.

हे सगळंच वाचण्यासारखं आहे; पण संस्कृत भाषा, जड तत्त्वज्ञान ह्या गोष्टींना आपण घाबरतो. व त्या पुस्तकांच्या वाटेला जात नाही. पण हे वाङ्मय देखील आवेगी आहे.. आणि तरीही मनाला शांतता देणारं आहे. केवळ हे आमच्या देशाचे ग्रंथ आहेत असं अभिमानानं सांगून उपयोगी नाही. हे तत्त्वज्ञान आम्ही वाचायला हवं. तर एक सार्थ अभिमान आम्ही त्याच्याविषयी बाळगू शकू.

माझा असा दावा नाही की ह्यात ऐतिहासिक कालक्रम मी तंतोतंत पाळला आहे. एकत्र ह्या कालखंडाबाबत मतंमतांतरं आहेत. हे मतभेद माझ्या पथ्यावर पडले व ललित लेखकाचे स्वातंत्र्य मी गृहीत धरले. आशयाला मात्र धक्का लावायचा नाही हे पथ्य मी काटेकोरपणे पाळले. तसेच शौनक व तत्सम अनेक नावं वेगवेगळ्या कालखंडात दिसतात. कारण नंतर त्या कुटुंबाची ओळखच त्या श्रेष्ठ व्यक्तीच्या नावाने होत होती; आडनावाप्रमाणे. तसंच उपनिषदाच्या समकालीन पुराणातही शौनक येतो. (इतकंच काय पण आपल्या सत्यनारायणाच्या कथेतही शौनक येतो.)

उपनिषद व पुराणात अभिप्रेत असलेला शौनक एकच असला तरी उपनिषदानं शौनकाला विशिष्ट व्यक्तिमत्त्व दिलं आहे व पुराणांनी त्यापेक्षा वेगळं दिलं आहे. उपनिषदातलं शौनकाचंच नाही ...तर इतर सर्वच व्यक्तींचं व्यक्तिमत्त्व वास्तव आहे. ते पुराणांप्रमाणे अतिशयोक्त व चमत्कृतिपूर्ण नाही.

नागपूरच्या तरुण भारतमध्ये श्री. वामन तेलंगांनी परीक्षण लिहिलं. त्यात त्यांनी लिहिलं आहे की ' बैजलांना अपेक्षित असलेला कर्मकांड (यज्ञ) विरोधी संघर्ष ह्यात तीव्रपणे जाणवत नाही.'

खरं तर हा संघर्ष कितपत तीव्र ठेवायचा ह्याचा मी विचार केला होता. ही विचार मी तत्कालीन स्थिर प्रवृत्ती, समाजाचा विरोध व एकंदर भारतीय मानसिकता ह्याचा विचार करत केला होता. भारतात अनेक विचार जन्मले. अनेक धर्म निर्माण झालेत. त्यातला महावीरांचा जैन धर्म तर उघड उघड वैदिक विरोधी आहे. पण ह्या विचारांना, त्यांच्या प्रसाराला कधी कुणी विरोध केला नाही. किंवा हाती तलवार घेऊन व एका हाती धर्मग्रंथ घेऊन भारतीयांनी धर्मप्रसारही केला नाही. मतमतांतरं प्रत्येक काळात असतात. पण आमच्या पूर्वजांनी ह्या मतांतरांना स्वीकारलं. त्यांचा विरोधही सौम्य असायचा. कर्मकांडांच्या आग्रही वृत्तीनं नाही तर सौम्य विरोधानंच होणार होता. शिवाय हा असा तीव्र संघर्ष कुठेच ... वेद उपनिषद.. पुराणं. गीत.. दृष्टीसही पडला नाही.

परकीय धर्माची आक्रमकता आमच्या धर्मात नाही. ... दुसरं म्हणजे.. कर्मकांडालाच पर्याय काय ह्याचा शोध युगावर्तमधले शौनक, श्वेतकेतू सत्यकाम करताहेत. अजून पूर्ण पर्याय सापडला नाहीये. अशावेळी संघर्ष तीव्र असू शकतो का ह्याचं उत्तर नकारार्थीच येतं. म्हणूनच ईशावास्यात ऋषी 'यज्ञ ही नौका पैलतीरावर नेण्यास पुरेशी समर्थ नाही' एवढेच म्हणून आपला पुढचा विचार मांडतो. इतकंच काय पण उपनिषदानंतर गीता लिहिली गेली. महाभारत काळात यज्ञाला केवळ राजकीय स्वरूप उरले होते. अशा काळातही कृष्णाने एका अध्यायात यज्ञविरोधी लिहिले आहे व नंतरच्या अध्यायात यज्ञाचे समर्थनही केले आहे. अर्थात दोन्ही ठिकाणी त्या यज्ञ शब्दामागचा अर्थ

वेगळा अभिप्रेत आहे.

आणि संपूर्ण जनमानसच यज्ञाला पर्याय शोधायला त्याकाळी उत्सुक असलं पाहिजे. म्हणजेच विरोध समाजाकडून होणार नव्हता तर कर्मठ याज्ञिकांकडून होणार होता. हा सगळा विचार करूनच एक सौम्य व समाजाच्या सर्व स्तरात झिरपत जाणारा वैचारिक संघर्ष मी संयपणे त्यात रंगवला आहे.

हे सर्व वाचन व कादंबरीलेखन... कादंबरी पुनर्लेखन ह्या सगळ्याचा कालावधी ३ वर्षांचा आहे. दोन वर्षे मी वाचनातच कारणी लावली व नंतर लेखन केले. पण ह्या दोन वर्षांनी माझं अंतर्मन झगमगून टाकलं. लौकिकार्थानं कादंबरीला पुरस्कार वगैरे मिळाला नसला तरी तिनं दिलेलं समाधान खूप मोठं आहे. आमचा विश्वात्मक देव व धर्म खरोखरच कसा देशकालव्यक्तिनिरपेक्ष आहे... कर्मकांड, चमत्कार ह्यापासून अलिप्त आहे हे जाणण्यासाठी प्रत्येक भारतीयानं आपले हे राष्ट्रीय ग्रंथ वाचलेच पाहिजेत.

लातूरच्या प्रा. चंद्रकांत देऊळगावकरांनी 'युगावर्त' वाचले. मला त्यांनी फारशी प्रतिक्रिया सांगितली नाही पण एके दिवशी त्यांनी मला युगावर्तचं हिंदीमध्ये व कन्नडमध्ये भाषांतर करण्यासाठी मी प्रयत्नशील आहे असं सांगितलं. त्यांची ही कृतिशील प्रतिक्रिया मला महत्त्वाची वाटते. ते भाषांतर होवो न होवो, देऊळगावकर सरांसारख्या रसिक समीक्षकाला युगावर्तचं भाषांतर व्हावं हे वाटणच महत्त्वाचं. ह्याहून पुरस्कार काय वेगळा?

ही कादंबरी लिहायला मला श्री. शंकर सारडा यांनी प्रवृत्त केलं. इतकंच नव्हे तर प्रथम लिखाणात काही दुरुस्त्या सुचवल्या. हे त्यांचं ऋण फार मोठं.

आणि आजच्या काळातही एकं ऋषितुल्य, शांत माणूस आपल्याला भेटू शकतो ह्याचं समाधान प्रा. शिवाजीराव भोसले यांच्या भेटीमुळे मिळाले.

म्हणून ह्या दोन्ही व्यक्तींना मी ही कादंबरी सादर अर्पण केली आहे.

कादंबरी लिहिली की काम झालं असंही नाही. प्रकाशकांनी ती स्वीकारणं .. मोठी कादंबरी प्रकाशित करणं हे देखील महत्त्वाचं. श्री. बाबा भांड ह्यांनी मला नेहमीच मला ह्या बावतीत सहकार्य केलेलं आहे. त्यांचे आभार मानणंही आवश्यकच ठरतं.

तर ही आहे 'युगावर्ता'ची वाटचाल. ही वाटचाल उपनिषदातल्या सर्वादीय शांती मंत्रामुळेच मी करू शकले ह्याची मला खात्री आहे.

हे आमचे प्रकाशाचे कल्पतरू जगातल्या सर्व व्यक्तींच्या मानसात तेजाळावे व सर्व पृथ्वीने शांतीमंत्र म्हणावा...

एवढीच इच्छा. आणखी काय?

(**सौ. रेखा बैजल**, शास्त्री रोड, जालना)

**रेखा बैजल** - जन्म ६-७-१९५२ एम.ए. (मराठी) घरसंसार व लेखन
**पुस्तके** - मानस (कथा), आकाश ओढ (नाटक), देवव्रत (कादंबरी), स्वप्नस्थ (कथा), अग्निपुष्प (कादंबरी १९८७), विज्ञानकथा (१९९१), तपस्या (कथा १९९२).
**पुरस्कार** - दि. बा. मोकाशी पुरस्कार (स्वप्नस्थ), नरहर कुरुंदकर पुरस्कार (अग्निपुष्प).



अनुक्रमणिका

अरुण हेबळेकर

# आदित्य

१९५८ ते १९६० दरम्यान मी त्यावेळी विल्सन कॉलेजमध्ये शिकत होतो. कॉलेजच्या स्टुडंट कॉमनरूममध्ये 'लाइफ' पाक्षिकात छायाचित्रांसह प्रकाशित झालेला एक लेख वाचला. रॉबर्ट ओपेनहायमर आणि एडवर्ड टेलर ह्या दोन प्रख्यात अणुगर्भशास्त्रज्ञांच्या पुनर्भेटीवर तो लेख होता. कधीकाळचे हे जिवलग मित्र. रॉबर्ट ओपेनहायमर साम्यवादी असल्याच्या एका गंभीर आरोपामुळे दुरावले गेले. एडवर्ड टेलर हे त्या आरोपामुळे चालवल्या गेलेल्या खटल्यात महत्त्वाचे साक्षीदार ठरले. रॉबर्ट ओपेनहायमरना त्यानंतर बऱ्याच हालअपेष्टांतून जावं लागलं. परंतु काही कालानंतर त्यांचा अमेरिकन सरकारतर्फे गौरव करण्यात आला. त्याप्रसंगी दोघांही जुन्या मित्रांची काही छोट्याशा हृदयस्पर्शी क्षणांमध्ये भेट झालेली त्यात वर्णिली गेली होती. ही वृत्तांत वर्षानुवर्षे माझ्या मनात घर करून राहिला.

कॉलेजात शिकत असताना दिवास्वप्नं पाहायची सवय भिनलेली. त्या दिवास्वप्नांमध्ये एक प्रामुख्याने पुढे सरकायचं. ते म्हणजे, आपण कोणीतरी एक विख्यात भौतिकशास्त्रज्ञ आणि कादंबरीकार झाल्याचं! ते स्वप्न थोड्याअंशी खरं झालं. भौतिकशास्त्रात पीएच. डी. मिळवली. काही कादंबऱ्याही प्रकाशित झाल्या. दिवास्वप्नं दिसलेल्या कादंबऱ्यांमध्ये रॉबर्ट ओपेनहायमर आणि एडवर्ड टेलर यांच्या मधल्या त्या प्रसंगांवरची एक कादंबरीही होती. बीज रोवलं गेलं होतं. त्याचं रोपटं व्हायला तब्बल अठ्ठावीस वर्षे लागली.

त्यावेळी कादंबरीचं नाव सुचलेलं होतं की नाही ते नेमकं आठवत नाही. सुचलेलं असल्यासही ते 'आदित्य' नव्हतं हे नक्की! कारण हे नाव सुचलं ते १९८६ साली, जेव्हा कादंबरीच्या कथानकाच्या रचनेला मनात प्रारंभ झालेला होता. सांगाडा तयार करायला वर्ष दोन वर्षं गेली. अर्थात हा सांगाडा काही एकसंध विचारातून घडला नाही. ऑन - ऑफ विचारांमधून घडत गेला. व्यक्तिरेखाही हळू हळू सावकाश बनत गेल्या.

१९७२ ते १९७९ ह्या कालावधीत भौतिकशास्त्राच्या संशोधनाची केंद्रे ठरलेल्या टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च आणि भाभा अणुऊर्जा केंद्र ह्या दोन प्रमुख संस्थांमध्ये काम करण्याची संधी मिळाली. टी. आय. एफ. आर. मध्ये एक वर्ष राह्यलो होतो. बी. ए. आर. सी. मध्ये महिनाभर.







त्या अवधीत अहमदाबादच्या फिजिकल रिसर्च लॅबोरेटरीबद्दलही (पी आर एल) ऐकलं होतं. हा अनुभव आणि माहिती खूप उपयोगी पडली. १९८० च्या दरम्यान डॉक्टरेट मिळाली. त्या योगे पी. आर. एल. च्या एका ख्यातनाम संशोधकांशी निकटवर्ती संबंध आला. त्यांच्या १९८५ च्या गोवा भेटीत 'आदित्य' हे नाव पहिल्याप्रथम ऐकलं. 'आदित्य' नावाचा टोकोसाक पी. आर. एल. मध्ये बांधण्याचं ठरत आहे हे कळलं. माझ्या 'आदित्य' कादंबरीचा तेव्हा खऱ्या अर्थाने जन्म झाला.

ह्याच काळात, १९७३-७४ च्या दरम्यान, माझे एक मित्र गोव्याला येऊन गेले. त्यांच्या जीवनातील एक हृदयस्पर्शी प्रसंग ऐकला. जीव हेलावून गेला. 'आदित्य' मधील भरत बसरूर व्यक्तिरेखांचा जन्म झाला. भरत बसरूरला रॉबर्ट ओपेनहायमरच्या जागी बसवलं. अर्थात पूर्णपणे नव्हे. त्या दोघांच्या स्वभावधर्मात खूप अंतर आहे. परंतु ही व्यक्तिरेखा दोन ते चार शास्त्रज्ञांच्या व्यक्तिरेखांवर आधारीत आहे. एक वर उल्लेखिलेले माझे मित्र (नाव सांगणं उचित वाटत नाही), दुसरे रॉबर्ट ओपेनहायमर. तिसरे मला टी.आय. एफ. आर मध्ये भेटलेले एक विद्यार्थी. (महाराष्ट्रीय. ह्यांचंही नाव लपवणं भाग आहे). एक चौथी व्यक्तिरेखा आहे. ती गोव्यातील आहे; परंतु अधिक वयस्क. तिला मी तरुण केलीय. आणि भरत बसरूरमध्ये बसवली.

त्याशिवाय स्टॅन डेमियन ही व्यक्तिरेखा एडवर्ड टेलरच्या संदर्भात आणलेली असली तरी टी. आय. एफ. आरमधील एका वरिष्ठ प्राध्यापकांच्या व्यक्तिरेखेवर ती तयार केलीय. एकंदरीत पहाता, 'आदित्य' मधील बऱ्याच व्यक्तिरेखा वास्तवाधिष्ठित आहेत हे मान्य करायला हवंय.

कादंबरीत संघर्ष हवा होता. नुसत्या एका संशोधकाने दुसऱ्या संशोधकाविरुद्ध एक साक्ष दिली आणि त्यामुळे त्या दुसऱ्या संशोधकाला शिक्षा झाली. ह्या छोट्याशा गोष्टीभोवती कादंबरी गुंफणं केवळ अशक्य होतं. संघर्ष निर्माण व्हायलाच हवा होता. त्यावेळी सहज जाणवलं की विज्ञानाच्या विश्वव्यापक स्वरूपावर देशी मर्यादांचं बंधन पडलं तर एक संघर्ष उत्पन्न होऊ शकतो. उदाहरणच द्यायचं झालं तर ओपेनहायमर - टेलर संघर्षाला एक काल्पनिक स्वरूप देऊन पाहू या.

ओपेनहायमरनं अमेरिकेच्या हायड्रोजन बॉंब प्रकल्पांवर काम केलं. त्यात एडवर्ड टेलरही होता. बॉम्ब यशस्वी झाल्यावर ओपेनहायमरनं जर ते गुपित रशियाला 'विकलं' तर त्याला देशद्रोह म्हणायचं की विज्ञानाचा प्रसार म्हणायचं? ह्या समस्येला थोडं वेगळं स्वरूप देऊ या. समजा बॉंबच्या ऐवजी फ्यूसन रिॲक्टर असला तर?

खरं पाहता, विज्ञानातील संशोधन हे फार काळ गुपित राहत नाही. त्याचा प्रसार वा प्रचार लगेच होतो. तरीही एखाद्या समयी, थोडा काळ तरी असले शोध गुपित राहू शकतात. परंतु ते गुपित फार वेळेआधी फोडलं तर तो देशद्रोह होऊ शकतो. हाच प्रश्न मी 'आदित्य'मध्ये हाताळला.

भरत बसरूर ' आदित्य' ह्या फ्युजन रिॲक्टरचा शोध लावतो. तो रिॲक्टर बांधतो. आणि त्याचवेळी प्रयोगाभध्ये व्यस्त राहिल्यामुळे त्यांचं आपल्या कौटुंबिक जीवनाकडे दुर्लक्ष होतं. त्याच्या मुलीला सेरेब्रल पाल्सी होते. उपचारासाठी अमेरिकेत न्यायचा प्रसंग येतो; परंतु पुरेसा पैसा नसल्यामुळे त्याच्यावर 'आदित्य'चं गुपित 'विकण्याचा' प्रसंग येतो.

तो ते गुपित विकतो; आणि मुलीवरील उपचार करवून घेतो. त्याचं ते गुपित विकणं उघडकीला येतं आणि त्याला त्याची शिक्षा भोगावी लागते. त्याच्याविरुद्धच्या खटल्यात त्याचा प्रिय मित्र आणि

सहकारी स्टॅन डोमियन हाच मुख्य साक्षीदार ठरतो.

कादंबरीचा आरंभ आणि अंत 'आदित्य' ह्या फ्युजन रिॲक्टरच्या बिघडण्यात आणि दुरुस्त होण्यात गुंतलेला आहे. रिॲक्टर बिघडल्यानं स्फोटक परिस्थिती निर्माण होते आणि तिचा स्फोट टाळण्यासाठी (तुरुंगात शिक्षा भोगत असलेल्या) भरत बसरुरला पाचारण करण्यात येतं. दीड दिवसात भरत 'आदित्य'ला दुरुस्त करतो. त्या बदल्यात त्याला मिळू शकणारी शिक्षेची माफी तो नाकारतो. परंतु त्या दीड दिवसात 'आदित्य'च्या कारभारातील भ्रष्टाचार तो उघडकीला आणतो. इथं एक प्रश्न उभा केलेला आहे. साडेतीनशे कोटी रुपयांचा प्रकल्प बांधणाऱ्या निःस्पृह भरत बसरुरला आपल्या कन्येच्या उपचारासाठी काही लाख रुपयांसाठी गुपित विकावं लागतं; परंतु तो पैशाची अफरातफर करत नाही. ते देशाला चालत नाही. त्याऐवजी लाखो रुपयांचा गैरव्यवहार केलेला देशाला कसा चालतो? ह्या प्रश्नाला माझ्याकडे उत्तर नाही.

'आदित्य' ची संकल्पना गोव्याच्या दक्षिणेला असलेल्या कारवार अंकोल्याजवळील वास्तूमध्ये केलेली आहे. ह्या मार्गावरून दक्षिणेला अनेकदा जावं लागल्यानं 'आदित्य'साठी विशेष प्रवास करावा लागला नाही. १९८६- ८७ च्या दरम्यान दिल्ली, नागपूर, वगैरे ठिकाणी प्रवास घडला वेगळ्याच निमित्ताने! त्याचा उपयोग झाला.

कादंबरी म्हटल्यावर अनेक पात्रांची गर्दी होऊ शकते. त्या पात्रांमध्ये जिवंतपणा आणण्यासाठी उपकथानकांची गुंफण करावी लागते. त्यात थोडी कृत्रिमता येण्याची शक्यता आहे. त्यातल्या त्यात 'सुनी'ची कथा एक स्वतंत्र समस्या घेऊन अवतरते. (तिच्यावर मी स्वतंत्रपणे कथा लिहून तिच्यावरील एक नभोनाट्यही तयार केलेलं होतं. कथा प्रकाशित झालीय आणि नभोनाट्यही प्रसारित झालंय.) उपकथानकांमुळे कादंबरीला एक डायनॅमिक रूप मिळतं अशी माझी धारणा आहे.

कादंबरीचं प्रत्यक्ष लेखन दोन महिन्यात संपलं. एप्रिल आणि मे १९८८ हा काळ मी लेखनात घालवला. सांगाडा तयार असला तरी प्रकरण - उपप्रकरणाच्या सुरवातीला बराच वेळ ते प्रकरण 'कंपोझ' करण्यात जाई. कधी कधी गाडी अडे. त्यावेळी विचारांना चालना देण्यासाठी रेडिओ, टी.व्ही. पहाणं वगैरे करावं लागे. कधी फिरायला जावं लागे. सांगाड्यामधील मांस भरणं प्रत्यक्ष टेबलाशी बसून हातात पेन घेतल्यावरच जमे. प्रक्रिया अतिशय वेदनायुक्त होती. तरीही त्यातून आनंद मिळे. मे १९८८ मध्ये कादंबरी लिहून संपली. नक्की तारीख आठवत नाही. जूनमध्ये ती 'मौज' प्रकाशनाकडे पाठवली. कादंबरीच्या कल्पनेच्या बीजारोपणापासून ती लिहून तयार होईपर्यंतचा २८ वर्षांचा कालावधी पहाता 'मौज'ने प्रकाशनासाठी घेतलेला २४ महिन्यांचा कालावधी अतिशय लहानच म्हणावा लागेल. कादंबरी १९९० साली प्रकाशित झाली.

कादंबरीला कितीसा वाचकवर्ग मिळाला हे कळणं कठीण आहे. कादंबरी वाचून आवडल्याचं कळविणाऱ्यांमध्ये काही मित्र आहेत. इतर वाचकवर्ग म्हणावा तितका वाटला नाही. (काही लेखकांना असंख्य पत्रे येतात म्हणे. मला मोजण्याइतकी पत्रं आली. मी मोजली नाहीत ही गोष्ट निराळी; परंतु पत्रं न येण्यामागे आणखीन एखादं कारण असू शकतं. मला आलेल्या पत्रांना मी उत्तरही लिहीत नाही. मग वाचक मला पत्रं का पाठवतील? कदाचित ते कारणही असू शकेल!) समीक्षकांकडून अजिबात प्रतिसाद नाही. (एका समीक्षक बाईनं म्हटलं, "तुमची 'आदित्य' पाहिली हो. काही पानं चाळली. कळायला कठीण वाटली.")

'आदित्य' कळायला कठीण आहे अशी त्या बाईंची समजूत होण्यामागे तिला काहींनी 'विज्ञान कादंबरी' म्हटलं हे कारण असू शकेल. अर्थात 'आदित्य' ला वाचक कसली कादंबरी म्हणेल हे सांगणं कठीण आहे.

'आदित्य' ला दोन पुरस्कार मिळाले. १९९२ सालचे हे पुरस्कार आहेत. एक पुरस्कार (अधिक पुरस्कार) महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळाचा होता. दुसरा गोमंतक मराठी अकादमीचा 'कृष्णदास शामा' पुरस्कार होता. तिच्या समकालीन कादंबऱ्यांमध्ये तिचं स्थान नेमकं कुठं आहे हे मला कळलेलं नाही. समीक्षकांनीच ते ठरवायला हवं होतं. आता समीक्षक त्याबाबतीत उदासीन आहेत म्हणावं की त्यांना ती नगण्य वाटली असं म्हणावं? की दोन्ही? हे माहीत नाही.

माझ्या भावी लेखनाला 'आदित्य' ने तसं नेमकं असं कसलंच वळण दिलेलं नाही. 'आदित्य' ही माझ्या दहा कादंबऱ्यांपैकी एक ठरली आहे. त्यानंतर चार कादंबऱ्या लिहिल्या. त्यातील दोन (जोनास आर्क आणि भद्रमुखी) मौज प्रकाशनाकडे पडून आहेत. 'कांचनमृग' (मुंबई स्फोटावर आधारित) मेनका दिवाळी अंकातून प्रकाशित झालीय. चौथी 'अग्निस्नान' कुणाकडे पाठवावी ह्या विचारात माझ्याकडेच पडून आहे. अलीकडेच 'मृत्युंजय' नावाची एक कादंबरिका आणखीन एका प्रकाशकाकडे पाठवलेली आहे.

खरं पाहता मला 'आदित्य' ही एक महाकादंबरी करायची होती. त्यात अनेक उपकथानकं आणून तिला एक महाकाय स्वरूप द्यायचं होतं. जमलं नाही. ते महाकाय स्वरूप एका पुढल्या कादंबरीसाठी ठेवलंय. नाव आहे 'अश्वत्थाम्याचं थडगं'. लिहायला घेतलीय. बघू केव्हा संपते ती!

(अरुण हेबळेकर एम-२, हौसिंग बोर्ड कॉलनी, फोंडा, गोवा - ४०३ ४०१)

**डॉ. अरुण हेबळेकर.** जन्म - ३ फेब्रुवारी १९४२ (मुंबई).
फोंडा एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेज ऑफ आर्टस ॲन्ड सायन्सचे प्राचार्य.
१९७६ पासून लेखन चालू. पहिली कथा रिंग ऑफ सॅटर्न ही सत्यकथेत प्रसिद्ध. (मे १९७६)
त्यानंतर एकूण १०० कथा प्रकाशित.

कादंबऱ्या - सलोमीचं नृत्य, एका कोळियाने, वृक्मोहिनी, भृगुसेतू, प्रवाळपारधी, आं पासां, पक्षी जातो दिगंतरा, रुद्रमुख - ओ जॉनो (गोवा कला अकादमी पुरस्कार), आदित्य (महाराष्ट्र राज्य पारितोषिक)

कथा - रिंग ऑफ सॅटर्न (गोवा कला अकादमी पुरस्कार), पात्रं नसलेली माणसं.

अप्रकाशित - जोनास आर्क, भद्रमुखी, मृत्युंजय, कांचनमृग, अग्निस्नान.

## नवे आजीव सभासद

### धुळे

श्रीपाल मोहनराव सवनीस
विजया राजेंद्र पाटील
वसंतराव दौलतराव देसले
विजयचंद्र जाधव
अभिजित विनायक पाठक
अशोक दगडू पाटील
प्रमोद बाळकृष्ण जोशी
प्रभाकर शेळके

### इस्लामपूर

अशोकराव पाटील
गोपाळ हरी हसबनीस
वैजयंती पेठकर



अनुक्रमणिका

निर्मला देशपांडे

# सलत सूर सनईचा

सात आठ वर्षांपूर्वी मी इंदोरला माझ्या चुलत भावाच्या मुलीच्या लग्नाला गेले होते. इंदोरजवळच आमच्या गावाला आमच्या कुलस्वामिनीची पूजाअर्चा, देवधर्म माझ्या मोठ्या काकांचा मुलगा करीत असे. तोही लग्नाला इंदोरला आला होता. जाताना त्यानं मी गावी अवश्य यावं असा मला परोपरीनं आग्रह केला होता. इंदोरपर्यंत जाऊन गावी कुलस्वामिनीचं दर्शन न घेताच मुंबईला परतणं मला शक्यच नव्हतं. लग्नानंतर दोन दिवस इंदोरला राहून मी गावी गेले. तोवर माझ्या आगमनाची वार्ता गावात पसरली होती. गावी पोहोचताच तिथल्या लेडीज क्लबच्या बायका मला दुसऱ्या दिवशीचं क्लबमध्ये काव्यवाचन करण्याचं आमंत्रण देऊन गेल्या. हा लेडीज क्लब ६० - ६५ वर्षांपूर्वी माझ्या चुलत चुलत आत्यानं स्थापन केला होता. तेव्हा मी ९ - १० वर्षांची परकरी पोर असेन. ही माझी आत्या अत्यंत चळवळी. देशभक्तीनं समाज सुधारणेसाठी आणि गरीबांच्या कल्याणासाठी तळमळणारी. वाड्यातल्यांच्या मनाविरुद्ध जाऊन त्या त्या प्रकारची आंदोलनं अटीतटीनं करणारी. आत्यानं गावात लेडीजक्लब स्थापन करायचं ठरवलं म्हणजे ठरवलंच २५-२६ चा तो काळ असावा. तिच्याबरोबर लेडीजक्लबसाठी मेंबर गोळा करायची ... दरडोई चार आणे चंदा जमवायचा.. वगैरे. आम्ही वाड्यातल्या पाचसहा मुलीही गावभर भटकत असू.

मी दुसऱ्या दिवशी मोठ्या उत्साहानं लेडीज क्लबमध्ये दाखल झाले. काव्यवाचन, हारतुरे, चहापाणी झालं. मी एक छोटंसं भाषणही ठोकलं. क्लब बघून समाधान पावले. भिंती न्याहाळू लागले. क्लबाच्या भिंती सरदार जहागीरदारांच्या घरवाल्यांच्या फोटोंनी मढल्या होत्या. फोटो बघता बघता माझ्या मनात आलं की ह्या हिऱ्यामोत्यांच्या दागिन्यांनी सजलेल्या प्रत्येक बाईच्या आयुष्याची एक एक कादंबरी होऊ शकेल. सर्व फोटो न्याहाळून झाले. माझ्या आत्याचा फोटो कुठे दिसेना. निदान संस्थापिका ह्या नात्यानं तिचं नाव हॉलच्या आत, बाहेर कुठेही नसावं ह्याचं मला आश्चर्य वाटलं; पण मी काही बोलू शकले नाही. माझं भाषण आधीच झालं होतं.

आम्ही सर्वांचा निरोप घेतला तेव्हा सेक्रेटरीबाई माझ्याजवळ येऊन म्हणाल्या, "तुम्ही पाचशे रुपये डोनेशन द्याल तर तुमचाही फोटो भिंतीवर टांगून देऊ... फोटोग्राफर आमचाच."

"माझा फोटो भिंतीवर नाही टांगून दिला तरी हरकत नाही." मला देऊ केलेलं पाकीट मी त्यांना



अनुक्रमणिका

परत करीत म्हटलं.. " हे माझ्या तर्फे तुमच्या लेडीज क्लबला."

बाईंनी ते पाकिट हसत स्वीकारलं.

हातात भरगच्च मोगरीचा हार घेतलेली मी त्या करकरीत तिन्हीसांजेला कोमट मनानं वाड्यात परतले.

खूप वर्षांपूर्वी मी नवयुगच्या दिवाळी अंकात "देवीचा ओटला" नावाची कथा लिहिली होती. ती कथा फारशी गाजली असं म्हणवत नाही. आली दोन चार पत्रं. पण वि. द. घाटे, दि. के. बेडेकर ह्यांच्या सारख्यांनी नवयुगच्या संपादिकेला कथा आवडल्याचं कळवलं होतं. ती कथा श्री. राम पटवर्धनांनी वाचली होती. त्या दिवाळीनंतरच्या भेटीत ते म्हणाले होते, " निर्मलाबाई, तुम्हाला सोन्याचा डोंगर सापडला असताना त्यातून तुम्ही एक उंदीरच का घडवलात? चांगला महागणपती घडवायला हवा होता. अहो, हा कादंबरीचा ऐवज आहे." वगैरे.

पटवर्धनांचं ते वाक्य मनावर कोरलं गेलं होतं; पण हातून काही घडत नव्हतं. म्हणजे महागणपती वगैरे. त्यानंतरच्या २० - २५ वर्षात कथा, कविता, लघुनिबंध, बालगीतं, बालकादंबऱ्या घडतच होत्या. त्याच कालखंडात 'टिकली येवढं तळं', 'बन्सी काहेको बजायी', 'मर्ल' हा कथासंग्रह आणि दोन वर्षांपूर्वी 'कथा एका बकुळाची' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. अधून मधून पटवर्धनांचे शब्द मनातून उसळी मारून बाहेर येत राहिले. तरीही हातातून काही उतरेनाच. आता आयुष्य उतरणीला लागलंय ह्याची मला तीव्रतेनं जाणीव होऊ लागली आणि कित्येक वर्षांपूर्वी लिहिलेल्या "देवीच्या ओटल्या" कडे मी धाव घेतली. ही धाव गेली ५-६ दर्षे चालूच होती. माझी गतीच (लेखनातली) मंद; त्याला कोण काय करणार? मंदगती हे मी माझ्या आळशीपणाला दिलेलं गोंडस नाव असू शकेल.

कधी कधी मला प्रश्न पडतो : खऱ्या अर्थानं आपण लेखिका आहोत की लेखिकापणाचं नुसतं नाटक करतोय? कारण मी डेडिकेटेड लेखिका नाही. ह्या वयातही मी स्वतःला संसारात फार म्हणजे फारच गुंतवून घेतलेलं आहे. लेखिकेनं कसं सतत हातात पेन कागद घेऊन लिहीत राहायला हवं! भारंभार पुस्तकं वाचण्यात आणि स्वयंपाकघरात तऱ्हतऱ्हेचे खाद्यपदार्थ करण्यात वेळ वाया घालवू नये. पण संसार, खाद्यपदार्थ व खूपसं वाचन करणाऱ्या इतर लेखिकांची पुस्तकंही भराभरा प्रसिद्ध होत असतातच की ! आम्ही आपले २-३ वर्षात एखादं पुस्तक प्रसिद्ध झालं की स्वतःला धन्य धन्य समजतो.

पुढे मी ह्या 'देवीच्या ओटल्या'चा एक प्रचंड वाडाच करून टाकला आणि त्याला नाव दिलं 'सलत सूर सनईचा'.

गावच्या लेडीज क्लबनं विषय सुचवलाच होता. त्यावर मनन, चिंतन, मंथन चालूच होतं.

तो वाडा माझ्या माहेरच्या गावचा. प्रत्यक्षातला. आता त्याचा पार भुगा व्हायला आलाय. गेल्या २०-२५ वर्षांत लग्नकार्यानिमित्त मी वाड्याला उडती भेट देऊन आलेली आहे. प्रत्येक भेटीत वाड्याचं ढासळतं रूप मला विषण्ण करीत आलेलं आहे.

मी कादंबरी लिहायला घेतली.

वाड्यातल्या त्या पुरुषभर उंचीच्या माझ्या पूर्वजांच्या तसबिरी - त्या वेळचं आमचं वाड्यातलं सामंतशाही वास्तव्य - माझ्या आजोबांचं, काकांचं, वडिलांचं झोकदार जीवन हळूहळू नाहीसं झालेलं

मला तीव्रतेनं जाणवू लागलं.

ह्याचा अर्थ माझ्या पूर्वजांच्या ऋणातून मुक्त व्हावं म्हणून मी 'सलत सूरचा' प्रपंच करीत होते का? नाही. असं कोऱ्यावर काळं करून पूर्वजांच्या ऋणातून मुक्त होता येत नाही. मरणानं मृत्यूशी नातं तुटत नसतं. माणूस गेलं तरी त्याचं आपलं नातं आपल्या मनातून जात नाही. आपल्या रक्तातून ते वाहात असतं. पिढ्यान्‌पिढ्या सनातनाशी नातं जोडतं आणि नव्याचा स्वीकार करायला शिकवतं.

माझ्या घराण्यात कोणी कवयित्री, लेखिका झाल्या असतील का? असल्यास त्यांची माहिती मला कशी आणि कुठून मिळेल असा मला नेहमी प्रश्न पडतो.

आता माहेरी म्हणजेच माळव्यात जाऊन उत्खनन करण्याची ताकद नाही. अनेक अर्थांनी ते शक्यही नाही. कादंबरीलेखनात कल्पनाशक्तीला भरपूर वाव असतो. पण कल्पनाशक्ती सैरावैरा धावत ठेवणं मला मंजूर नसतं. आपलं लेखन शक्य तितक्या कमी शब्दात वाचकांपर्यंत पोहोचवावं.. किंवा पात्राच्या हालचालीतून ते वाचकाला जाणवावं असं लिहिण्याचा मी प्रयत्न करते.

कादंबरीची रूपरेखा मी कागदावर उतरवते. कादंबरीत मोजकीच पण ठळक पात्रं असावीत. पात्रं त्यांच्या गुणदोषांसह चित्रित व्हावीत. काळ्या किंवा पांढऱ्या रंगात चित्रित होऊ नयेत. पात्रापात्रांतील परस्परसंबंध, त्या संबंधातील ताणतणाव, त्यांची मुखवटे धारण करण्याची पद्धत - काहींचा रांगडेपणा - लेखन हा जीवनाचा आरसा असावा असं म्हटलं जातं. मग उगाच गुलगुलीत - गुळगुळीत कशाला लिहा?

लेखन आकाराला येत असताना अनेक नव्या नव्या कल्पना सुचत जातात. मन चिंतनात बुडून जातं. कादंबरी लिहीत असताना मला अनेकदा स्वप्नात सुद्धा कादंबरीतली पात्रं माझ्याशी बोलताना दिसतात. समोर चित्रपट उलगडू लागतो. दुसऱ्या दिवशी तो मी कागदावर उतरवते. अमूक एक लिहायचं असं ठरवून नेमकं तेच लिहिलं जाईल असं होत नाही. फेरफार करावेच लागतात. कादंबरीचं एक एक प्रकरण मी सहा सहा वेळा लिहिलेलं आहे. लिहिताना किती खाडाखोड आणि फाडाफाड होते हे फक्त आभाळातल्या भगवंतरावांनाच ठाऊक. लिहिता लिहिता कागदावर पात्रांची जत्राच भरते. तशा आपल्या मनात सदैव जत्राच भरलेल्या असतात. पण लेखनात त्या जत्रेतली कोणती पात्रं कटाप करायची व कोणाला अमरत्व बहाल करायचं ह्याचा विचार करावा लागतो.

"सलत सूर सनईचा" लिहिताना मी माणसात नव्हते. आपण लिहिलेलं कुचकामाचं आहे - आपण आपलं एवढं दीर्घायुष्य फुकट घालवलं.. आत्तापर्यंत आपल्या २०-२५ कादंबऱ्या व्हायला हव्या होत्या असे निराशेचे झटके मला अधूनमधून येत असत. लिहिलेलं बाड फाडून टाकण्याची भाषा करताच रामदास भटकळ धीर देऊन जायचा. सहा वर्षे म्हणजे झालं काय? ही बाई रामायण लिहितेय की महाभारत? असा विचारही रामदासच्या मनाला चाटून गेला असल्याची शक्यता नाकारता येत नाही. लिहिलेलं बाड प्लॅस्टिकच्या पिशवीत कोंबून मी त्याच्यावर पाणी सोडायची. पण ते पाणी लिखाणापर्यंत पोहोचलं नसावं. शिवाय मित्रमैत्रिणींचा धोषा कायम. परत वाचायला घ्यावं - पुढे लिहित राहावं असं चालू होतं. शिवाय रामभाऊ पटवर्धनांचं वाक्य अधून मधून डोकं वर कढीतसे ते निराळंच. कधी कधी वाटायचं, कशाला मी हे (माझ्या दृष्टीनं) तीन पिढ्यांचं शिवधनुष्य पेलायचा खटाटोप करतेय? पण हाती घेतलेलं कोणतंही काम अर्धवट सोडायचं नाही असा माझा स्वभाव आहे. मग

कोणाला ते आवडो - न आवडो.

एकदाची 'सलत सूर सनईचा' ही कादंबरी पूर्ण झाली आणि मला अर्धा मोक्ष मिळाला.

आपला जन्म ज्या परिसरात झाला, जिथे आपण रांगलो, चालू लागलो, जिथे आपल्यावर माया करणारी, प्रसंगी आपल्याला चापटी मारणारी माणसं भेटली, तो परिसर आपल्या लेखनात अनाहूतपणे डोकावतोच. मग तो परिसर कितीही रांगडा, अनघड किंवा टिकलीएवढा असला तरी तो परिसर आपल्या स्मृती ठळक करतो. मात्र लेखकानं स्वतःशी प्रामाणिक राहून लेखन करावं असं मला ठामपणे वाटतं.

मला अनेकदा प्रश्न विचारला जातो की तुम्ही माळवा, मध्यप्रदेश, बुंदेलखंडाच्या वाडावंगला संस्कृतीचंच चित्रण का करता?

ह्या प्रश्नाचं उत्तर वर दिलंच आहे. आता मी अतिश्रीमंत किंवा झोपडपट्टीच्या परिसराचा अनुभवच जर घेतला नाही तर त्याचं चित्रण मी कसं करणार?

सहज एक गंमत आठवली ती लिहिल्याशिवाय राहावत नाही. ग्वाल्हेरला व्हिक्टोरिया कॉलेजात बी.ए. (ऑनर्स)च्या शेवटच्या वर्षाला (मराठी विषय घेऊन) असताना आम्हाला प्राध्यापक बापट मॉडर्न मराठी शिकवीत असत. गोरीपान, ठेंगणीशी मूर्ती, कपाळावर उभं गंध, सात्त्विक चेहरा.. डोईवर काळी टोपी. अंगात काळा कोट, पांढरं स्वच्छ धोतर.. त्यांना आम्ही तुकारामबुवा म्हणत असू. अधूनमधून आम्हाला ते लघुकथा लिहून आणायला सांगत असत. आता लघुकथा म्हणजे मलबार हिल, समुद्रकिनारा, प्रशस्त बंगला, त्यातली श्रीमंताची एकुलती धनुष्याकृती भुवया वगैरे असलेली मुलगी हे ओघानं आलंच. तर लघुकथेत आम्ही थेट मुंबईवर हल्ला करीत असू. मुंबईची भौगोलिक माहिती शून्य..

आमच्या कथा वाचून ते निराश होत. म्हणत, "लेखनात तुम्ही उड्या मारून मुंबईलाच का जाता? आपल्या ग्वाल्हेर इंदोरच्या पार्श्वभूमीवर कां लिहीत नाही?" तेव्हा वाटायचं ग्वाल्हेर काय पार्श्वभूमी लायक भूमी आहे का? इथं फक्त राजवाडे, गल्ल्या, वोळ आणि चंदेरी साड्यांची दुकानं!

त्या परिसरापासून दूर आल्यानंतर कदाचित तो परिसर माझ्या लेखनात वारंवार डोकावत असावा. कादंबरी लिहिताना मला आमच्या बापटसरांची आठवण येते.

किती वर्षांपूर्वी कोण जाणे (सन लक्षात नाही) माझी "बन्ना बन्नी" (नवरा मुलगा - नवरी मुलगी) ही कथा मौजेच्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली होती. एकदा मला बसमध्ये श्री. बाबुराव चित्रे भेटले. ते म्हणाले, "निर्मलाबाई, तुमच्या मध्यप्रदेशच्या वातावरणावर तुम्ही अजून खूपसं लिहा. वाचायला आवडतं." बाबुराव चित्रे आपल्या 'सेज तुका' दिलीप चित्रे याचे वडील.

मी म्हटलं, "छे हो! आता कसली मी काही लिहिते?"-"लिहाल. जरूर लिहाल" म्हणत बाबुराव बसमधून उतरले. त्यांचा स्टॉप आला होता. बाबुरावांनी मला दिलेला तो आशीर्वादच असं मी समजते.

आज मला माझा माळवा, बुंदेलखंड विसरून गेलाय. पण माझ्या मनात त्या परिसराच्या स्मृती अजून ताज्या आहेत. त्या परिसराच्या आठवणींनी अजून मी व्याकुळ होते. पण संसारकर्त्या बाईला असं व्याकुळ होऊन चालत नाही. निदान लिहिताना तरी संयम पाळावाच लागतो. बाईच्या (पुरुषाच्या नव्हे) मार्गात अनेक अडथळे अडचणी असतात. अमूक एक लिहायचं म्हणजे प्रवास करून तो परिसर

पाहणं बाईला शक्य नसतं. गेल्या २०-२५ वर्षात लग्नकार्याच्या निमित्तानं मी माझ्या माहेरच्या गावी दोनचारदा गेलेली आहे पण तो प्रवास लेखनासाठी केलेला प्रवास नाही. धावत्या भेटीतही आपलं मन अनेक गोष्टी टिपून घेत असतं.

आणि हे थोडं मुद्याला सोडून आहे ह्याची मला पूर्ण जाणीव आहे. माझी "बन्सी काहेको बजायी" ही कादंबरी वाचून मला ती. अक्का उर्फ इंदिरा संतांचं पत्र आलं. ते माझ्या संग्रही आहे. "निर्मला बाई, तुम्ही मध्यप्रदेश माळव्याचं चित्रण करता ते वाचायला आम्हाला आवडतं. मराठीत त्या बाजूचं चित्रण अजून झालेलं नाही."

इंदिराबाईंच्या शाबासकीची थाप पाठीवर पडताच मला राष्ट्रपती पदक मिळाल्याचा आनंद झाला.

"सलत सूर" मध्ये संघर्ष आहेच. प्रत्येक बाईच्या पाचवीलाच संघर्ष पूजलेला असतो. ह्या कादंबरीची नायिका शरयू स्वातंत्र्याच्या विचारांनी पेटलेली आहे. लग्नानंतर संसार आणि स्वातंत्र्याची चळवळ ह्या दोहोंमध्ये तिची कुतरओढ होते आणि लग्नानंतर दोन वर्षांतच तिचा मृत्यू होतो. माणूस मनात योजतो काय आणि नियतीच्या मनात असतं काय. माणसाची नियतिशरणता हाही संघर्षाचा एक प्रमुख भाग असू शकेल. ह्या कादंबरीला उपकथानक आहे ते शरयूच्या चुलत चुलत भाचीचं.. शालीचं. मुद्दाम योजलेलं नाही. आपोआप आलेलं आहे. समीक्षकांचं माझ्या लेखनाकडे लक्ष गेलंच आणि त्यांना मी ते मुद्दाम 'पेरलंय' असं वाटलं तर वाटो.

कादंबरीच्या प्रतिसादाबद्दल आताच मी काय लिहिणार? कादंबरी रामदासच्या हाती सोपवून मला अर्धा मोक्ष मिळाल्याचं मी वर म्हटलंच आहे. कादंबरी दिवाळीपर्यंत प्रसिद्ध झाली की मी पूर्ण मोक्षाप्रत पोहोचले असं समजावं.

कादंबरीची नायिका सर्वांगसुंदरच असली पाहिजे असा माझा आग्रह नसतो. तिचं मन सुंदर असावं. ओल्या मनाची. समंजस, संवेदनाक्षम नायिकाही नायकाच्या किंवा वाचकाच्या मनाला भिडू शकते. लेखकाला मुख्यतः पात्रांच्या मनाचा वेध घेता यायला हवा. त्याचं निरीक्षण सूक्ष्म हवं.

"स्त्रीमुक्ती" हा शब्दही ठाऊक नसताना ६०-७० वर्षांपूर्वीच्या स्त्रियांनी किती कर्तबगारी केली. घरादाराला आपल्या हुकमतीखाली कसं ठेवलं आणि पुरुषांनासुद्धा बायकांना सहावं इंद्रिय असतं ह्याची तीव्र जाणीव होती हा नवा दृष्टिकोन. आजच्या आमच्या स्त्रीमुक्तीच्या घंटानादात त्या काळच्या स्त्रियांच्या कर्तबगारीचा ध्वनी क्षीण होत चाललाय. ह्याची वाचकाला चुणूक मिळाली तरी खूप झालं असं वाटतंय.

आज वाड्याचा भुस्सा झालाय. वाड्यातली उरलीसुरली मंडळी जीव मुठीत घेऊन जमेल तसा देवधर्म, पाहुणचार करीत आहेत. गरीबीनं सर्वांची मुस्कटदाबी केली आहे. अनेक अघटित प्रसंग वाड्यातल्या मंडळींवर गुदरले आहेत. पण त्यांची मनं अजून ओली आहेत.

कादंबरीच्या शेवटी शालू जड पावलांनी वाड्याबाहेर पडते. रिकामी गणेशपट्टी ओलांडल्यावर तिची नजर उजवीकडे वळते. पीर बावांची हिरव्याकंच पाचुपानांची बोर पौषाच्या ऊबदार उन्हात झळझळत असते. शालूला मानसिक बळ मिळतं. जुनं जमिनीत गाडलं गेलेलं असलं तरी नव्याचा आशाकिरण तिच्या मनात झगमगू लागतो.

ती भराभरा पावलं उचलते.

ह्या कादंबरीमुळे काही दिशा मिळाली की नाही कोण जाणे! दिशा मिळण्याचं वय आता इतिहास जमा झालंय - पण बचेंगे तो और भी लिख्खेंगे.

(निर्मला देशपांडे, ५३ रमासदन, डॉ राऊत रोड, मुंबई २८)

**निर्मला देशपांडे:** जन्म २९ डिसेंबर १९१७. बी.ए.
**बालवाङ्मय** - मातीची गाय, चिव चिव चिमणी (दोन्हींना राज्य पुरस्कार)
पौर्णिमेचा चंद्र, अजबपुरीची अजब कथा, एमिल आणि गुप्तहेर
**कादंबऱ्या** - टिकली येवढं तळं, (राज्यपुरस्कार), बन्सी काहे को बजायी,
कथा एका बकुळाची ( ह. ना. आपटे पारितोषिक),
**कथासंग्रह** - मर्ल (मसाप पारितोषिक)

---

## साभार स्वीकार

### काव्यसंग्रह

- दिपवा : निरंजन उजगरे, भावना प्रकाशन, ठाणे. पृष्ठे ६२. पन्नास रुपये
- स्पर्शरेषा : नीलिमा गुंडी, स्नेहवर्धन. पृष्ठे ७६. चाळीस रुपये
- अंतर्नाद : अरविंद भुजबळ, उन्मेष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७५. चाळीस रुपये
- घन विरहाचे : आशा भिडे, अक्षर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ७१. तीस रुपये
- उजेड गाणी : भगवान मोईटे, स्वप्नील प्रकाशन, भिवंडी. पृष्ठे ६०. तीस रुपये
- उठ शाहिरा : मधु मोंढे, सुरभी प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३६. पन्नास रुपये

### नीहारा प्रकाशन, पुणे

- विज्ञानाचा कल्पतरू : मुरलीधर जावडेकर, पृष्ठे ४८. पंचवीस रुपये
- हेरी सहन करायचं : वि. व. सबनीस, पृष्ठे १२८. सव्वीस रुपये
- स्वप्नशिखा : संगीता ठले, पृष्ठे ४८. वीस रुपये

### मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई

- जे. कृष्णमूर्तींची जीवनसृष्टी : ग. ना. जोशी, पृष्ठे २०६. पावणेदोनशे रुपये
- एक माणूस एक दिवस : ह. मो. मराठे, पृष्ठे २६८. एकशे पस्तीस रुपये
- प्रदक्षिणा : जयवंत दळवी, पृष्ठे २४९. एकशे चाळीस रुपये
- महाराष्ट्राची मानचिन्हे : सं. साखळकर-भेंडे, पृष्ठे २९३. एकशे ऐंशी रुपये
- ते दहा दिवस : मधु कुलकर्णी, पृष्ठे ११६. ऐंशी रुपये
- फील्डवर्क : प्रवीण पाटकर, पृष्ठे १८१. पन्नास रुपये
- मराठी लोकनाट्य : उदय आणि विकास : शिवाजीराव चव्हाण, सुशिंपाज प्रकाशन, वाई. पृष्ठे ५०. पंचवीस रुपये
- मोर पिसारा : सुमती पवार, परफेक्ट सिलेक्शन, नासिक. पृष्ठे ४८. दहा रुपये
- स्टिफन हॉकिंग : निवास पाटील, कॉंटिनेंटल, पुणे. पृष्ठे ७५. चाळीस रुपये

ह. मो. मराठे

# सॉफ्टवेअर

सॉफ्टवेअर ही कादंबरी मी १९८५ मध्ये लिहिली. त्या वर्षीच्या 'कथाश्री'च्या दिवाळी अंकात ती प्रसिद्ध झाली आणि त्यानंतर एकदोन वर्षांनी ती 'मॅजेस्टिक प्रकाशन'तर्फे पुस्तकरूपाने आली.

दिवाळी अंकात एखादी कादंबरी छापायची प्रथा मराठीत आहे. दहा पंधरा वर्षांपूर्वी तर प्रत्येक दिवाळी अंकात कादंबरी असेच. अलिकडे ही प्रथा कमी होऊ लागली आहे. तरीही पुष्कळशा दिवाळी अंकात संपादकांना जी कादंबरी हवी असते तिची लांबी दिवाळी अंकाची पस्तीस ते चाळीस पाने भरेल एवढीच असावी अशी संपादकांची अपेक्षा असते. म्हणजे लघुकादंबरी हवी. मराठीत असंख्य लघुकादंबऱ्या आहेत. याचे कारण हे आहे, दिवाळी अंकात चाळीसेक पानांची जी कादंबरी असते ती पुस्तकात ऐंशी पाने भरते. अशा दोन लघुकादंबऱ्या एकत्र करून त्यांचे पुस्तक प्रकाशक काढतात. मराठीत पुष्कळ लेखकांच्या दोन दोन लघुकादंबऱ्यांची अशी पुस्तके निघाली आहेत. चिं. त्र्यं. खानोलकर आणि गौरी देशपांडे यांचीही अशी दिवाळी अंकात आलेल्या लघुकादंबऱ्यांची संयुक्त पुस्तके निघाली आहेत. 'कथाश्री' दिवाळी अंकाचे संपादक श्री. अशोक लेले यांना त्या वर्षीच्या दिवाळी अंकासाठी माझ्याकडून एक कादंबरी हवी होती. त्याआधी सात आठ वर्षे मी दिवाळी अंकांना कादंबऱ्या देत होतो. माझी कादंबरी असली तर अंक खपायला मदत होते असा संपादकांचा अनुभव असावा. माझ्या कथांनाही दिवाळी अंकांतून पुष्कळ मागणी असे. आजचे, ताजे आणि वेगळे विषय, वेगळे वातावरण आणि आकर्षक मांडणी असे वाचकांना आकृष्ट करणारे काही गुणविशेष माझ्या लिखाणात संपादकांना आढळत असावे. औद्योगिक वातावरण, वृत्तपत्रांच्या परिसरातले वातावरण माझ्या काही कथांतून येऊ लागले होते. मराठीत हे विषय आणि वातावरण नवीन होते. त्यामुळे माझ्या कथांना वाचक लाभत होते. माझ्या कथांतून असे नवे विषय आणि वातावरण मी चित्रित करू लागलो होतो. तशाच एखाद्या विषयावरची लघुकादंबरी मी लिहावी अशी लेले यांची अपेक्षा होती.

माझ्या मनात असे काही विषय होते की ज्यांच्या आधारे लहानमोठ्या कादंबऱ्या तयार होऊ शकल्या असत्या; पण त्यात औद्योगिक वातावरणातले विषय नव्हते. लेले यांना माझ्या मनातील दोन तीन विषय सांगितले. त्यात एक विषय राजकीय उलथापालथीचा होता. एक विषय गुंतागुंतीच्या मानवी संबंधाचा होता; पण तो 'जुन्या' वातावरणात साकारणारा होता. हे विषय त्यांना पसंत

नव्हते. दिवाळी अंकांच्या कादंबऱ्यांबाबत अशी चर्चा संपादक, लेखक यांच्यात होतच असते. आपल्या अंकात एखाद्या 'नव्या' विषयावरची कादंबरी असावी अशी संपादकांची अपेक्षा असते. म्हणून ते लेखकाच्या मनात असलेले विषय समजून घेतात. एखादा विषय ओके करतात आणि मग लेखक ती कादंबरी लिहितो. ही सर्वसाधारण पद्धत.

माझ्या मनात असलेल्या विषयांपैकी एकही विषय लेले ओके करायला तयार नव्हते. त्यांना औद्योगिक वातावरणातलाच विषय हवा होता. माझ्यापाशी तर तसा विषय नव्हता.

मग लेले यांनीच आपल्या ओळखीच्या एका गृहस्थांबाबत घडलेली घटना कथन केली :

एका बड्या आणि नामवंत उद्योगसमूहात हे गृहस्थ काम करीत होते. उद्योगसमूह ज्यांच्या मालकीचा होता, त्यांच्यापैकी एकाशी यांचा खटका उडाला. त्यानंतर लवकरच त्यांना अतिशय अपमानित होत ती कंपनी, तो उद्योगसमूह त्यांना सोडावा लागला. त्यांनी कंपनीचा एकूण कारभार सुधारण्यासाठी उद्योगसमूहाची एक नवी कंपनी नावारूपाला आणण्यासाठी त्यांनी अतिशय कष्ट घेतले; तरीही मालकांच्या एका नातेवाईकाशी खटका उडाल्याने त्यांचा बळी घेण्यात आला, अशी ती हकीगत होती.

या हकीगतीत एखाद्या लघुकादंबरीसाठी आवश्यक ते 'पोटेंशिअल' नक्कीच होते. मला तो विषय कादंबरीचा विषय म्हणून भावला. या विषयावर लघुकादंबरी लिहून देण्याचे मी कबूल केले.

मी या गृहस्थांना भेटावे, त्यांच्याशी बोलावे असे लेले यांनी सुचविले. लेले यांनीच त्या गृहस्थांची व माझी भेट घडवून आणली. मी मुंबईला जाऊन त्यांना समक्ष भेटून आलो. लेले यांनी सांगितलेलीच हकीगत त्यांनी सांगितली.

विषय माझ्या मनात घोळू लागला. कादंबरीत जे कथानक येईल त्याची सुरवात कोठून होईल आणि शेवट कुठच्या बिंदूपाशी होईल हे मनात ती हकीगत ऐकता ऐकताच स्पष्ट झालं होतं.

कादंबरीत मध्यवर्ती व्यक्तिरेखा हे गृहस्थ असणार होते. ते एका बड्या उद्योगसमूहात येतील. त्याआधी ते एखाद्या छोट्या कंपनीत काम करीत असतील. नव्या कंपनीत खूप काम करून, कल्पकता वापरून मालकांचा विश्वास संपादन करतील, कौतुक प्राप्त करतील; नंतर मालकांच्या एखाद्या कुटुंबियांशी खटका, संघर्ष, उद्योगसमूहाच्या मुख्य मालकापर्यंत प्रकरण जाईल, ते नातेवाईकाची बाजू घेतील, या गृहस्थांना अपमानित व्हावं लागेल, तेथून बाहेर – अशी रूपरेषा तयार झाली.

कादंबरीची स्थूल रूपरेषा मनाशी तयार झाली तरी कादंबरीचे लेखन लगेच सुरू होत नाही. प्रत्यक्ष प्रारंभ कोणत्या प्रसंगाच्या चित्रणापासून करावा याचा निर्णय होत नाही. कथा किंवा कादंबरी ही प्रसंगांच्या चित्रणातून पुढे पुढे सरकते. उचित असा प्रसंग सुचेपर्यंत काही काळ जातो. हा काळ असतो नुसते कोरे कागद घेऊन आणि पेन शेजारी तयार ठेवून बसण्याचा! अनेक प्रसंग सुचतात, पण नको या प्रसंगापासून सुरवात असं वाटतं एखादा प्रसंग मनाशी नक्की करून प्रत्यक्ष लिहायला लागल्यावरही वाटते - नाही, ही वाक्यरचना नीट झाली नाही, हे शब्द अचूक पडले नाहीत. लय जमत नाही - फाडून टाका कागद असं पुष्कळ दिवस चालते. कादंबरी पूर्ण करून संपादकाच्या हाती देण्याची तारीख जवळ येत असते, तरीही सुरवातच रेंगाळत रहाते. एकदा सुरवातीचे एकदोन प्रसंग चित्रित झाले की हळूहळू गती वाढते. कथानकाचा ओघ वाढतो. पात्रे स्पष्ट होत जातात, त्यांच्या

संबंधातील ताणतणाव, रंगरूपे दिसू लागतात आणि कादंबरी पुढे पुढे जाऊ लागते. लेखन वेग घेते. इतका की पुढे पुढे एकेका दिवशी वीस बावीस फुलस्केप लिहून होतात.

हा निदान माझा या कादंबरीच्या वेळचा अनुभव. कारण, त्या काळात मी पूर्ण वेळ लेखनच करीत असे. नोकरी नव्हती.

डोक्यात दुसरे काही नव्हते. केवळ लेखन.

महिनाभरात कादंबरी लिहून झाली. पण लेले यांना अपेक्षित होती त्यापेक्षा कितीतरी मोठी. जवळजवळ दुप्पट मोठा! त्यांना दिवाळी अंकाची पस्तीस चाळीस पाने भरेल एवढाच मजकूर पुरेसा होता. पण प्रत्यक्षात तो भरला अंकाची पंचाहत्तर की ऐंशी पाने. त्यांचा सगळा प्लॅनच विस्कटला असणार.

कादंबरीतील मुख्य पात्राला नाव मिळाले देशमुख. मुख्य हकीगत देशमुख यांची. त्यांची उद्योगसमूहात झालेली फसवणूक हा मुख्य विषय. औद्योगिक संस्कृतीत एका माणसाच्या वाट्याला आलेली वंचना, हा आशय. विषय आशय असा जाणवल्यानंतर कथा केवळ देशमुखांचीच लिहून भागणार नव्हते. देशमुखांच्या कुटुंबियांच्या हकीगतींची जोड देणे आवश्यक वाटले. म्हणून त्यांची पत्नी, मुलगा, मुलगी यांच्याही हकीगती आल्या. मुलाची शिक्षणातील फसवणूक, कॉपी करून मार्क्स मिळविणाऱ्या मुलांसमोर देशमुखांचा मुलगा अपयशी होतो. मुलगी प्रेमात फसते. देशमुखांच्या पत्नीच्या उद्यमशीलतेच्या प्रेरणेचा पराभव आर्थिक स्पर्धेच्या वातावरणात होतो. आपण स्वतः काहीतरी अर्थार्जन केले पाहिजे या प्रेरणेतून घरच्या घरी काहीतरी व्यवसाय सुरू करते. पण धंद्यातील स्पर्धेत उतरायचे तर तेवढी भांडवल गुंतवणूक करण्याची शक्यता नाही. म्हणून तिला आपला व्यवसाय गुंडाळावा लागतो. अशा तऱ्हेने या चौघांच्याही प्रामाणिक जीवनप्रेरणांची वंचना होते. फसवणूक होते. मुख्य पात्र जे देशमुख त्यांची एका मोठ्या उद्योगसमूहात वंचना होते. त्यांच्या मुलाची शैक्षणिक स्पर्धेच्या युगात वंचना होते. मुलीची प्रेमाच्या बाबतीत होते. चौघांच्या वाट्याला येणारी वंचना हे कादंबरीचे मध्यवर्ती आशयसूत्र बनत जाते. असे सूत्र जर हाती न लागते तर ती कादंबरी केवळ प्रोफेशनल मॅनेजमेंट विरुद्ध फॅमिली मॅनेजमेंट या विषयावरची ठरली असती.

अर्थात तरीही हा विषय मराठी कादंबरीत प्रथमच आला असे ठरले असते. आधुनिक अर्थप्रधान समाजव्यवस्थेतून वाट्याला येणारी वंचना हे आशयसूत्र गवसल्याने या कादंबरीचा आशय अधिक सघन झाला आहे.

अर्थात या दृष्टीने या कादंबरीवर परीक्षणे वगैरे आली नाहीत. या कादंबरीवर एकही परीक्षण आल्याचे मला अवगत नाही. कदाचित, आधुनिक स्पर्धाप्रधान अर्थव्यवस्थेचे, औद्योगीकरणाचे, व्यापारीकरणाचे ताणतणाव आणि त्यांचा माणसाच्या जीवनावर होणारा परिणाम यांचे आकलन मराठी समीक्षकांनाही दहा बारा वर्षांपूर्वी होत नसावे!

परीक्षणे आली नाहीत तरी एक सुखद धक्का मला बसला. या कादंबरीला उत्कृष्ट कादंबरी म्हणून महाराष्ट्र शासनाचा प्रथम क्रमांकाचा पुरस्कार जाहीर झाला. १९९० साली बक्षीससमारंभ पुण्याच्या टिळक स्मारक मंदिरात झाला. परीक्षक समितीच्या वतीने प्रा. नागनाथ कोत्तापल्ले यांचे भाषण झाले. त्यांनी या कादंबरीचा उल्लेख 'ट्रेण्ड सेटर' या शब्दात केला. त्याचे बरे वाटले. कादंबरीतील मुख्य

पात्र जे देशमुख, त्यांची हकीगत हेच कादंबरीतील मुख्य कथानक. त्यांचा संघर्ष आणि त्यांच्या वाट्याला येणारी वंचना ही औद्योगिक वातावरणात येते. कथानक मोठ्या उद्योगसमूहाच्या परिसरात घडते, कंपनी त्या वरिष्ठ पातळीवरील व्यवस्थापनातील डावपेच आणि तांत्रिक बाबी यांच्या पार्श्वभूमीवर कथानक पुढे सरकते. औद्योगिक परिसरातील वातावरण आणि व्यवस्थापकीय डावपेच मला अगदीच अपरिचित नव्हते. मी त्या आधीची सोळा वर्षे 'किर्लोस्कर' कडे होतो. इतर किर्लोस्कर कंपन्यांशी माझा थेट संबंध येत नसला तरी आडून आडून पुष्कळ गोष्टी समजत होत्या. व्यवस्थापनाचे डावपेच आणि बड्या कंपन्यांत होणारे वरिष्ठ पातळीवरील व्यवस्थापकांचे हनन (किंवा ह्युमिलिएशन) करण्याची पद्धत आणि प्रक्रिया कशी असते याची मला ऐकून माहिती होती. सर्वच बड्या कंपन्यांत रीत आणि तंत्रे, प्रक्रिया आणि परिस्थिती बव्हंशी सारखीच असते. ती कादंबरीत आणणे मला कठीण गेले नाही. काही तांत्रिक गोष्टींची थोडी अधिक माहिती मिळवावी लागली. उदा. पेरेंट (मूळ) कंपनी, पेरेंट कंपनीची मालकी इतर कंपन्यांमधील पेरेंट कंपनीची गुंतवणूक, शेअर्स, पेरेंट (मूळ) कंपनी आणि तिच्या इतर कंपन्या यातील व्यवस्थापनाची हायरार्की, रिपोर्टिंग कोणी कोणासाठी करायचे (म्हणजे कोणं कुणाचा वरिष्ठ), कार्पोरेट मॅनेजमेंट इत्यादी. कारण कथानकातील महत्त्वाच्या घटना आणि कथानकाचा ओघ, संघर्ष, पेच वरील तांत्रिक बाबींतून आकाराला यायचा होता. कदाचित ही परिभाषा आणि वातावरण, हे जगच, मराठी समीक्षकांना अपरिचित असल्याने या कादंबरीवर परीक्षणे वगैरे आली नाहीत.

या कादंबरीत कॉम्प्युटरचा उल्लेखही नाही. मुख्य पात्र जे देशमुख, ते एखाद्या कॉम्प्युटर कंपनीचा कारभार बघते असेही मी दाखवले नाही. कंपनीतही कॉम्प्युटरचा वापर नाही. (आता तो सर्वत्र असतो. आता कॉम्प्युटरची परिभाषाही पुष्कळांना समजते. तंत्रज्ञानाचा प्रसार किती झपाट्याचे होत असतो त्याचे हे उदाहरण. तरीही या कादंबरीला मी 'सॉफ्टवेअर' असे शीर्षक दिले आहे. कॉम्प्युटर हे हायटेकचे म्हणजे अत्याधुनिक तंत्रज्ञानाचे प्रतीक. कॉम्प्युटरसाठी मटेरियल वापरतात त्याला म्हणतात सॉफ्टवेअर. सॉफ्टवेअर म्हणजे कॉम्प्युटरचे अंतरंग. कॉम्प्युटर हे उच्च तंत्रज्ञानाचे प्रतीक जसे आहे, तशीच ती प्रतिमाही आहे. उच्च तंत्रज्ञानाचा वापर करून उत्पादन घडवणाऱ्या, विकणाऱ्या, नफा कमावणाऱ्या व्यापारी संस्कृतीचा आशय व्यक्त करणारी सॉफ्टवेअर ही या संस्कृतीच्या अंतरंगाचा आशय वंचना आणि फसवणूक आहे. 'सॉफ्टवेअर' या प्रतिमेतून कादंबरीचा हा आशय ध्वनित होतो.

जाताजाता आणखी एक प्रसंग सांगण्यासारखा आहे. या कादंबरीच्या शेवटी अशी घटना आहे की देशमुखांना राजीनामा द्यायला सांगण्यात येते. त्यांचा पगार आणि इतर ड्यूज पोचते करायला कंपनीचा एक अधिकारी त्यांच्या घरी येतो. राजीनामा ॲक्सेप्ट केल्याचे पत्र त्यांना देतो आणि निघून जातो. बरोब्बर अस्साच प्रसंग माझ्या आयुष्यात घडला. माझ्या 'लोकप्रभे'च्या राजीनाम्याच्या वेळी. कादंबरी मी १९८५ मध्ये लिहिली. माझ्या जीवनात कादंबरीतील प्रसंगाची तंतोतंत पुनरावृत्ती झाली त्यानंतर दोन वर्षांनी!

(१/१६, वृंदावन सोसायटी, मीरा सोसायटीमागे, शंकरशेट रोड, पुणे ४११०३७. फोन ६४३३३१)










सुबोध जावडेकर

# आकान्त

माझ्या 'आकान्त' ह्या कादंबरीवर ह्यापूर्वी एकदा लिहायचा योग आला आहे. पण ते कादंबरी लिहिण्यासाठी केलेल्या संशोधनावर होतं. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादकांना वेगळ्या मुद्यावर लिहिणं अपेक्षित आहे.

पण त्यापेक्षा महत्त्वाचं म्हणजे म.सा.पत्रिकेचा हा कादंबरी विशेषांक आहे. औद्योगिक किंवा तांत्रिक विषयावरील एक कादंबरी ह्या नात्यानं 'आकान्त'नं ह्या सभेत हजेरी लावणं मला आवश्यक वाटलं. म्हणून संपादकांचं पत्र येताच मी होकार कळवला.

मराठीत औद्योगिक विषयांवर लिहिलेल्या कादंबऱ्या नाहीत असं नाही. पण एकतर त्यात तांत्रिक बाबींवर अनावश्यक भर दिलेला आढळतो नाहीतर त्यात औद्योगिक पार्श्वभूमी एखाद्या बॅकड्रॉपसारखी वापरलेली असते. 'आकान्त' लिहिताना ही दोन्ही टोकं टाळायचा मी जाणीवपूर्वक प्रयत्न केला आहे.

'आकान्त' ही कादंबरी भोपाळ दुर्घटनेवर आधारलेली आहे. ह्या कादंबरीचा विषय कसा सुचला ह्या प्रश्नाचं उत्तर देण्याची गरज आहे असं मला वाटत नाही. आपल्या अगदी दारात घडलेल्या ह्या दुर्घटनेत दोनतीन हजार माणसांना प्राण गमवावे लागतात, हजारो अपंग - आंधळे होतात, लाखो संसार उद्ध्वस्त होतात ही परिस्थिती कुणाही संवेदनाशील कलावंताला अस्वस्थ करून सोडणारी आहे. खरं तर या आधी या विषयावर कुणी कसं लिहिलं नाही ह्याचंच मला आश्चर्य वाटत आलं आहे.

ही कादंबरी लिहायच्या आधी मी फारसं काही लिहिलं नव्हतं. भोपाळ दुर्घटना झाली तोपर्यंत व्यवसायाच्या निमित्तानं मी उद्योगक्षेत्र जवळून पाहिलं होतं. अपघात कसे होतात, त्याला कोण जबाबदार असते, सुरक्षिततेचे नियम का धाब्यावर बसवले जातात हे सगळं अनुभवलं होतं. त्यामुळे ह्या दुर्घटनेचा तपशील जेव्हा बाहेर येऊ लागला तेव्हा मला तो सर्व फार वरवरचा वाटायला लागला.

म्हणजे तपशील अचूक नव्हता किंवा पुरेसा नव्हता असं नाही. उलट काही लेख तर खूपच सविस्तर माहिती देणारे होते. पण तरीही तिथं जे घडलं त्यामागं असलेल्या कारणांचा शोध घेण्याचा प्रयत्न कोणी केलेला नव्हता.

म्हणजे असं की अमूक टाकीत पाणी गेलं, तमूक यंत्रणा चालली नाही, अशा प्रकारची माहिती होती. पण टाकीत पाणी का गेलं, त्यात पाणी जाऊ नये म्हणून केलेली उपाययोजना का फसली

असेल याचा विचार केला नव्हता.

औद्योगिक क्षेत्रात दहा पंधरा वर्षे काम केल्यानंतर एक गोष्ट अगदी ठामपणे मनात बसली होती. कुठल्याही तांत्रिक बिघाडामागे मानवी चुका, निष्काळजीपणा, स्वतःच्या कर्तृत्वावरचा अनाठायी विश्वास, दुसऱ्याबद्दलचा बेदरकारपणा ह्या गोष्टी जबाबदार असतात. इतकंच नव्हे तर स्वार्थ, लबाडी, आळशीपणा, मदमत्सर हे षड्रिपूही आपला वाटा उचलत असतात हे अनुभवातून पटलं होतं.

म्हणून मग हे कुणाला तरी सांगावं असं तीव्रतेनं वाटायला लागलं.

त्याच सुमारास ग्रंथालीचे दिनकर गांगल वाङ्मयशोभाचं काम पाहात होते. नव्याजुन्या लेखकांची त्यांनी एक बैठक बोलावली होती. त्याला मी हजर होतो. कुठल्या नवीन विषयावर लिहिता येईल ह्यावर तेथे विचार झाला. भोपाळ दुर्घटना नुकतीच झाली असल्याने तिच्यावर लिहिलं गेलं पाहिजे असा सूर निघाला.

त्या आधी मी महाराष्ट्र टाइम्समधे विज्ञानावर काही लेख लिहिले होते. म्हणून म.टा.च्या श्रीराम सिधये यांनी माझं नाव सुचवलं. तोच विचार मनात घोळत असल्यामुळे मी होकार दिला.

या दुर्घटनेमागे असलेली मानवी चुकांची साखळी कल्पनेने रेखाटून मी एक दीर्घकथा लिहिली. ती वाङ्मयशोभामधे प्रसिद्ध झाली. काय झालं त्यावर लक्ष केंद्रित न करता ते का झालं असेल त्यावर मी भर दिला होता.

एखाद्या अपघाताची किंवा दुर्घटनेची अशा प्रकारे केलेली मांडणी पुष्कळांना नवी वाटली. ह्यामागचे धागेदोरे जास्त खोलात जाऊन धुंडाळावेत आणि गवसलेलं सत्य कादंबरीच्या रूपानं वाचकांपुढे मांडावे असा आग्रह मित्रांनी केला. त्यातून 'आकान्त'चा जन्म झाला.

'आकान्त' वास्तवही आहे आणि कल्पनाविलासही आहे. जे घडल्याचं त्यात दाखवलं आहे ते सारं भोपाळला घडलेलं आहे. पण ते का आणि कसं घडल्याचं दाखवलेलं आहे ते मात्र कल्पित आहे.

पण कल्पित असलं तरी ते 'खोटं' मात्र नाही असं मी निश्चितपणे म्हणू शकतो. तसं घडताना यापूर्वी मी कितीदा तरी प्रत्यक्ष पाहिलेलं होतं, ऐकलेलं होतं. अनेक छोट्या छोट्या अपघातांची साखळी भोपाळमध्ये एकत्र झाली आणि परिणामी ती भीषण दुर्घटना घडली. ह्या साखळीतली प्रत्येक कडी स्वतंत्रपणे वेगवेगळ्या ठिकाणी, वेगवेगळ्या वेळी वास्तवात अवतरत असते हे या क्षेत्रातही कितीतरी माणसे सांगू शकतील.

ह्या कादंबरीतल्या व्यक्तिरेखांबद्दलही हेच सांगता येईल. ही सगळी माणसं मला कुठेना कुठे भेटली होती. अगदी मध्यवर्ती व्यक्तिरेखेच्या जवळपास जाणाऱ्या व्यक्तीदेखील!

प्रत्यक्षात घडलेलं एकच उदाहरण सांगतो. गुजरातमधील एका मोठ्या कारखान्यात नैसर्गिक वायू, कच्चा माल म्हणून वापरतात. वायूचा शिल्लक उरलेला भाग जाळून टाकला जातो. त्या वायूबरोबरच तेलाचा मोठा अंश कारखान्याला पुरवला जात होता. एक दिवस काही कारणानं हा तेलाचा भाग वायू ज्या धुराड्याच्या टोकाला ज्योतीच्या स्वरूपात जळत असतो तेथे हवेत उंच फेकला जाऊ लागला. पेटलेल्या तेलाचे थेंब धुराड्यातून बाहेर येऊन सगळीकडे पसरू लागले. कारखान्यावर अक्षरशः आगीचा वर्षाव होऊ लागला.

बऱ्याच जणांनी हातातलं काम टाकून, चालू असलेली यंत्रे बंद न करता तिथून अक्षरशः पळ काढला. पण कारखाना चालू स्थितीत सोडून पळून जाणं फार धोक्याचं होतं. त्या कारखान्यात अनेक ज्वालाग्राही रसायने निरनिराळ्या टाक्यांतून साठवलेली होती. अनेक प्रकारचे विषारी वायू दाबाखाली होते. प्रचंड स्फोट होऊन साऱ्या शहरावरच आगीचा वर्षाव होण्याची शक्यता होती.

आणीबाणीच्या वेळी कारखाना कसा बंद करायचा त्याची पद्धत ठरलेली असते. त्यानुसारच कारखाना बंद करणं आवश्यक होतं.

आणि सांगायची गोष्ट म्हणजे सुदैवानं एक शूर वीर तिथं हजर होता. तो स्वतः असिस्टंट शिफ्ट इनचार्ज होता. त्याचे सहकारी आणि वरिष्ठ प्लॅन्ट वाऱ्यावर सोडून कंट्रोल रूममधून पळून गेले. हा एकटा पळाला नाही. शांतपणे त्याने सगळी यंत्रे योग्य त्या क्रमाने बंद केली. प्लॅन्ट सुरक्षित स्थितीत आणला आणि मगच तो तिथून हालला.

कंट्रोलरूमच्या भल्यामोठ्या काचेच्या खिडक्यांतून त्याला भोवतालच्या अग्निवर्षाव दिसत होता. पेटलेल्या तेलाचे ओघळ गटारात जाऊन तिथे जळत होते. कुठल्याही क्षणी आगीचा भडका उडून सारा कारखाना भस्मसात होण्याची शक्यता होती. पण घाबरून न जाता, गांगरून न जाता तो आपलं काम करत राहिला.

आघाडीवर एकट्याने लढणाऱ्या सैनिकापेक्षा त्याचं शौर्य कणभरही कमी नव्हतं. केवळ त्याच्यामुळे एक भयंकर दुर्घटना होता होता टळली होती.

ह्या वीराला मी प्रत्यक्ष भेटलेलो आहे.

तर मग आकान्तमधील मध्यवर्ती व्यक्तिरेखा काल्पनिक आहे असं मला कसं म्हणता येईल?

'आकान्त' कादंबरीतल्या संघर्ष सत् आणि असत् ह्यातला ढोबळ संघर्ष नाही. मानवी चुकांमधून ही दुर्घटना घडली असती तरी त्यात कुणी खलनायक नाही. ह्या ना त्या कारणानं, कधी परिस्थितीला शरण जाऊन तर कधी आपल्या कृतीचे परिणाम काय होतील हे न कळल्यामुळे माणसं चुका करतात आणि त्यातून पुढचं सारं रामायण घडतं.

ह्या दुर्घटनेमागचा खलनायक कोणी असेल तर तो आहे औद्योगीकरणाच्या प्रचंड गतीमुळे निर्माण होणारा मानसिक ताण. ह्या खलनायकाचं खरंखुरं स्वरूप उघडं करणं हीच कादंबरीलेखनामागची प्रेरणा होती.

कादंबरीतल्या वातावरण निर्मितीसाठी मला फारसे परिश्रम घ्यावेच लागले नाहीत. ह्या वातावरणातच मी वावरत होतो. डोळे उघडे ठेवले की बस्स!

कादंबरीलेखनासाठी मुद्दाम प्रवास केला नाही. त्याची गरज वाटली नाही. या निमित्ताने वेगवेगळ्या वृत्तपत्रांतून, नियतकालिकांतून आलेली माहिती पुरेशी होती. आणि माझा उद्देश तपशील जमवणं हा मुळी नव्हताच. मला ह्या दुर्घटनेमागं असलेला 'माणूस' शोधायचा होता.

कादंबरीलेखनाचा आधार वास्तवाचे अवलोकन आणि आकलन हा असतो, असं नरहर कुरुंदकरांनी 'श्रीमान योगी'च्या प्रस्तावनेत म्हटलं आहे. ते मला शंभर टक्के पटतं. वास्तवाचं केवळ अवलोकन करून चांगल्या दर्जाचं साहित्य निर्माण होणार नाही हे उघड आहे. फार तर तो एक चांगला संदर्भग्रंथ होईल.

ह्या व्यवसायात वीसपंचवीस वर्षे काढल्यानंतर 'अपघात घडत नाहीत, घडवून आणले जातात' हे आकलन आपोआप होतं.

कादंबरी प्रकाशित झाल्यानंतर मला आलेली काही पत्रं परिस्थितीवर झगझगीत प्रकाश टाकतात. तीन निरनिराळ्या कारखान्यांतल्या वाचकांनी मला लिहिलं होतं, "तुम्हाला ही कादंबरी आमच्या कारखान्यात चाललेले गैरप्रकार, सुरक्षिततेच्या उपायांची पायमल्ली, घाणेरडे राजकारण ह्या सगळ्याबद्दल इतकी अचूक आणि 'आतली' बातमी कशी मिळाली?"

ह्यावर आणखी काही भाष्य करायची आवश्यकता आहे का? कादंबरीला लाभलेल्या समीक्षकांच्या प्रतिसादाबद्दल मी समाधानी आहे. महाराष्ट्र टाईम्स, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ललित, मराठवाडा अशा नियतकालिकांतून परिक्षणं आली होती. नागपूरच्या माग्रसने (माझा ग्रंथसंग्रह) हे पुस्तक चर्चेसाठी निवडले होते. आणखी काय हवं?

कादंबरीच्या हस्तलिखिताला ग्रंथालीचं पारितोषिक मिळाले होते. ग्रंथालीनेच पुढे ती प्रकाशित केली आणि गेल्या वर्षी दुसरी आवृत्तीही काढली.

समकालीन कादंबरी वाङ्मयात तिचं स्थान काय ह्या प्रश्नाचं उत्तर वाचकांनी द्यायचं आहे. शेवटी त्यांचा प्रतिसाद हाच खरा.

ह्या कादंबरीच्या प्रस्तावनेत मी म्हटलं आहे, "दुर्घटनेमागच्या कारणांचा शोध घ्यायचा एक सोपा मार्ग म्हणजे सगळा दोष उपकरणांच्या आणि यंत्रणेच्या माथी मारून मोकळं व्हायचं. पण ही उपकरणे कुणी बनवली होती? कुणी बसवली होती? यंत्रांची देखभाल करायची जबाबदारी कुणाची होती? हे सगळं करणारी माणसंच होती. यंत्रे नव्हेत. आणि आता कालच्याच वर्तमानपत्रात आलेली ही बातमी. 'उल्हासनगर येथे एका रसायनांच्या कारखान्यात स्फोट होऊन तीनजण ठार झाले. वायू वाहून नेणाऱ्या नळीवर बसवलेल्या दाबमापकात बिघाड झाल्यामुळे हा अपघात झाल्याचे समजते. घातपात किंवा व्यवस्थापनाची बेपर्वाई ह्यामुळे अपघात झाला असल्याची आरोप संबंधितांनी फेटाळून लावला व अपघातामागचे कारण 'तांत्रिक' असल्याचे सांगितले."

तुम्ही नाही वाचली ही बातमी?

हरकत नाही. उद्याच्या वर्तमानपत्रात पुन्हा येईल. उल्हासनगर ऐवजी पनवेल किंवा जळगाव असे गावाचे नाव असेल. पण मजकूर तोच!

---

(सुबोध जावडेकर, ५ भागीरथी प्रसाद, ९९ शिवाजी पार्क, दादर, मुंबई २८.)

(सुबोध जावडेकर जन्मतारीख १६/९/१९४८. हम्प्रेज अँड ग्लासगो ह्या केमिकल कन्सल्टिंग कंपनीत नोकरी. आय.आय.टी. मधून बी. टेक उत्तीर्ण.)

**प्रकाशित पुस्तके** - चिंतामणी हा नव्या युगाचा, आकान्त, गुगली, विज्ञानाच्या नव्या वाटा, विज्ञानाची नवी क्षितिजे, प्लॅस्टिक फीस्ट (इंग्रजी व हिंदी), वामनाचे चवथे पाऊल.

अनेक कथांचे इंग्रजी, हिंदी, बंगाली, उर्दू भाषेत अनुवाद पुरस्कार-ग्रंथाली पुरस्कार (आकान्त), राज्यपुरस्कार (गुगली)

---

जनार्दन ओक

# विजयनगर

खरं म्हटलं तर 'सेनापती' ही कादंबरी लिहून झाल्यावर ठरलेल्या योजनेप्रमाणे विक्रमादित्य (चंद्रगुप्त - गुप्त घराण्यातील) किंवा हुणांतक यशोधर्म यांच्यावर लिहिण्याचा मी संकल्प सोडला होता. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या सहा सोनेरी पानांतील पहिली दोन सुवर्णपाने (चंद्रगुप्त मौर्य आणि पुष्यमित्र शुंग' लिहून झाली होती. चंद्रगुप्त 'नरकेसरी' या नावाने प्रसिद्धही बनला होता. भाषेच्या वेगळ्या बाजानुळे त्याला चांगला प्रतिसादही मिळाला होता. त्यामुळे तिसरे सोनेरी पान विक्रमादित्य हे या क्रमाने येणे स्वाभाविकही होते. त्या दृष्टीने संशोधनास सुरवातही झाली होती.

पण मनुष्य ठरवित असतो एक आणि घडतं वेगळं हेच खरं.

कारण तसं नसतं तर मनोरमा प्रकाशनाचे श्री. अनिल फडके यांनी विजयनगरवर लिहिण्याचा प्रस्ताव अगदी अचानक माझ्यासमोर कशाला ठेवला असता?

लहानपणापासूनच इतिहास हा माझा आवडता विषय आहे. विजयनगरच्या साम्राज्याविषयी शालेय कालापासुन कुतूहल आणि अभिमानही होता. त्यामुळे मी त्यांचा प्रस्ताव लगेच स्वीकारला. तो प्रस्ताव मी स्वीकारला हे खरे पण तो तडीस कसा न्यावयाचा हा प्रश्नच होता. इतर अनेकांप्रमाणेच हरिहर आणि बुक्क आणि त्यांनी स्थापन केलेल्या साम्राज्याविषयी मला फारच त्रोटक माहिती होती. आणि कादंबरीची रचना करण्याकरिता ती पुरेशी नव्हती. त्यामुळे विजयनगर हे नकळत आव्हान बनले.

माझी अशी परिस्थिती असतानाच अनिल फडके यांनी 'ए फरगॉटन एम्पायर' नावाचा सुअेल या इंग्रजी इतिहासकाराने लिहिलेला आणि श्री. माधवराव लेले यांनी मराठीत अनुवादित केलेला 'एक नष्टस्मृती साम्राज्य - विजयनगर' हा दुर्मिळ ग्रंथ मला उपलब्ध करून दिला. या ग्रंथाचे समग्र वाचन केल्यावर विजयनगर साम्राज्याविषयी बरीचशी माहिती माझ्या हाती आली. अर्थात तेवढ्यावरून कादंबरी लिहिणं अशक्य होतं. या दरम्यान मी विजयनगरविषयी बऱ्याच मित्रांशी बोललो होतो. डोंबिवलीचे माझे एक ग्रंथप्रेमी मित्र शरद जोशी यांनी विजयनगरच्या संबंधातील एक संदर्भ यादीच मला पाठवून दिली. हे संदर्भ ग्रंथ वेगवेगळ्या ठिकाणांहून मिळवून मी वाचून काढले. या बाबतीत माझा धाकटा भाऊ एकनाथ यानेही बरीच मदत केली. एकत्रित झालेल्या माहितीवरून संपूर्ण

विजयनगर साम्राज्यावर एकच कादंबरी लिहिणे अशक्य आहे हे ध्यानी आले. तेव्हा तीन खंडात हा प्रदीर्घ काळ चित्रित करावयाचे मी ठरविले.

अर्थात पहिला खंड विजयनगरची स्थापना हा होता. यात बुक्काच्या मृत्यूपर्यंतचे चित्रण असणार होते. मात्र लिहिताना कादंबरीतील मध्यवर्ती व्यक्तिरेखा असलेल्या हरिहर आणि बुक्क यांनाच केंद्रीभूत न ठेवता त्या कालातील संपूर्ण राजकीय परिस्थितीचा आलेख वाचकांसमोर मांडण्याचे ठरविले. कारण त्याशिवाय विजयनगरच्या साम्राज्यस्थापनेची अवघड कामगिरी या बंधूंनी कशी पार पाडली, हे कार्य किती अवघड होते, त्यासाठी त्यांना कुठल्या प्रसंगातून जावे लागले हे वाचकांच्या मनावर ठसणार नव्हतं. ते आवश्यक होतं. कारण एखाद्या कार्याचे महत्त्व ते कुठल्या परिस्थितीत साध्य झालं यावरही अवलंबून असतं.

संपूर्ण उत्तरदक्षिण भारत मुसलमानांनी व्यापलेला असताना एका स्वतंत्र, सार्वभौम अशः हिंदु साम्राज्याची स्थापना करण्याची कल्पनाही त्या काळात वेडेपणाची ठरणार होती. एखादा निश्चयी, विशिष्ट ध्येयाने प्रेरित झालेला निःस्वार्थी शूर पुरुषच ते कार्य करू शकणार होता. कारण दक्षिणेत त्या काळात देवगिरी, द्वार समुद्र, वरंगळ, महुदा येथे स्वतंत्र अशा हिंदु राजवटी होत्या. परंतु त्यांच्या आपापसात लढाया होत होत्या. परस्परांविषयीच्या वैरभावनेने ते परस्परांचे शत्रू बनले होते. मलिक्काफरच्या स्वाऱ्यांनी देवगिरी आणि महुदा ही राज्ये नष्ट झाली तरी द्वारसमुद्र आणि वरंगळचे राज्य कसेबसे तग धरून होते. देवगिरी नष्ट झाल्यावर देवगिरीच्या दक्षिण हद्दीवर लहान लहान राज्ये निर्माण झाली होती. त्यातील ही समरदुर्गचा राजा कपिलदेव हा विशेष महत्त्वाकांक्षी होता. राज्यविस्तार करण्यास उत्सुक होता. द्वार समुद्राचे राज्य बलाढ्य होते. तेथील तिसरा वीरबल्लाळ हा अतिशय पराक्रमी होता. कधी मुसलमानांशी लढून तर कधी तह करून त्याने आपले राज्य अबाधित राखले होते. होयसाळ किंवा कपिलदेव हे शूर आणि महत्त्वाकांक्षी असले तरी विशाल दृष्टीचे नव्हते. मुसलमानी आक्रमणाची तलवार सतत डोक्यावर टांगती असताना आणि म्लेंच्छलोक येथील संस्कृतीचा विध्वंस करीत असतानाही ते आपापसांतले वैर जोपासीत राहिले होते.

हरिहर आणि बुक्क यांनी सत्तारूढ झाल्यावर तोच दृष्टिकोन ठेवला असता तर तेही इतरांप्रमाणेच सामान्य राजे ठरले असते. पण त्यांचा दृष्टिकोन तसा नव्हता. पुरातन हिंदू धर्म आणि संस्कृती यांचे रक्षण करण्याकरिता ते कटिबद्ध होते.

आक्रमण करण्याच्या हेतूने हिंदुस्थानात आलेल्या म्लेंच्छांना केवळ भूभागाचीच हाव नव्हती तर येथील पुरातन संस्कृती नष्ट करून संपूर्ण हिंदुस्थान म्लेंच्छमय करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. आणि म्हणूनच हाती सापडलेल्या हिंदूंना ते बलात्काराने वागवित होते. सक्तीने धर्म बदलावयास भाग पाडीत होते. पुरातन हिंदू संस्कृतीचा नाश करीत होते. हिंदू स्त्रियांना भ्रष्ट करीत होते. ही स्थिती भयावह होती. याच्या विरोधात कुणीतरी उभे रहावयास हवे होते. पण आंतरिक तळमळ असल्याशिवाय अशी महान ध्येये साध्य होत नाहीत. हरिहर आणि बुक्क यांच्यात ती तळमळ होती. सामान्य सैनिक असल्यापासून त्यांच्या विचाराची ती धारणा होती. त्यामुळे हा संघर्ष दोन धर्मातील होता. दोन संस्कृतींमधील होता. दोन जातींमधील नव्हता. एक सर्वंकष विनाश करणारी संस्कृती होती. तर दुसरी उदारमतवादी, सर्वांना सामावून घेणारी संस्कृती होती.

सत् आणि असत् यांतील हा लढा होता. सत्पक्षाचा लढा लढणारा सेनानी निःस्पृह, निःस्वार्थी,

शूर आणि दूरदर्शी, सर्वांना आदर वाटावा अशा वर्तनाचा असावा लागतो. हरिहर आणि बुक्क नेमके तसेच होते. छत्रपती शिवरायांसारखे श्रीमान योगी होते. त्यामुळेच या लढ्याला धार चढली होती. हा संघर्ष मला विशेष आव्हान देणारा वाटत होता.

स्वतःला प्रजेचा स्वामी न समजता प्रजेचा सेवक समजणारे, सर्वांना समान न्याय देणारे, धर्मातील उच्चनीचतेचा तिरस्कार करणारे, जातपंथविरहित समर्थ राज्य उभारू इच्छिणारे हरिहर आणि बुक्क माझ्या दृष्टीने आदर्श सत्ताधीश होते. आणि त्यामुळेच आजच्या काळात मार्गदर्शक ठरू शकणारे त्या काळातील संदर्भ माझ्या प्रकृतीला मानवणारे होते. भावणारे होते.

कारण -

आज आपल्या देशाची सामाजिक आणि राजकीय परिस्थिती विलक्षण चिंताजनक झाली आहे. स्वार्थाचा सर्वत्र वुजबुजाट माजला आहे. आपल्या वागणुकीने जनतेसमोर आदर्श निर्माण करावयाचा ते पुढारी स्वार्थाच्या आधीन होऊन अनुचित असे वर्तन करीत आहेत. आपण जनतेचे सेवक नसून जनता आपली दास आहे असे ते मानत आहेत. यथा राजा तथा प्रजा या न्यायाने प्रजाही त्यांचे अनुकरण करीत आहे. हिंदूंमधील विविध जातीजमातींतील वाद विकोपाला जाऊन दुसऱ्या जातीचा द्वेष करीत आहे. आपण एकाच संस्कृतीशी बांधलेले आहोत ही भावनाच नष्ट होऊ लागली आहे. काळानुसार जातिभेद नष्ट होऊन एकसंध हिंदू समाज निर्माण होण्याऐवजी जातीजातीतील दरी अधिक रुंद होत आहे. देशभक्तीची भावना लुप्त होऊ लागली आहे. ज्यांनी देश उभारायचा, वैभवाला न्यावयाचा त्या तरुणांपुढे आदर्श उरलेला नाही. ते दिशाहीन झाले आहेत. ही अशी भयानक परिस्थिती अनुभवास येत असल्यामुळे हरिहर आणि बुक्क यांची आदर्श प्रतिमा नजरेसमोर ठळक झाली. त्यांचे देशप्रेम, संपूर्ण हिंदूसमाजास एकत्र करण्याची तळमळ, न्यायप्रियता, राजा हा प्रजेचा स्वामी नसून तिचा दास आहे ही धारणा व त्यानुसार होणारे वर्तन, हिंदूंमधील विविध जातींतील विषमतेचे त्यांना होणारे दुःख माझ्या मनाला भावले. सांप्रतच्या दिशाहीन अवस्थेत त्यांचे चरित्र व कार्य उद्बोधक ठरेल, मार्गदर्शक ठरेल अशी मनाची धारणा झाली आणि विजयनगरच्या भव्य साम्राज्याच्या घडणीचा समग्र इतिहास कादंबरीरूपाने मांडण्याचा माझा निश्चय झाला. आपल्या पूर्वजांच्या भव्यदिव्य कृत्यांचा फाजील अभिमान बाळगू नये हे खरं असलं तरी त्यांच्या कृत्यांचे, चरित्राचे सतत स्मरण असावयास हवं. कारण इतिहास हा मार्गदर्शक गुरू आहे. दीपस्तंभ आहे.

मनात ही लिखाणाची दिशा निश्चित झाल्यावर आजच्या सामाजिक आणि राजकीय परिस्थितीत उद्बोधक ठरतील अशा तत्त्वांचा पुरस्कार अधिक ठसठशीतपणे करणे आवश्यक होतं. कारण ते एक तर सामाजिक कर्तव्य होतं.

मनात कादंबरीचा आकृतिबंध तयार झाला. तीन महिन्यांच्या अथक प्रयत्नाने सारे संदर्भ हाती आले होते. नोंदी तयार होत्या. तरीही मन साशंक होतं.

हे शिवधनुष्य आपल्याला कसं पेलवणार? आपल्या हातून हा भव्य इतिहास योग्य प्रकारे कसा शब्दरूप होणार?

कुठल्याही कादंबरीची सुरवात मला नेहमीच त्रास देते. विजयनगरबावतीतही तोच अनुभव आला. सुरवात कुठून आणि कशी करावी? सतत चार दिवस हा प्रश्न मनाला छळत होता. शेवटी अल्लाउद्दीन खिलजीच्या दक्षिणेवरील स्वारीने सुरवात करावी असा विचार निश्चित झाला आणि

लिहिण्यास सुरवात केली. सुरवातीची तीन चार पाने फाडली गेली. आणि मग मनाचे समाधान झाले. सुरवातीची पाने माझ्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे माझे वाचकमित्र आणि माझा भाऊ यांना वाचून दाखविली. या सुरवातीच्या पानांचा त्यांच्या मनावर विलक्षण प्रभाव पडला आहे असे मला जाणवले, आणि माझा उत्साह दुणावला. झपाटल्यासारखा मी लिहू लागलो.

लिखाणाचे ते दोन महिने अक्षरशः झपाटलेले होते. उठता बसता विजयनगरशिवाय मला काही सुचत नव्हतं. कादंबरीचा विषय विजयनगरच्या साम्राज्य स्थापनेपर्यंतच मर्यादित ठेवला होता. तरीही लिखाणाचा पट विशाल होता. तत्कालीन हिंदू राजे, त्यांचे आपापसांतील वैर, त्यांची राज्यतृष्णा, त्यांच्यातील लढाया आणि पार्श्वभूमीवर एकच एक हिंदुराष्ट्र उभारण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारे हरिहर आणि बुक्क यांचा आदर्शवाद उतरवणे सोपे नव्हते. ती एक कसोटीच होती.

दोन महिन्यांत कादंबरी पूर्ण झाली. प्रकाशक अनिल फडके यांनी त्यांच्याकडे असलेली माझी आधीची कादंबरी 'सेनापती' दूर सारून 'विजयनगर' आधी प्रसिद्ध केली. चित्रकार प्रभाकर पाटील यांनी केलेले मुखपृष्ठही सुरेख होते. एकंदरीत लिखाणापासून पुस्तक तयार होईपर्यंत सर्वच मेळ सुरेख जमला होता. वाचकांचा उत्कट प्रतिसाद लाभल्याने सहा महिन्यांतच पहिली आवृत्ती संपली. वाचकांनी पत्ररूपाने व प्रत्यक्ष भेटून प्रतिक्रिया व्यक्त केल्या आणि पत्रांचा पाऊस पाडला. ही गोष्ट कुठल्याही पारितोषिकापेक्षा मला अधिक महत्त्वाची वाटली. उत्साह वाढवणारी वाटली. वाचकांनी उत्कट प्रतिसाद दिला, ही कादंबरी अनेकांच्या वाचनात यावी असा आग्रह धरला, त्यामुळे कादंबरीची स्वस्त आवृत्ती काढावी असा विचार मनात डोकावू लागला. एका ट्रस्टने यासाठी काही आर्थिक मदत दिली. जाहिरात प्रसिद्ध होताच वाचकांनी मोठा प्रतिसाद दिला. लेखकाला यापेक्षा काय हवं असतं?

जनार्दन ओक, सी. २५, शुभचिंतन, दत्त आळी, टिळक चौक, कल्याण.

**प्रकाशित पुस्तके -**

रहस्यकथा - १) ब्रिलीयंट २) चक्रव्यूह ३) लालसा ४) माग ५) पाटलाग

हेरकथा - ६) हॅवॉक ७) अग्निदिव्य (द्वितीय आवृत्ती) ८) अेस्कार्ट (द्वितीय आवृत्ती) ९) दि एस्केप (द्वितीय आवृत्ती १०) क्रॉसफायर

गूढकथा - ११) अतर्क्य १२) शिल्पचेटूक (द्वितीय आवृत्ती) १३) अलेफियस १४) अनपेक्षित १५) अश्विनी १६) अमानवी

सामाजिक - १७) अहेतुक १८) डहुळलेलं चांदणं १९) मात २०) मिस मुंबई २१) आय कन्फेस २२) नाद पैंजणांचा २३) प्रेमवावरी २४) तोल

अनुवाद - २५) पदस्थ २६) मर्यादा २७) परिवर्तन २८) चंद्रकांता

विनोदी - २९) मुलाखत

ऐतिहासिक - ३०) नरकेसरी ३१) देवांगना ३२) रणमर्दिनी ३३) विजयनगर

पौराणिक - ३४) इंद्राणी ३५) लंकेश (द्वितीयावृत्ती) ३६) नैषधी

राजकीय - ३७) पब्लिक

संस्कृत नाटकांवर आधारित -३८) मालविका २९) वासवदत्ता ४०) कादंबरी

आगामी - नरकहृदंतदत्त, सेनापती, शककर्ता, सोमनाथ, मालती

आगामी संकल्पित - कैकयी, विजयनगर (उत्तरार्ध), समर्थ रामदास, पृथ्वीराज चौहान, विक्रमादित्य, यशोधर्म, उर्वशी, वसंतसेना, शकुंतला.

याशिवाय २४ रहस्यकथा (७५ ते ९० पानी) प्रकाशित

नाटक - दि ट्रॅप

प्रकाशित बोलपट - निष्पाप.

प्रभाकर दिघे

# नीरक्षीर

'नीरक्षीर' ही माझी कादंबरी १९९१ साली प्रकाशित झाली. त्या कादंबरीकडे समीक्षकांचे वा वृत्तपत्रांचे लक्षच गेले नाही. तरीपण पुस्तकांच्या बाजारात कादंबरी आली आणि दीड वर्षात गेलीसुद्धा प्रकाशकाच्या गुदामात. दोन चार प्रती उरल्या तेवढ्याच. याचं कारण बहुदा असं असावं की, कादंबरीच्या 'टायटल' पेजच्या शेजारच्या तिसऱ्या पृष्ठावर इसापच्या गोष्टीच्या शेवटी तात्पर्य दिलेले असते तसेच 'नीरक्षीर' चे तात्पर्य दिलेले आहे आहे. ते असेः

**स्वराज्याच्या वृक्षाला**
**सुंदर सुंदर फुलं**
**येतीलसं**
**वाटलं होतं ............**
**पण**
**ती कधी हाती**
**न लागणारी**
**आकाशफुलंच**
**ठरली!**
**नुसती**
**आकाशफुलंच!**

प्रत्येक माणूस जन्मतःच आपलं नशीब बरोबर घेऊन जगात येतो, त्या प्रमाणे प्रत्येक पुस्तक आपलं नशीब घेऊनच बाजारात जाऊन बसते. काही पुस्तकं नशीबवान ठरतात, तर काही बदनशीबी ठरतात हे आपण पाहतोच आहोत. बाजारात 'नीरक्षीर' पाह्यला मिळत नाही. तरी या कादंबरीची दुसरी आवृत्ती पंधरा वर्षानंतरही निघालेली नाही हे सुद्धा त्या कादंबचरीचे नशीबच.

पहिली आवृत्ती संपण्याची कारणमीमांसा मी वर दिली. कादंबरीच्या गुणावगुणांचा खपावर परिणाम होतोच. परंतु माझ्या एका प्रकाशकमित्राचं असं ठाम मत आहे की कादंबरीच्या गुणावगुणापेक्षा कादंबरीच्या मुखपृष्ठाचा खपावर अधिक परिणाम होतो. मुखपृष्ठ जर देखणे आणि



अनुक्रमणिका

असेल तर वाचकांच्या तिच्यावर उड्या पडतात. मग 'नीरक्षीर' चे मुखपृष्ठ, चित्रकार भाई नारकर यांनी सुंदर आणि समर्पक काढले आहे म्हणूनच तसे झाले असावे कदाचित.

या कादंबरीची क्राऊन साईजची पृष्ठे एकंदर २६२ आहेत आणि प्रकाशकाने तेव्हा अवघी २२ रुपये एवढी अल्प किंमत ठेवली होती. आज त्या कादंबरीचे मूल्य १०० रुपये सहज ठरले असते. पुस्तकाच्या किंमती कशा झपाट्याने वाढताहेत ते पहा.

'नीरक्षीर' मला अधिक महत्त्वाची वाटते आणि माझ्या सर्व कादंबऱ्यांत ती माझी आवडती कादंबरी आहे कारण माझ्या नि माझ्या जवळच्या माणसांच्या आयुष्यातील काही महत्त्वाच्या घटना त्या कथानकात नकळत गुंफल्या गेल्या आहेत. लोकमान्य टिळकांच्या युगाचा अंत झाला नि गांधीजींच्या युगाला प्रारंभ झाला तेव्हापासूनच्या महत्त्वाच्या घटना या कादंबरीच्या कथावस्तूत आहेत. आणि त्यांतील बऱ्याच घटनांचा मी साक्षीदार आहे. माझ्या विद्यार्थी दशेपासून माझ्या अवलोकनात आलेल्या व्यक्तींची स्वभावचित्रेही मी या कथानकात टाकलेली आहेत. शिक्षणासाठी वयाच्या सहाव्या वर्षापासून दहाव्या वर्षापर्यंत मी आजोळी राहिलो. माझ्या मामाचं घर ठाकुरद्वारच्या प्रख्यात कामथ चाळीत होतं. दि. १ ऑगस्ट १९२० रोजी सरदारगृहातून गिरगाव चौपाटीकडे जात असलेली, लोकमान्य टिळकांची अंत्ययात्रा माझ्या आजोबांनी मला मुद्दाम दाखवली होती. सहस्रावधी टिळकभक्तांची ती यात्रा भर पावसात शांतपणे चालली होती. लोकमान्यांचे दहन चौपाटीवर चंदनाच्या चितेत केले होते. ज्या पवित्र जागी दहन झालं तेथे शिल्पकार फडके यांनी घडवलेला लोकमान्यांचा पुतळा उभा रहाण्यापूर्वी त्या जागी एक सहा फूटाचा चौकोनी खड्डा खणला होता आणि त्या खड्ड्यात एक निस्सीम टिळकभक्त नित्य नेमाने एक महादेवाची वाळूची पिंडी बनवीत असे. बेलफुले वाहून भक्तिभावाने पूजा करीत असे हे दृश्य मराठी शाळेतून घरी आल्यावर सायंकाळी चौपाटीवर जाऊन, मी पाहिले आहे. अनेक वेळा त्या महादेवापुढे उभं राहून मी माझे हात जोडले आहेत.

१९२७ ते ३१ ही चार वर्षे इंग्रजी शिक्षण पुरं करण्यासाठी मी पुन्हा आजोळी, मामाकडे राहिलो होतो. मामाचं बिऱ्हाड त्यावेळी खेतवाडी बॅकरोडवरच्या सुप्रसिद्ध तुळसी बिल्डिंगमध्ये होते. खेतवाडी भागात मुख्यत: पारशी वस्ती होती. हिंदूची वस्ती कमी. विरळ. खेतवाडी बॅकरोड हा रस्ता तसा लांबरुंद. नळ बाजाराकडे एक घोडा लावलेल्या 'व्हिक्टोरिया' खूप धावत. तुळसी बिल्डिंगपासून थोड्या अंतरावर एक बंगला होता. 'ललितकलादर्श' चे बापूसाहेब पेंढारकर आपली मंडळी घेऊन मुंबईला आले की त्याच बंगल्यात मुक्काम करीत. थोर साहित्यिक व प्रख्यात नाटककार मामासाहेब वरेरकर हे त्या काळी तुळसी बिल्डिंगच्या दुसऱ्या माळ्यावर जिन्याजवळच्या टोकाच्या बिऱ्हाडात राह्यचे. त्यांची सुकन्या माई वरेरकर तेथेच राही. पुढे माईचा विवाह डॉ. चिटणीस यांच्याशी झाला नि त्या मिसेस माया चिटणीस बनल्या. नंतर मामांना खासदारकी मिळाली, मामा दिल्लीच्या बंगल्यात राहायला गेले. परंतु तुळसी बिल्डिंगमध्ये मामा राहात असताना बापूराव पेंढारकर त्यांच्याशी नव्या नाटकांबद्दल चर्चा करायला येत असत आणि चर्चा झाल्यावर दोघं बरोबरच घराबाहेर पडत. हे दृश्य बऱ्याच वेळा सुदैवानं माझ्या दृष्टीला पडले आहे.

कॉंग्रेसचे नेते ठराविक दिवशी स्वयंसेवकांची तुकडी घेऊन मिठाचा सत्याग्रह करण्यासाठी मुंबईच्या वडाळा मीठागरावर चालून जाऊ लागले. ब्रिटिश सरकार त्या अहिंसा पालन करणाऱ्या स्वयंसेवकांवर लाठ्याकाठ्यांचा हल्ला करणार, सत्याग्रहाला गेलेले स्वयंसेवक जबर जखमी होणार

हे अपेक्षितच होते. म्हणूनच त्या सुमारास खेतवाडी बॅकरोडवरच्या नाटक मंडळींच्या बंगल्याचे 'काँग्रेस हॉस्पिटल' मध्ये रूपांतर केले होते. त्या हॉस्पिटलमध्ये जखमी स्वयंसेवकांवर उपचार करायला अनेक डॉक्टर्स आणि परिचारिका स्वयंस्फूर्तीने पुढे आल्या. वॉर्ड बॉईज, आया नि मैत्रीणीचे काम करायला पुढे आलेल्यांची संख्या मोठीच होती. औषध व्यापाऱ्यांनी आवश्यक त्या औषधांचा देणगी म्हणून पुरवठा केला. धान्य आणि किराणा मालाच्या व्यापाऱ्यांनी त्यांच्या पावलावर पाऊल टाकले. हॉस्पिटलमध्ये डॉक्टर्स - नर्सेस व संबंधितांची गजबज असे. कशाची कमतरता नव्हती. साऱ्याची सुबत्ता होती. सर्वजण विनामोबदला काम करीत. त्यावेळी मामाच्या घरी राहून मी गिरगावच्या आर्यन शाळेच्या मॅट्रिकच्या वर्गात शिकत होतो.

वडाळा मीठागरावर मीठाचा सत्याग्रह सुरू झाला. सत्याग्रहींवर ब्रिटिश पोलिस अमानुष हल्ला करू लागले. कोणाची डोकी नारळासारखी कचाकच फुटली. कुणाचे हातपाय जायबंदी झाले. कुणाच्या पोटावर तर कुणाच्या छातीवर लाठ्यांचे जबर दणके बसले. वडाळ्याच्या मीठागराला युद्धभूमीचे स्वरूप आले. इथे तिथे अनेक स्वयंसेवक बेशुद्ध पडले होते.

काँग्रेसच्या ॲम्ब्युलन्स घण घण घण अशी घंटा जोराने बडवीत, वडाळ्यावरून खेतवाडीतल्या काँग्रेस हॉस्पिटलकडे धावत सुटल्या. काँग्रेस ॲम्ब्युलन्स जखमी स्वयंसेवकांना घेऊन आल्याचे कळताच माझा अभ्यास टाकून, मी काँग्रेस हॉस्पिटलच्या दारात जाऊन ॲम्ब्युलन्समधून स्ट्रेचरवर जखमींना बाहेर काढताना पाहू लागलो. लाठीमाराने एकेकाची भयानक अवस्था केली होती.

समाजातील सर्वच स्तरातील लोक स्वयंसेवक दलात सामील झाले होते. उच्चनीच लहानमोठा असा तेथे भेदभाव नव्हता. मला त्यांचे कौतुक वाटले. काँग्रेस हॉस्पिटलकडे अभ्यास टाकून माझ्या फेऱ्या होत राहिल्या ही गोष्ट व्हरांड्यात लाकडी चरखा बनवीत बसलेल्या दादा आजोबांच्या ध्यानात आली आणि ते मला म्हणाले, 'भाई, मॅट्रिकला आहेस. पहिल्याने तुझ्या अभ्यासाकडे लक्ष दे. उंदराच्या पोरांनी लोखंडाशी खेळ करायचे नसतात." मी अस्वस्थ होतो. इकडे मुंबईत ही अशी परिस्थिती तर उत्तरेत लाहोर कटाचा खटला चालू होता. बऱ्याच सशस्त्र क्रांतिकारकांना अटक करून कारागृहात कोंबले होते. कारागृहात राजकीय बंद्यांना अयोग्य वागणूक दिली जात होती म्हणून क्रांतिकारक जतीनदासने 'आमरण उपोषणा'चा निर्णय घेतला होता. लाहोर कटाच्या खटल्यात ब्रिटिश सरकारने सरदार भगतसिंह, सुखदेव आणि पुण्याचे शिवराम राजगुरु यांना मुख्य आरोपी केले होते. त्या खटल्याच्या बातम्या रोज वृत्तपत्रात छापून यायच्या. मामाकडे येणारे वृत्तपत्र मी बारकाईने वाचीत असे. देशासाठी बलिदान करायला निघालेल्या जवान क्रांतिकारकांचे मला अपार कौतुक! आपल्याला त्यांच्यात सामील होता येणे शक्य नाही याचे मला दुःख होई

ह्या स्वातंत्र्याच्या लढ्याची अशा रीतीने ओळख झालेली. या घटनांचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला.

आणि याच सुमारास माझ्या आयुष्यात एक विलक्षण घटना घडली. आत्माराम रावजी भट हे पुण्याचे पंडित. अर्थशास्त्राचा त्यांचा गाढा अभ्यास. पुण्याच्या 'केसरी' चे मुंबई प्रतिनिधी म्हणून ते काम पाहायचे. त्यांचे ऑफिस धोबीतलावच्या सरदारगृहाच्या पहिल्या माळ्यावर होते. मुंबईतील माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांची एक लढाऊ संघटना बांधायचा त्यांचा प्रयत्न होता. प्रत्येक शाळेचे दोन दोन प्रतिनिधी त्या संघटनेच्या कार्यकारिणीवर घेतले होते. माझा मित्र खातू आणि मी असे आम्ही

गिरगावच्या आर्यन शाळेचे प्रतिनिधी. त्यामुळे आमच्या भटसाहेबांशी भेटी होत. गजानन खातू हा हुशार. तो पाचवीत. मी इंग्रजी सातवीत. तरीपण तो माझा मित्र होता. त्याचं वैशिष्ट्य म्हणजे तो माझ्याप्रमाणेच त्याच्या मामाकडे शिक्षणासाठी राहिला होता. त्याच्या मामाची नळबाजारात विडीतंबाखूची गादी होती. शाळेतून घरी गेल्यावर, विडी, काडी, तंबाखू विकायला गादीवर बसावे लागे. विद्यार्थीदशेत असूनही मोठा देशाभिमानी. शाळेत नेहमी तो डोक्यावर खादी टोपी घालून येई. अंगात खादीचा कोट, खादीचा शर्ट, खादीचे धोतर असा त्याचा पोषाख. पाचवीत असतानाच तो हस्तलिखित मासिक काढीत असे. सारं मासिक स्वतःच्या हाताने, लाल शाईत लिहून काढी. त्याच्या त्या मासिकाला त्यानं नाव दिलं होतं 'अंगार'. त्याच्या मासिकात कथा, कविता शोधूनही सापडल्या नसत्या. पण खुदीराम बोस, प्रफुल्लचंद्र चक्रवर्ती, चंद्रशेखर आझाद, सरदार भगतसिंह आदी क्रांतिवीरांच्या कार्याची माहिती असे. गोऱ्या अधिकाऱ्यांना ठार मारायचे जे प्रयत्न केले गेले त्याची तपशीलवार माहिती असे. त्या काळात ही माहिती तो कोठून मिळवीत असे ते मात्र त्याने कधी कुणाला सांगितले नव्हते. तो नेहमी मला भेटायला येत असे. आमचं दोघांचं काहीतरी खलबत चालू आहे असंच इतरांना वाटू लागले. आम्ही एका सायंकाळी भटसाहेबांना भेटायला, त्यांच्या सरदारगृहातील ऑफिसात गेलो असताना त्यांनी आम्हाला आश्चर्याचा धक्काच दिला. आम्ही दोघं त्यांच्या टेबलापुढे खुर्च्यांवर बसलो होतो. आम्हाला पहाताच त्यांनी टेबलाच्या हाताचा खण उघडला. ते म्हणाले, 'दिघे, तुम्ही दोघं 'भगतसिंग क्लब' काढायच्या विचारात आहात हे मला एका कर्णपिशाच्याने सांगितलं आहे. तेव्हा तुमच्या त्या क्लबला खूपच उपयोगी पडेल असे एक महत्त्वाचे पुस्तक मी तुम्हाला देतो, ते नीट वाचा आणि आपलं काम करताना इतरांच्या हातून ज्या चुका झाल्या त्या होणार नाहीत याची खबरदारी घ्या.' खणातून बाहेर काढलेले पुस्तक त्यांनी माझ्या हातात दिले. आम्ही दोघं त्यांनी दिलेलं पुस्तक चाळू लागलो. राणीचं राज्य सुरू झाल्यापासून ब्रिटिश अधिकाऱ्यांवर गोळ्या झाडून त्यांना ठार मारण्याचे जे प्रयत्न झाले त्या प्रयत्नांचा तो तपशीलवार अहवाल होता. हा अहवाल तयार करण्यासाठी ब्रिटिश सरकारने एक कमिशन नेमले होते.

ह्या साऱ्या घटनांचा माझ्या मनावर खोल परिणाम झाला.

माझ्या घरची परिस्थिती अतिशय विकट. मला दोन बहिणी, एक भाऊ. उत्पन्न अगदीच बेताचं. म्हणूनच महिना आठ रुपये भाड्याच्या दोन खोल्यांत आईवडील नि भावंडं राहायचीं. मॅट्रिक झाल्यावर नोकरी धरणं अत्यावश्यक होतं. कुटुंबाचा चरितार्थ नीट चालायला हवा होता. देशसेवेचा विचार डोक्यातून काढून मिळाली तर सरकारी नोकरी धरायला हवी होती. सुदैवाने आईच्या एका आतेभावाच्या वशिल्याने बॉम्बे टेलिफोन कंपनीत मला नोकरी मिळाली. त्या काळी टेलिफोन कंपनी खाजगी होती. सरकारने ती खाजगी कंपनी आपल्या हातात घेतली नव्हती. कंपनीचे अधिकारी गोरे साहेब त्या मंदीच्या काळात कारकुनी करणाऱ्याला मासिक तीस-चाळीस रुपये पगार देत. पण सुदैवाने सत्तर रुपयाची नोकरी मिळाल्यामुळे मला खूप आनंद झाला. नोकरी मिळाल्यावर मामाच्या घरून दादरला आईवडिलांबरोबर त्या चाळीत राहू लागलो. आवश्यक तेवढे माझ्या पगारातील दहावीस रुपये जवळ ठेवून बाकीचे घरातल्या खर्चाला वडिलांना देऊ लागलो. आमची खालावलेली आर्थिक स्थिती थोडीशी सुधारली. भावंडांचे शिक्षण कुणाच्या घरी तुकडे न मोडता, स्वाभिमानाने घरच्या घरी होऊ लागले. लेखनाची मला हौस आणि छंद. तेव्हा लेखन करणारे आजच्या इतके उदंड झाले

नव्हते . मी सटरफटर किडुकमिडुक लिहू लागलो . ते माझे लेखन नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊ लागले .

त्यावेळी लघुकथा हा प्रकार मराठी साहित्यात फोफावला होता . माझ्य बऱ्याच लघुकथा प्रसिद्ध झाल्यावर दोन लघुकथासंग्रहही प्रसिद्ध झाले .

पुढे खाजगी टेलिफोन कंपन्यांची लायसन्सची मुदत संपली आणि आमची कंपनी सरकारने आपल्या ताब्यात घेतली . कंपनीचे नोकर हे सरकारी नोकर बनले . मला बढती मिळत गेली . मोठे पद , कामाची मोठी जबाबदारीही शिरावर पडली . लेखनाला फुरसत मिळेनाशी झाली . लेखन बंद पडले . इमानेइतबारे नोकरी करीत राहिलो . तीसपसतीस वर्षे गेली आणि एक सुयोग जुळून आला . सेनापती बापट यांची आत्मकथा त्यांच्याच तोंडून ऐकायला मिळाली . ती मी लिहून काढली . त्यांची आत्मकथा अर्धीच आहे . पण ते पुस्तक माझे मुलुंडचे मित्र नाथा ताम्हणे वकील यांनी स्वखचनि प्रकाशित केले .

सरकारी नोकरीची अखेर जवळ आली असताना माझ्यावर गैरव्यवहाराचे , हलगर्जीपणाचे बालंट आले . दिल्लीचे वरिष्ठ सरकारी चौकशीला मुंबईला आले . तपासणी , उलटतपासणी होत राहिली .

ह्या चौकशीचा शेवट काय होणार ? माझ्यावरचा आरोप खरा ठरणार काय ? माझ्यावर आलेलं बालंट - हे गंडांतर यातून मी दोषमुक्त ठरून माझी सुटका होणार ना ? मी दोषी तर ठरणार नाही ना ? रात्रंदिवस चिंता . घरी असलो की हाच एक विचार . ऑफिसात काम करतानाही तोच विचार .

ही चिंता कशी दूर करायची ? निष्काळजी कसं व्हायचं ? डोक्यातला तो विचार कसा दूर करायचा ? याबद्दल माझे मंथन सुरू झाले . आणि उपाय सुचला . कादंबरीचं एक कथानक मला सुचलं आणि लेखनाला सुरवात केली . झपाट्याने लेखन करीत राहिलो . कथानक एका सत्य घटनेवर आधारलेलं होतं . एक कादंबरी लिहून पूर्ण केली . पुन्हा स्तब्ध बसलो की आरोपाच्या चौकशीचा विचार . लेखनात मन गुंतविल्यावर मन जरा शांत होई . याचवेळी एका प्रख्यात इंग्रजी कादंबरीकाराची कादंबरी माझ्या वाचनात आली . कथानक मला आवडलं . त्याचा आधार घेऊन मी दुसरी कादंबरी लिहून पुरी केली . एक कादंबरी , नोकरीतून निवृत्त होण्याच्या दीड महिना अगोदर प्रसिद्ध झाली . सरकारी कचेरीतील चौकशीचा घोळ चालूच . निवृत्त झालो तरीसुद्धा त्या चौकशीला मला तोंड द्यावं लागत होते . काही गुंतागुंतीच्या घटना घडल्या . ती केस शेवटी कोर्टात दाखल झाली . ज्या स्टोअरकीपरला सरकारने नोकरीतून निवृत्त केले होते त्यानंच सरकारविरुद्ध कोर्टात फिर्याद दाखल केली . त्याच्यावरचा गैरहिशोबाचा आरोप साफ खोटा आहे अशीच त्यानं आपली बाजू मांडली . कोर्टानं त्याची बाजू मांडायला त्याला एक गाजलेला तरुण नि हुशार वकील दिला होता . एका महत्त्वाच्या मुद्यावर त्यानं कोर्टापुढे बिनतोड युक्तिवाद केला . सरकारची बाजू लंगडी पडली . गैरहिशोबाचा आरोप कोर्टानं खोटा ठरविला आणि त्याच्यावर व आमच्यावर आलेलं बालंट दूर झाले . आमची निर्दोष म्हणून मुक्तता झाली . १९७३ साली मी नोकरीतून निवृत्त झालो आणि १९७४ साली त्या मोठ्या आपत्तीतून सुटका झाली . कारण 'दोषी' ठरलो असतो तर निवृत्ती वेतन मिळण्याचीही पंचाईत .

त्यानंतर योगायोगाने माझी दोन प्रकाशकांशी गाठ पडली . स्वतंत्रपणे मी लिहिलेले लिखाण त्यांना नको होते . पुस्तक बाजाराची त्यांना चांगली ओळख . वाचकांना कोणत्या विषयावरची पुस्तकं हवी असतात , कोणत्या पुस्तकांची वाचकांकडून मागणी असते याची दोघांनाही चांगली जाण . मी निवृत्त झालो होतो . लेखन-वाचन याचा मला ध्यास . रिकामा वेळ भरपूर . दोघां प्रकाशकांनी सांगितलेली

पुस्तकं लिहून त्यांना देऊ लागलो. मानधन मिळू लागलं. परंतु लेखनाच्या बाबतीत मी समाधानी नव्हतो. कारण माझ्या मनाप्रमाणे मला स्वतंत्र लेखन माझ्याकडून झाले नव्हते. प्रकाशकांना हवी असलेली पुस्तकं लिहिण्यात निवृत्तीनंतरची पाचसहा वर्षे निघून गेली.

अधूनमधून विद्यार्थी दशेतले ते दिवस आठवत होते. अठरा वर्षाचा असताना मुंबई शहरात जनतेनं केलेला तो उठाव मी प्रत्यक्ष पाहिला होता. मुंबईतील मणीभुवनजवळ गांधीजींची सार्वजनिक प्रार्थना होई. लोक खूप गर्दी करीत. त्या प्रार्थनेला मी मुद्दाम जाऊन बसलो होतो. मुंबईतील गांधीजींच्या प्रचंड जनसमुदायाच्या विराट सभा मी पाहिल्या होत्या. वडाळा मीठागरावर स्वयंसेवकांनी केलेला अमानुष लाठीमार स्वतःला सांभाळून मी दुरून पाहिला होता. धोबीतलावाच्या मैदानावर सार्वजनिक सभा घ्यायला सरकारने मनाई केली होती. परंतु तो मनाई हुकूम मोडून हातात तिरंगी झेंडा घेऊन सभेला जाणाऱ्या महिलांवर सरकारने निर्दयपणे घोडेस्वार घातलेले आणि महिलांना रक्तबंबाळ केलेले जवळच्या इमारतीत उभे राहून डोळ्यांनी पाहिले होते. देशासाठी परदेशी कापडाचे गठ्ठे भरलेल्या लॉरीखाली बलिदान करणारा अशिक्षित बाबू गेनू पाहिला होता. छातीवर बंदुकीच्या गोळ्या झेलणाऱ्या कोवळ्या मुलांच्या शौर्याच्या कहाण्या वाचल्या होत्या. ह्या साऱ्या घटनांच्या आठवणी माझ्या मनात घर करून राहिल्या होत्या. स्वातंत्र्यपूर्व काळातले दिव्य-भव्य आणि उदात्त चित्र!

पण १९४७ साली देश स्वतंत्र झाला आणि ३० जानेवारी १९४८ रोजी देशाची राजधानी दिल्ली येथे प्रार्थनास्थळी महात्मा गांधींवर गोळ्या झाडून त्यांची हत्या केली गेली. 'हे राम' म्हणत त्यांची प्राणज्योत मावळली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरची ही पहिली अशुभ घटना. पं. नेहरू देशाचे पंतप्रधान तर सरदार वल्लभभाई पटेल गृहमंत्री. पहिले काही दिवस ठीक गेले. परंतु नंतर हळूहळू समाज बदलला. माणसं बदलली. गुन्हेगारी फोफावली. भ्रष्टाचार बोकाळला. लाचलुचपतीला ऊत आला. काळा बाजार फोफावला. राजकारणाचे स्वरूप पार बदलले. खूनमारामाऱ्यासारखे भयानक गुन्हे करणारे अट्टल गुन्हेगार हे सत्ताधीश बनले. मंत्र्यांच्या खुर्चीत राजरोस जाऊन बसले. पैशासाठी, स्वार्थ साधण्यासाठी सत्ताधारी नीतीपासून कोसभर दूर गेले. हे सत्र असेच चालू आहे.

ह्या साऱ्या घटनांचा परिपाक म्हणजेच 'नीरक्षीर' ही छोटी कादंबरी.

ह्या कादंबरीचा कधी सन्मान झाला नाही. तिला एकही पारितोषिक मिळाले नाही. पण ही कादंबरी म्हणजे देशाच्या स्वातंत्र्य लढ्याचा अल्पसा इतिहास अशी माझी भाबडी कल्पना आहे. कुणा तज्ज्ञाला ~~'नीरक्षीर' वाचायची इच्छा झाली तर मला आनंद होईल हीच माझी अपेक्षा!~~

(प्रभाकर दिघे, १/३ जीवनग्राम, ठाणे कळवा महामार्ग, ठाणे ४०० ६०५)

---

जन्म - ५ जून १९१३ मॅट्रिक उत्तीर्ण झाल्यावर १९३३ पासून बॉंबे टेलिफोनमध्ये कारकुनाची नोकरी. पुढे अर्थशास्त्र घेऊन बी. ए. पहिला कथासंग्रह १९३६ साली प्रसिद्ध. १९७३ नोकरीतून निवृत्त. त्यानंतर सुमारे सव्वाशे पुस्तके प्रसिद्ध झाली.

काही कादंबऱ्या - तिमिर, सरस्वती, नीरक्षीर, संन्यासी, ज्वाला, धुंदी, फुले, सुल्तान, फुलनदेवी, कमांडर, बेधडक, इंद्राणी, स्वीकार, धवलगिरी, छंदी, क्षमा, चरस, इ.इ.

प्रा. व. बा. बोधे

# मुरळी

'जागरण' हा लोकसंस्कृतीतील माझा आवडता प्रकार. बालपणी गावात होणाऱ्या जागरणांना मी हजेरी लावत असे. लिबाच्या डहाळ्यांचा मांडव घालण्यापासून ते वाघ्यामुरळीला जेवायला वाढेपर्यंत सर्व प्रकारची कामे मी केलेली आहेत. रुमालाला बांधलेली घंटी झुलवित कोटम्यातला भंडारा उधळणारी मुरळी आणि कमरेत वाकून डिंबडी बडविणारा वाघ्या माझ्या मनात वर्षानुवर्षे घर करून राहिली आहेत.

खंडोबाची पाल हे गाव माझ्या गावापासून वीस बावीस मैलावर आहे. परिसरातले लोक पाल या गावाचा उच्चार पाली असा करतात. शेकडो वेळा मी या गावी गेलोय. गाव मनात ठसून राहिलंय. माझ्या 'मुरळी' कादंबरीत या गावाचं वर्णन मोठं भपकेदार उतरलंय. ते मुळातनंच वाचायला हवं.

"उंब्रजच्या पश्चिमेला तारळ खोऱ्यात खोलगट जागी खंडोबाची पाली आरामात पसरली होती. डोक्यात खांडकं पडलेलं गुराख्याचं पोर सावली गाठून लवंडावं तशी पाली आपल्याच मस्तीत दोन डोंगरांच्या कुशीत विसावली होती. पूर्वेला आडदांड माणसासारखा पिटाचा डोंगर पसरला होता. तर पश्चिमेला इंजाबाईच्या डोंगराने हातपाय लांबविले होते. गावाच्या पोटातून लहरी तारळी नदी फरारत गेल्याने गाव मधोमध फाटल्यासारखा वाटत होता. नदी जवळजवळ आटली होती. ठणठणीत गोट्यांचं वाळवंट ऐसपैस पसरलं होतं. रानदांडग्या चिंचा फोफावल्या होत्या. दोन तीन डोह कसेतरी पोटात पाणी घेऊन पडले होते. वरच्या डोहाचा अर्धा दगडी घाट पुरानं उखडून पडला होता. शेवाळं माजलं होतं. खालच्या खोलगट डोहावर वीस-बावीस बायका धुणं चुबकत होत्या. हातभर लांबीच्या दगडावर कसरत चालू होती. बाकी बघावं तिकडं वाळवंट.

"उन रखरखत होतं. टीनपाट हॉटेलं गिऱ्हाईकाची वाट बघत होती. मरू घातलेलं पिकप शेड रिकामच होतं. एक कळकट टेंपो पॅसेंजरची वाट बघत उभा होता. विलायती शेरांनी रस्त्यावरची दुतर्फा बाजू माखली होती. एखादा चुकार पॅसेंजर इंजाबाईच्या डोंगराकडे बघत गाडीचा अंदाज घेत होता.

पुलाच्या कोपऱ्यावर पाचशे वर्षांपूर्वी बांधलेले खंडोबाचे मंदिर आपलं जुनाट राजेशाही वैभव घेऊन उभं होतं. त्याचा आसमानी डौल बघणाऱ्याला चकित करत होता. वाघ्या आणि मुरळी हे खंडोबाचे

मानाचे भक्त आपल्याच तोऱ्यात वावरत होते. कोटम्यातला भंडारा येईल त्या गिऱ्हाईकाला फासत होते.... एकटया पालीला वाघ्या - मुरळीचे सहा ताफे होते."

अशी ही पाली. माझ्या बालमनानं जपलेली. प्रौढ मनानं शब्दबद्ध केलेली. पालीची जत्रा हा आसपासच्या शंभर गावांच्या कौतुकाचा विषय. माझा गाव याला अपवाद कसा असणार? भाकरी बांधून सायकल मारत विद्यार्थीदशेत आम्ही पालीची जत्रा गाठायचो. हळदीनं पिवळंधमक व्हायचो. उधळलं जाणारं खोबरं गोळा करायचो. 'मुरळी मल्हारी रायाची' या अण्णाभाऊंनी लिहिलेल्या चित्रपटाचं चित्रीकरण याच जत्रेत विद्यार्थीदशेत पाहिलं. फरकॅप घातलेले वसंत शिंदे अजून स्मरणात आहेत.

पुढे महाविद्यालयात गेलो. थोर समीक्षक श्री. के. क्षीरसागर यांचं गाव पाल असल्याचं समजलं. नाही म्हटलं तरी या समीक्षकाच्या लेखनाबद्दल जवळीक वाटायला लागली.

वाघ्या मुरळ्यांचं भावविश्व चितारावं असं बरेच वर्षे वाटत होतं. पुढे प्राध्यापक झाल्यावर आठ वर्षांनी १९८४ साली खंडोबाच्या भक्तांच्या वाट्याला येणारी ही फरफट मांडायचा मी विचार केला. माझे ज्येष्ठ बंधू प्रकाशराव यांना हा बेत बोलून दाखविला. त्यांनीही समाधानाने मान हलविली. पाली या गावी आम्ही सलग पंधरा हेलपाटे मारले. तेही सायकलवर. गावची एक पुजाऱ्याची मुलगी तिथं दिलेली. तिचा नवरा सर्कशीत होता. त्या माऊलीनं फार सहकार्य केलं.

गावात वाघ्यामुरळ्यांचे सहा ताफे. माणसे साठसत्तरच्या आसपास. एकावेळी सगळे भेटणे कठीण. दोन भेटले तरी त्यांच्याच मुलाखती घ्यायच्या आणि गावभर माहिती काढून विचारायचं. कधी ताफाच्या ताफा जागरण घालताना सापडे. मग त्यांच्या सोयीनी मुलाखती. दहापाच दारूला दिले की धडाधडा बोलत. प्रत्येक ताफ्याचं ऑफिस मेणचटलेलं. जुनाट तुळवीला मारलेल्या दोन खिळ्यांना एखादा भुंगा लटकावा तसा एकवीस कड्यांचा काळाभोर लंगर लटकलेला असायचा. वाघ्याचं कपाळ बघावं तेव्हा भंडाऱ्यानं माखलेलं. मुरळीच्या गळ्यात एकवीस कवड्यांचा गाठा. तेच त्यांचं मंगळसूत्र. लहानपणीच न कळत्या वयात खंडोबाशी लग्न लागलेलं. देवदासीचं जीवं नशिबी आलेलं. वाघे सतत पितात. पिलेली मुरळी क्वचितच आढळते.

सलग पंधरा दिवस मुलाखती घेऊन मी 'मुरळी' कादंबरी लिहिली. याच मुलाखतीवर बाराचौदा पानांचा रिपोर्टवजा लेखही लिहिला. पु. वि. बेहेरे म्हणाले, 'हा लेख ग. वा. बेहरे यांना द्या. ते 'सोबत'मध्ये छापतील. कादंबरी मी 'जत्रा'तून फिरवितो.'

बेहेरे साहेबांनी 'मुरळी' 'जत्रा' साप्ताहिकातून क्रमशः छापली. पुढे पुस्तकरूपाने काढली. सुभाष अवचटांनी अफलातून मुखपृष्ठ केले. वाचकांचा उदंड प्रतिसाद या कादंबरीला लाभला.

मराठी सिनेमावाल्यांचं लक्षही या कादबरीने वेधले. पण एकजात सिनेमावाले लबाड. लाखाच्या गप्पा मारतील आणि फुकट प्रत मागतील. सिनेमाच्या प्रांतातही गॉडफादर हवा. एरव्ही वाट्याला धूळफेकच. ग. वा. बेहेरे यांना लेख पाठवायचं राहूनच गेलं. तो लेख मुंबईला 'राजधानी' नावाच्या साप्ताहिकाला पाठवला. महाराष्ट्राच्या राजधानीत त्या लेखाचं काय झालं देव जाणे. आज त्याची स्थळप्रत मजजवळ नाही

राधा नावाच्या एका तरण्याबांड देखण्या मुरळीची ही कथा. चकचकीत डोळ्यांची राधी कुणाचंही

लक्ष वेधून घ्यायची. वाऱ्यानं कर्दळ लवावी तशी लवायची. बोटांच्या नाजूक पिवळ्याजर्द पेरातली पितळी घाटी वयात आल्यासारखी खणखणत रहायची. चाळीशी उलटलेले वातड गडीही मग गुडघ्याला मिठी मारून डोळे उडवित खिदळत रहायचे.

नामा वाघ्याजवळ ती बायकोसारखी रहायची. खंडोबाच्या नावानं गळ्यात एकवीस कवड्यांचा गाठा बांधलेला. पण नामामध्ये ती पूर्णपणे गुंतली होती. पहिल्या बायकोच्या खुनात येरवडा जेल भोगून आलेला नामा पुन्हा डिंबडी ठोकत होता. राधीला घेऊन जागरणे घालत फिरत होता.

एकदा असाच वाठार - किरोलीला ताफा घेऊन गेला. लंगराचं जागरण असल्यानं गाव गोळा झालं. पिवळा फेटा बांधलेल्या नामा धायगुड्यानं खंडोबाचा जयजयकार केला. जागरण रंगलं. पण जागरण घालणाऱ्या संपत वाठारकराच्या पोरानं - सुभानराव मोहित्यानं तिला हेरली. तिच्यावर शंभर रुपयाची उधळण केली. पोटात कुराडी खिळा घुसावा तसा नामा हादरला. एका रात्रीत राधी गडप झाली. सुभानरावने तिला पुण्याला नेली. नऊ दिवस फिरविली. तीही तक्रार न करता सामोरी गेली. नशेच्या आधीन गेलेला सुभानराव आता लवकर उठणार नाही याची खात्री होताच पळाली. तिनं थेट पाली गाठली. खंडोबापुढं थडाथडा मारून घेतलं. चूक कबूल केली. सुजलेल्या कपाळावर भंडारा फासला. नामानं मोठ्या मनानं तिला स्वीकारलं. तिशीच्या नामात ही विशीची पोर रमून गेली.

मंदिराच्या कमानी दरवाजाच्या दगडी चौथऱ्यावर ती कायम बसायची. हातानं भंडाऱ्याचा कोटमा असायचा. दर्शनाला आलेले भक्त स्वखुशीने रुपाया - दोन रुपये टाकत. पंधरा दिवस उलटले. आणि एक दिवस सुभानराव मोटारसायकल उडवित आला. अठरा खांबी मंडपात शिरला. लहान पोरानं नामाला बातमी पोचवली. राधीची बेइज्जत करणाऱ्या सुभानरावाला नामानं लंगराने ठोकला.

नामाचा संशय वाढतो. पिणं वाढतं. ती त्याला समजावते. 'देवाच्या नावानं जवा गळ्यात कवडी बांधली तवाच माझं इमान देवाच्या दारात पुरलं.' असं म्हणते. काही दिवस ती जागरणं घ्यायचं बंद करते. पुन्हा जाऊ लागते.

खंडोबाची जत्रा येते. मंदिरात नऊ दिवस पूजा चालतात. गावोगावचे मानाचे गाडे येतात. चंपाषष्ठीला कीर्तनं रंगतात. पौष महिन्यातल्या त्रयोदशीला यात्रा भरते. खंडोबाचं म्हाळसाशी लग्न लागतं. यात्रेचा फायदा घेऊन दाढी वाढवलेला सुभानराव पुन्हा येतो. राधीची छेड काढतो. त्याचा काटा काढण्यासाठी नामा धडपडतो. पण अपयश येते. स्वतःच्या षंढपणाची त्याला जाणीव होते. कानाखाली जखम घेऊन फिरणारा मोहिते 'कानासाठी मान दीन पण मुरळीसाठी रान उठवीन' अशी प्रतिज्ञा करतो.

काही दिवसांनी ती शिरंबे गावी जागरणाला जाते. पाण्यात टाकलेला परातीतला रुपाया उचलताना एक बेवडा समोर खणलेल्या खड्ड्यातला रुपाया उचलायला सांगतो. वादावादी वाढते. साहेबी कॅप घातलेला एक डगलेवाला येतो. बेवड्याला मारतो. पुन्हा जागरण सुरू होताच लांब जाऊन अंधारात सिगारेट ओढत बसतो. जागरण संपताच तो तिला विश्वासात घेतो. माफी मागतो. खप्पड नामापुढे तो मर्द पुरुष तिला आवडतो. तो तिच्याशी लग्न करण्याचा विचार बोलून दाखवितो. तिला पैसे आणि पत्ता देतो. ते चोरून ऐकणाऱ्या नामाला दम देतो. सारे पालीला परत येतात. पाली महापुरात अडकलेली असते. अनेकांचा संसार, दावणीची जनावरं वाहून जातात.

सुभानरावची पत्रे येत रहातात. नामा आणि राधी यांची भांडणं वाढत जातात. नामा नकळतपणे गंगी मुरळीकडे ओढला जातो. भांडण विकोपाला जातं. राधी पोराला टाकून घर सोडते. देवळात तिला सुभानराव भेटतो. नामाला बदडून तो राधीला मोटारसायकलवर घेतो. सुसाट निघून जातो. समाजाला चिलमीत घालून फुंकणारा सुभानराव तिला कराडमध्ये फिरवतो. कपडे घेतो. सरळ ताकारी गाठतो. गणी नावाच्या मित्राकडे जातो. नकट्या नाकाचा मिशाळ गणी तिला खोटं मंगळसूत्र देतो. घरी दोघांना ठेवून घेतो. जेऊ घालतो. सागरेश्वराच्या देवळात भटजी बोलावून लग्न लावतो. बायको बनलेल्या राधाला मोटारसायकलवर बसवून सरळ वाठार गाठतो. वाडा गडबडतो. थोरला भाऊ आणि त्याची गलेलठ्ठ बायको कुजबुजू लागतात. 'कातड्याची चप्पल पन्नास रुपयांची आसती म्हणून डोक्यावर घालायची नसते.' मुरळीला घरात ठेवणं ही कमीपणाची बाब मानली जाते. ज्या घरात मुरळी जाते ते घर ती उद्ध्वस्त करते ही समाजधारणा आजही कायम आहे. सुभानरावाची आई मात्र प्रेमळ असते. ती दोघांना जेऊ घालते. वहिनी फणफणते. बँकवाला भाऊ बायकोचंच ऐकतो. भावाभावात संघर्ष वाढत जातो. 'मुरळी घरात आली आणि अब्रूचा खेळखंडोबा झाला' असंच भाऊ समजू लागतो. बायकांच्यातही मारामारी होते. थोरली सोवळंओवळं पाळते. राधीला ती कशालाच हात लावू देत नाही. वाद वाढत जातो.

राधीला स्वप्न पडतं. स्वप्नात तिला पोरगं भिक मागताना दिसतं. नामानं त्याला भिकारी केलंय असं वाटतं. पोराला आणायचं सुभानराव मान्य करतो. 'ताकद गरुडाची आन् चाल मात्र फरडाची' अशा वृत्तीचा सुभानराव भावाला घरादाराची, जमिनीची वाटणी मागतो. वाद वाढतच जातो. भांडणं होतात. बँकवाला फौजदारी करतो. सुभानरावाला जामीन मिळत नाही. राधी ताकारी गाठते. गणीमास्तरला आणते. जामीन देते.

पंचमीच्या सणाला कर्दळीसारखी मोहरलेली राधा नंतर मात्र ढासळते. बँकवाला आणि त्याची ढबी बायको दारातल्या जर्सी गायी मारतात. सुभानरावाची कोंडी करायचा प्रयत्न करतात. आयुष्यात उध्वस्त झालेला नामा हातापायाला चिंधकं बांधलेल्या अवस्थेत दारात येतो. राधीची पाठ धरतो. ढबी त्याला हुलीवर घालते. गावातल्या जागरणाचा फायदा घेऊन बँकवाला नामाकरवी सुभानरावाचा खून करतो. गर्भार राधा गडबडून जाते. कादंबरीच्या शेवटी ऊन झेलत निवारा शोधण्यासाठी खंडोबाच्या पालीकडे निघालेली राधा दिसते. न संपणारा वनवास भोगण्यासाठी तिची वाटचाल सुरू होते.

२२७ पानांची क्राऊन साईजमधील ही कादंबरी. सुभाष अवचटांचे बोलके चित्र आणि मेनका मुद्रणालयाची मोहोरदार छपाई. किंमत फक्त चाळीस रुपये. ज्यांनी मला ग्रामीण साहित्यात लेखनाची वाट दाखविली त्या गुरुवर्य म. भा. भोसले यांनी सदर कादंबरी मी अर्पण केली आहे.

ज्या काळात ही कादंबरी मी लिहिली त्या काळात (एक तपापूर्वी) माझ्या मनात सतत लेखनाची उर्मी सळसळत रहायची. मी सतत नावीन्यपूर्ण विश्वाच्या शोधात असायचो. नाना प्रकारची माणसं भेटायची. शब्दांच्या चिमटीत त्यांनी शब्दबद्ध करायचो. मजा असायची

'साप्ताहिक जत्रा'मधून मी धारावाही स्वरूपात ज्या कादंबऱ्यांचं लेखन केलं त्या महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात जाऊन पोचल्या. प्रसिद्धी अफाट मिळाली. पण जाणकार (हातचे राखून बोलणाऱ्या)

मंडळींचा प्रतिसाद तसा कमीच. एका मान्यवर साप्ताहिकात एक ग्रामीण लेखक सलग दीड तप धारावाही कादंबरीलेखनासारखे सदर चालवतो ही जाणकार विद्वानांच्या दृष्ट्या कौतुकाची गोष्ट ठरायला हवी होती. गोतावळा करून रहाणारे हे समीक्षक टुकार दैनिकात दहापाच वर्षे रतीब घालणाऱ्या सामान्य लेखकांचाही गवगवा करतात. मलावण करतात. माझा मात्र कटू अनुभव आहे.

तरुण, उत्साही वाचकांची असंख्य पत्रे आली. वाचक भलतेच जागरूक असतात. या कादंबरीत नायक असा विचार करत पडलेला असतो. वैतागलेल्या, त्रासलेल्या अवस्थेत त्याला सात वर्षांपूर्वीचा प्रसंग आठवतो. राधीच्या अंगावर नोटा भिरकावणारा वाठारकर आणि त्याला साद देणारी राधी वाचकांना भलतीच आवडली. पालीतील वाघ्यामुरळ्यांचं जीवन चितारणारं रिपोर्ताज पद्धतीनं लिहिलेलं अनिल अवचटांचं 'वाघ्यामुरळी' हे पुस्तक माझ्या कादंबरीपेक्षा खूपच उशीरा आलं आणि बाजी मारून गेलं. माझ्या 'मुरळी'ला हे भाग्य लाभलं नाही. जळजळीत वास्तवाला लालित्याचा साज चढविला तर तर त्यातील दाहकता एवढी दुर्लक्षित का ठरावी? मुंबईच्या फोरास रोडवर वेश्या व्यवसाय करणाऱ्या कधी काळच्या एका मुरळीचं पत्र आलं. थोडं अश्लील होतं. पण त्यातील शेवटचं वाक्य काळजावर वार करून गेलं. 'माझ्या नशीबी आलेला भोग मांडून तुम्ही काय मिळवलंत?' असा काटेरी सवाल तिने उपस्थित केला. तिची चित्तरकथा मला कोणीतरी सांगितली असावी असा तिला संशय आला. मान्यवर वृत्तपत्रातून फारशी परीक्षणं आली नाहीत ही खंत मनात कायम राहिली.

सिनेमावाल्यांचं लक्ष या कादंबरीनं वेधून घेतलं. कोल्हापूर, गोवा, मुंबई येथील काही सिनेमा संबंधित व्यक्तींनी कादंबरी मागवून घेतली. काहींनी समक्ष चर्चाही केली. एकाने तर रात्री साडेबारा वाजता घरी येऊन हातावर अडीच हजार रुपये ठेवले. पटकथा संवाद लेखन करायला सांगितलं. नंतर आणखी अडीच हजार देऊ असं मधाचं बोटही लावलं. एक वर्षाच्या करारावर सहीही घेतली. माझ्याकडून काही संवाद त्यांचा माणूस घेऊन गेला. चित्रीकरणाला प्रारंभ केल्याची जाहिरातही केली गेली. नंतर सारेच बारगळले. एक वर्षानंतर मला वकीलाची नोटिस आली. सहा महिन्यात संवाद लेखन पूर्ण केले नाही. घेतलेले पैसे परत करावेत. झक मारत पैसे परत करावे लागले. संवाद लेखनाचे कागद देताना मी लेखी न लिहून घेतल्याचा हा परिणाम. तेव्हापासून मी कानाला खडा लावला. सिनेमावाला दारात उभा करायचा नाही. मुरळीनं असा मनस्ताप दिला.

मुरळी घेऊन खंडोबाशी लग्न लावणारी राधा ही माझी आवडती व्यक्तिरेखा. चौकावर ती झुलायला लागली की गपकन लोकांचं लक्ष वेधून घेते. तिच्या डोळ्यांतली काळजाची रेघ आणि कधीच न मावळणारं गोऱ्यापान चेहऱ्यावरचं हसू सर्वांना हवंहवंस वाटतं. तिशीच्या नामाशी संसार थाटणारी ही विशीची पोर. तशी बेदरकार, तडफदार. ती नाचायला लागली की हातातल्या पिवळ्या पेरातली घाटीही वयात आल्यासारखी खणखणू लागते.

राधी मुरळी बनली ती खुशीनं नव्हे. बाप साप चावून मेला. आईचं कपाळ पांढरं झालं. आईनं स्वतःची सोय व्हावी म्हणून तिला मुरळी केलं. ज्या दारात लग्नाचा मंडप उभा रहायचा तिथं वाघ्या मुरळ्यांनी गर्दी केली. पुजारी मानानं आले. बकरे मारले. खंडोबाशी तिचं मानानं लग्न लागले. गळ्यात मंगळसूत्राऐवजी एकवीस कवड्यांचा गाठा आला. लाजही बोथट झाली. सारे पुढे सवयीचे झाले. कोटम्यातल्या भंडाऱ्यासारखी ती स्वतःला उधळत गेली.

तिची दोन रूपे आहेत. एक मुरळीचे, दुसरे संसारी गृहिणीचे. सुखवस्तू विवाहितेचे. मुरळी बनून ती नामासोबत अनेक गावी भटकते. वाईट अनुभवाने वैतागते. संशयी नवऱ्याला कंटाळून ती सुभानरावाचा हात धरून पळून जाते. सागरेश्वरी लग्न लावते. मालकीच्या घरात जाताच सासूसासऱ्यांना विश्वासात घेते. हलकट जावेला तिची जागा दाखविते. पंचमीच्या सणाला नवं पातळ नेसून ती बायकांच्या गर्दीत मिसळते. ठेवणीतली एकापेक्षा एक सरस गीते गाते. पोरी आवाजाने मोहरतात. संपूर्ण कादंबरीत मला हे दहावं प्रकरण फार आवडते. थोडाफार बदल करून अभ्यासक्रमात नेमण्यासारखं आहे. लोकगीतांचे हे आरसपानी दर्शन आहे.

राधी जितक्या सहजतेने नामाला सामोरी जाते तितक्याच सहजतेने सुभानरावाला जवळ करते. देवदासी होऊन जगण्यापेक्षा संसारी स्त्री होऊन जगावे असे तिला वाटते. मुरळीच्या चक्रातून सुटून सन्मानाचं जीवन जगू पहाणारी ही स्त्री शेवटी जखमी मन घेऊन खंडोबाला शरण जाते.

नामा तसा तिरसट आहे. त्याच्या 'मर्दानी हेकट डोळ्यात' राधीबद्दल तिरस्कारच जास्त आहे. रोज भंडारा लावून कपाळ पिवळं पडलेलं. काळ्या चेहऱ्यावरच्या पिवळ्या भेगात कपाळावरच्या खोलगट तेवढ्या उठून दिसतात. बसक्या नाकावरच्या चतुर डोळ्यात भुंगा भणाणतो. दाढीचे चरवट खुंट त्याचे त्यालाच टोचतात. सहा माणसं आणि दोन मुरळ्या घेऊन तो गावोगाव फिरतो. कधी पैसे मिळतात. कधी पदरचे भरावे लागतात. जुनाट घरात तो रहातो. धूळ खाऊन तुळव्या काळ्या पडलेल्या. दोन खिळ्यांना अडकवलेला एकवीस कड्यांचा लंगर एखाद्या भुजंग लटकावा तसा लटकत असतो.

सुभानराव फौजी. नोकरी अर्ध्यावर सोडून राधीसाठी वेडा झालेला. कुर्रेबाज मिशांचा हा तरणाबांड गडी तसा बेधडक जगणारा. कादंबरीच्या प्रारंभी तो राधीला पळवून नेतो. तसा नंतर पालीत जाऊन धिंगाणाही घालतो. राधीला पुन्हा आपल्याकडे वळवतो. विशेष म्हणजे राधेव्यतिरिक्त तो कोणातही गुंतत नाही. तो समाजाचा विरोध पत्करून राधेशी लग्न लावतो. भावाशी वैर पत्करतो. पण शेवटी अपरात्री नामाकडून तो मारला जातो.

अशी ही पात्रे हाताच्या बोटावर मोजण्यासारखी. मनात रेंगाळत रहाणारी.

ग्रामजीवनाशी एकरूप झालेल्या प्रतिमा, देखण्या उपमा, मनात सळसळत रहाणाऱ्या निसर्गाची विविध रूपे, मानवी प्रवृत्तींचं मार्मिक दर्शन आणि भेदक समाजजाणिवांचं विदारक दर्शन या कादंबरीतील वर्णन शैलीतून घडते. रमशाने वीस रुपायात आणलेल्या कोंबड्यांचं वर्णन 'कोंबडाबी असा दणक्या, चार माणसास्नी सरणार न्हाय. कपाळावर चांगलं सात इतीचं बॉटभर पेरं हुतं. लालचुटुक, हिरव्या तांबड्या पकाची बाकदार शेपटी.' कोंबडा नजरेसमोर उभा राहतो.

व्यक्तिरेखा चित्रशैलीत पुढे येतात. 'कर्दळ लवावी' तशी राधी लवते. पिवळ्याजर्द पेरातली पितळी घाटी वयात आल्यासारखी खणखणते. 'वारूळ हरवलेला साप मोकळ्या वावरात ढेकळावर धडधडत रहावा, तसा सुभानराव चरफडतो. राधीचं 'केळीच्या सोटासारखं तक्तकीत गोरं अंग लक्ष वेधून घेतं. 'वादळात लिंबाटा हेंदकळावा' तशी ती थरथरते. तारळी नदीकाठ आणि सागर यांची वर्णने मुळातूनच वाचावी. नामा धायगुडा राधेच्या सुंदर देहाच्या कमानीत चिपाडासारखा पडून रहातो. जागरण ठरवायला आलेल्या रिटायर्ड पोलिसाकडे बघत राधा नामाला म्हणते, 'पोलिस हाय

म्हणल्याव शाणा आसणार हाय व्हय ? आठरा घराच्या सतरा खिडक्यात मुंडकं खुपसून बघणारी जात.

माझ्या कादंबरीतील पात्रे नेहमीच प्रतिमांच्या भाषेत बोलतात. पद्यात बोलत गेल्यासारखी कृती करत रहातात. हे सगळं सहज घडतं. काहींना ते फिल्मी वाटण्याचीही शक्यता आहे. पण या पात्रांच्या रक्तातही जगण्यासाठी लागणारी कलंदर मस्ती आहे. इचवाचं प्याव फुटल्यावाणी येमना' मागं लागतात. यातील किसन वाघ्या बोलताना 'आपलं ढब्बू नाक गोंजारतो.' 'जुनाट टीनपाट पत्र्यावर' पावसाच्या धारा पडतात. प्रकरण चार मधील पालीच्या खंडोबाच्या जत्रेचे वर्णन अफलातून आहे.

'वाघीण', 'विलायती मखमल' आणि 'हिरवं सोनं' या तीन कादंबऱ्याही मला आवडतात. 'मुरळी' इतकेच त्यांचेही वेगळेपण मान्य व्हायला हवे. किंबहुना जास्तच. पण 'मुरळी'शी माझं एक भावनिक नातं बांधलं गेलंय. खोलवर स्नेहबंध जखडले गेलेत. लेखनासाठी घेतलेले परिश्रम आणि झालेला मानसिक त्रास विसरता येणार नाही.

(प्रा. व. बा. वोघे, नीरा, जि. पुणे)

---

## साभार स्वीकार

### समीक्षा

- कथाकार वामन चोरघडे : श्रीधर शनवारे, कौस्तुभ प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ३६०. अडीचशे रुपये
- निवडक बी. रघुनाथ : सं. नागनाथ कोतापल्ले, साहित्य अकादमी, मुंबई. पृष्ठे २६८. सत्तर रुपये
- राष्ट्रगुरु रामदासस्वामी : रा. श्री. पुजारी, जयश्री प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८०. पंधरा रुपये
- ज्ञानेश्वरांचा अलौकिकतावाद : श्यामला मुजुमदार, मनोहर कथा प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ३१०. एकशे ऐंशी रुपये
- मुर्वे यांच्या कवितेची इहवादी समीक्षा : श्रीपाल सबनीस, मधुराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे १९६. शंभर रुपये
- विश्वसाहित्यातील फेरफटका : शंकर सारडा, दिलीपराज प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे १३४. ब्याऐंशी रुपये
- खांडेकरांचा साहित्यविचार : विजय निंबाळकर, मेहता पब्लिशिंग, पुणे. पृष्ठे १८२. नव्वद रुपये
- मराठी साहित्य संशोधन : स्वरूप आणि दिशा, डॉ. श. रा. राणे, प्रभाकर मांडे, धुळे. पृष्ठे १७२. दीडशे रुपये
- रामदास : श. श्री. पुराणिक, चंद्रकला प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४९५. दोनशे ऐंशी रुपये
- ज्ञानदेवांचे भावदर्शन : बाबा कदम, गीता अशोक कदम, नगर. पृष्ठे १५२. पंचाऐंशी रुपये
- वारकरी पंथाचा इतिहास : शं. वि. पाटील, चैतन्य प्रकाशन, पृष्ठे २०० पंचाहत्तर रुपये
- वा. गो. आपटे यांची आनंदयात्रा : श. रा. राणे, चेतश्री प्रकाशन, अमळनेर. पृष्ठे ३५०. सव्वादोनशे रुपये
- प्राच्यसिद्धांत : बाळकृष्ण वलदवा. पृष्ठे ४२४ : ऐंशी रुपये.
- मराठी आध्यात्मिक शाहिरी : डॉ. शिवाजीराव चव्हाण, श्रीनाथ प्रकाशन, सातारा. पृष्ठे १७५. सव्वाशे रुपये

विश्वास पाटील

# झाडाझडती

दहा वर्षांमागे मी पुण्यात जिल्हाधिकारी कार्यालयामध्ये जिल्हा पुनर्वसन अधिकारी या पदावर काम करीत होतो. जीवनातील काही अपयशामुळे मन हळवे, भिरभिर झालेले. चांगला साहित्यिक म्हणून नाव कमवावे ही प्रथमपासूनची इच्छा. अनेक साहित्यसभांतून 'नवोदित कथाकार' अशा शब्दात परिचय करून दिला जायचा. त्या 'नवोदित' शब्दाचा वीट यायचा. वयही सत्तावीस अठ्ठावीस झालेले. अशा विमनस्क अवस्थेत मनामध्ये 'पानिपत' ची जोरकस तयारी चाललेली. कधी एकदाचे कार्यालय बंद होते आणि कधी मी इतिहास संशोधक मंडळाच्या अभ्यासिकेत जाऊन बसतो असे होऊन जायचे. दीड-पावणेदोन वर्षांच्या पुण्याच्या वास्तव्यात 'पानिपत'चा अंतिम टप्प्यातला अभ्यास आणि लेखनही संपले. कादंबरीही नोव्हेंबर १९८८ मध्ये प्रकाशित झाली. या झपाटलेपणाच्या काळातच अंतर्मनात दुसऱ्या एका सशक्त कलाकृतीचे बीज पडले आहे आणि ते नकळत फोफावते आहे याची मला तेव्हा तितकीशी जाणीव झाली नव्हती.

'पुनर्वसन' हा माझ्या कार्यालयीन कामाचा भाग होता. एकट्या पुणे जिल्ह्यामध्ये वीस हजारावर धरणग्रस्त असतील याची तिथे जाईपर्यंत कल्पनाही नव्हती. काम प्रचंड होते. लोक झुंडीने यायचे. कार्यालयीन सूत्रे हाती घेतली आणि चारच दिवसात आंबेगावकडील शेतकऱ्यांचा जथा माझ्या केबिनमध्ये अचानक घुसला. ना चिठ्ठी, ना चपाटी. त्यांच्या सरळ घुसण्याने माझ्यातला सरकारी अधिकारी जागा झाला. मी त्यांना खडसावले. तसा सत्तरीतला एक म्हातारा किलकिल्या डोळ्यांनी बोलला, "आवं साहेब ऽ आगीत घावलेलं मेंढरू कशापायी वाट पुसंल? तो वाट दिसंल तिकडं उडी घेणारच की." हळू हळू रोज भेटणाऱ्या धरणग्रस्तांची हाक अंतर्मनाला भिडू लागली. त्यांचे छोटे छोटे प्रश्न. पाणी नाही, मशाण नाही, कर्ज नामंजूर, मूळ मालक आम्हाला जमीन कसू देत नाहीत, पोलीसांकडून अत्याचार, धनदांडग्याने जमीन लाटली, माझंच घर धरणाच्या पाण्यात बुडलं नि नव्या गावात आम्हाला प्यायला पाणी देत नाहीत. या साऱ्या प्रश्नांचं स्वरूप सर्वव्यापी होतं. ते सोसत होते, भोगत होते. परंतु अन्यायाविरुद्ध सूडाची भावना नव्हती. कमालीचा समजूतदारपणा होता. "साहेब, आम्हाला धरणबी पायजेल पर मरणबी नगो." ही त्यांची माफक अपेक्षा.

बालपणापासून एक धरण माझ्या अंतर्मनात प्रवेश करते झालेले. कोल्हापूर - सांगली जिल्ह्याची

सरहद्दीची रेघ मारीत जाणारी 'वारणा' ही आमची नदी. तिच्याच काठावर शेपाचशे उंबरा असलेले आमचे नेर्ले हे खेडेगाव. इथूनच काही अंतरावर चांदोली धरणाचे काम चालू होते. त्या प्रकल्पासाठी धडाडणारी यंत्रे पाहिली. आणि त्या धरणामुळे गाव सोडून जाणारे, गर्भगळित झालेले, वणवण करणारे शेतकरी मी पाहिले होते. धरणाची आवई आली आणि त्या भागाशी बाकीच्या मंडळींनी रोटीबेटी व्यवहार बंद केले. "त्यांच्यात पोर देवून तिला काय धरणाच्या डोहात बुडवून मारायची?" असं पोरींचे बाप बोलायचे.

वारणेत धुंडलेला मुलूख आता डोळ्यासमोर उभा राहू लागला. रोज भेटणारे धरणग्रस्त ही तर माझी गावशिवेची माणसे. माझाही जन्म साधारण शेतकरी कुटुंबात झालेला. यांच्यासारखेच मी खत मूत वाहिले होते. उनापावसाशी संघर्ष करणाऱ्या, ढगाकडे बघत पीक पोटात घेणाऱ्या - गांगरल्या डोळ्यांच्या शेतकऱ्यांमध्ये मी माझ्या आईला आणि दादाला पहात होतो. काम करताना अनेक तक्रारीची पत्रे यायची. त्यातील भाषा सरळ, परंतु वेदनेचं अस्तर तिला लाभल्यानं ती समर्पक असायची. नकळत तिला असे आगळे शब्दरूप लाभायचे की पट्टीच्या साहित्यिकाला तो बाज जमणे मुश्कील व्हावे. मी अशा पत्रांच्या प्रती मुद्दाम जपून ठेवल्या. एकदा इंदापूरजवळून गावकऱ्यांची तक्रार आली, "शासनाने आमच्या बोकांडी मारलेले हे धरणग्रस्त काय करतात याची जाणीव सरकारला आहे का? रस्त्यावर रात्री प्रेते जाळतात. आमच्या बायकामुलांना भीती वाटते." जाऊन चौकशी केली. धरणग्रस्तांनी आपला गाव आणि भवितव्य धरणाच्या घशात लोटल्याची लाभ घेणाऱ्या मंडळींना जाणीव नव्हती. धरणग्रस्तांकरता स्मशानासाठी दिलेली जमीन लाभक्षेत्रातील गावच्या सरपंचाने लाटली होती. तर मग प्रकल्पपीडितांनी रस्त्यावर प्रेते जाळायची नाहीत तर दुसरे काय करावे?

मनामध्ये 'झाडाझडती' आकार घेत होती. तेव्हा एम. ए. ला अभ्यासलेल्या 'ग्रेप्स ऑफ राथ' या स्टाईनबेकच्या कादंबरीची आठवण येत होती. कॅलिफोर्नियाच्या मळ्यातल्या एका कष्टकरी अमेरिकन शेतकरी कुटुंबाची ती दाहक कहाणी. परंतु इथे एखाददुसरे कुटुंब नव्हे, तर गावेच्या गावे प्रकल्पासाठी उद्ध्वस्त होत होती. कोणाची एका गावाहून दुसरीकडे बदली झाली तर त्याची पाचावर धारण बसते. परिसराचा कायमचा त्याग ही कल्पनाच केवढी भयानक. घराभोवती रोज फिरणारा साप हा आपला परिचयाचा साप आपला असतो. वाड्यातली आजूबाजूची भूते - हडळी यांची प्रथमपासूनच ओळख असते. मात्र दुसऱ्याच्या गावातल्या भुतांची लगेच भीती वाटते. आपला परिसर, नातीगोती मोडून, घरे तोडून, आपली नदी, गावशीव सारं सोडून, देव पाठीवर घेऊन दुसरीकडे जायचं, तेही पुन्हा न परतण्यासाठी. हा औद्योगिक युगातला भयाण विरह मला भिववत होता.

पुण्याला सुदैवाने धरणांचे अनेक टप्पे पहायला मिळाले. बाबा आढाव यांनी चासकमानच्या पायाभरणीला केलेला विरोध संपला होता. वरसगाव, पानशेत, वीर हे प्रकल्प केव्हाच संपून गेलेले. पण प्रश्न अनुत्तरित राहिलेले. डिंभे धरणाचे बांधकाम चालू होते. रोज माणसांच्या जातीचे अनेक नमुने पहायला मिळत होते. दौंडच्या उजाड माळावर पाणी येणार या हिशोबाने अनेक जुन्या नेत्यांनी मंत्र्यांनी माळामुरडाची राने कवडीमोलाने खरेदी केलेली. पाण्यात भवितव्य घालवलेल्या धरणग्रस्तांबद्दल कोणाला दयाभाव नव्हता. एक शंभर एकराचा मालक, वीस सालामागे धरणग्रस्ताला दिलेली दोन एकर परत मिळविण्यासाठी जंग जंग पछाडत होता. अर्थात माझी लेखणी धरणग्रस्तांच्याच

बाजूने चालणार होती. तर दुसरीकडे सावत्र पोराने भूसंपादनाचे पैसे लाटण्यासाठी आपल्याला जिवंतपणी मेल्याचे जाहीर केले म्हणून बनूबाई वेड्यासारखी फिरत होती. "तू मेली नसल्याचा दाखला घेऊन ये" असं सरकार तिला बजावत होते. मढ्यावरचे लोणी चाटण्यासाठी धरणग्रस्तांतूनही अनेक टगे पांढरी वस्त्रे घालून पुढारपण करीत कचेऱ्यांभोवती फिरत होते. ही सारी चित्रविचित्र माणसे नित्य भेटत होती. विषयाचा महापट मला प्रतिदिनी आव्हानात्मक वाटत होता.

विषयाच्या सखोल तयारीसाठी मी कोयना परिसर धुंडाळला. चाळीस वर्षांमागे धरण मार्गी लागलेले. परंतु 'वीज महाराष्ट्राला आणि भीकेची थाळी धरणग्रस्तांना' अशी अवस्था अजून कायम होती. प्रा. तु. मा. सरडे हे उजनीतले लढाऊ नेते भेटले. पंढरपूर तालुक्यातीलही अनेक गावठाणे पाहिली. पांडुरंगाच्या पायरीपासून वीस किलोमीटर अंतरावर एका निवृत्त धरणग्रस्त कॅप्टनच्या प्रेतावर अंत्यसंस्कारही लाभक्षेत्रातल्या मंडळींनी आपल्या स्मशानात होऊ दिले नव्हते. हैवतीचा खून झाला तेव्हा त्याची आर्त किंकाळी इथल्याच ऊसाच्या फडाने ऐकली होती.

'झाडाझडती'मध्ये चितारलेल्या अनेक व्यक्तिरेखा मला जिवंत स्वरूपात अनेकदा भेटल्या. 'आवडाई'चे व्यक्तिमत्त्व म्हणजे जवळपास माझ्या आईचेच चित्र. मी पाचव्या इयत्तेत असताना आमचे एकत्र कुटुंब विभक्त झाले. आईच्या अंगावर संसाराचा भलामोठा भार आला. शेत-वारदानं सांभाळताना, उनापावसाशी झुंजताना तिला मी जवळून पाहिलेले. खैरमोडे गुरुजी ही मुख्य व्यक्तिरेखा मला एका हरिजन शिक्षकाच्या रूपाने मंत्रालयात भेटलेली. कृष्णेच्या पाण्यात दरसाल वाहून जाणारा हरिजनवाडा सावरण्यासाठी त्याने आयुष्याचा होम केलेला. "मंत्रालय पेटवून देण्याची" त्याने जेव्हा एका मंत्र्याला धमकी दिली तेव्हा मीही अवाक झालेलो. विचारपूर्वक मी या व्यक्तिरेखेकडे पाहिलेले. खैराचे झाड चिवट. कुऱ्हाडीचे पाते मोडणारे. तसाच हा शिक्षक. त्याच्या व्यक्तिमत्त्वात मी अनेकांच्या छटा मिसळवल्या. लोकवर्गणीतून नि श्रमदानाने वळीराजा धरण बांधणारे संपतराव पवार, तु. मा. सरडे, कॉ. नाना शेटे अशी अनेक लढाऊ जातीची माणसे मला भेटली होती. मावळच्या कडेकपारीत उघड्या अंगाने उनाला पाठ शेकीत बसलेला कुशाराजा मी डोळ्यांनी पाहिला. त्याच्या पाठीवरची वाघनखाची नक्षीही निरखली.

प्रकल्पाच्या चरकात जवानी जाळणारे अनेक फाटकेतुटके, नोकरीसाठी वणवण फिरणारे हैबती भेटले. बनुबाईचे कागद तर मी स्वतः तपासलेले. दत्तू, लाला, खासदार शिंगाडे ही अव्वल भूते अनेकदा भेटली आहेत. नारायणगावच्या मिटींगमध्ये कुकडीच्या डोहातून प्रेत कसे नेले याची कथा एका धरणग्रस्ताने सांगितली. पोरसवदा वयात दिवसा आणि रात्रीचाही अनेकदा पायपीट केलेला वारणेचा काठ डोळ्यांसमोर उभा राहिला. रानडुकराचे कळप, झाडाझुडपांचं गायरान सारं परिचयाचं होतं. पुण्यात असताना अनेकदा सह्याद्रीची दरीखोरी पुन्हा पालथी घातली. बाळ घेवारे वेल्ह्याला तहसिलदार होता. तो, रामभाऊ अहिरकर बापू कडू असे अनेकजण बुडीतातल्या शेतकऱ्यांबरोबर शिकारीला, मासेमारीला भटकलो. भर आषाढात लॉंचमधून हरिबा नावाड्याच्या लॉंचचा पुन्हा अनुभव घेतला. पश्चिम महाराष्ट्रातल्या गावगाड्याचे शेतकरी जीवनाचे सरमिसळ रूप लेखनात उतरले आहे. जांभळीच्या वर्णनाआडही अनेक गावांचे तोंडवळे लपलेत. गावकूस, हाटवटी, रेडा - पखाल ही मोहोळमाथ्याकडची तर जांभळीची डोंगररांग भोर वेल्ह्याची. सह्याद्रीत अनेक ठिकाणी दोन डोंगरांच्या रांगा 'नवरा - नवरीचे डोंगर' म्हणून ओळखल्या जातात. त्यातूनच बाळू - बापूच्या



अनुक्रमणिका

डोंगरांचा जन्म झाला. लाभक्षेत्राला आणि बुडीतात अडकून पडलेल्या गावांना जागवायला हैबती - गुणवंती निपजले.

कादंबरीचा कच्चा आराखडा दोन वर्षे डोक्यात एकसारखा घोंघावत होता. सुरवात कुठे करावी आणि शेवट कसा साधावा? अनेक सुट्ट्या कथा लिहून धरणावरच्या कथा म्हणून त्या प्रकाशित करता आल्या असत्या. पण विषयाचा व्यापक आशय त्यात मांडता आला नसता. आणि परिणामही साधता आला नसता. सरळधोट मार्गाची कथाही मनाला पटत नव्हती. एखादा तरणाबांड इंजिनियर आणि त्याच्या प्रेमात पडलेली गरीब धरणग्रस्ताची सुस्वरूप कन्या हा नेहमीचा निसटता मार्गही वरकरणी वाटत होता. त्या सर्वांऐवजी एक समूह, अनेक नांदती बोलती नि नंतर देशोधडीला लागलेली गावे मला खुणावत होती. ती तशीच टिपणे मला महत्त्वाचे वाटले. कादंबरीचा खर्डा दोन वेळा लिहून काढला. 'राजहंस'च्या दिलीप माजगावकरांनी दिमाखात पुस्तक प्रकाशित केले. प्रकाशनाआधी खर्डा फक्त शंकर सारडा आणि म. द. हातकणंगलेकर सरांनी तपासलेला. परंतु कादंबरी प्रकाशित झाली आणि सामान्य वाचकांच्या पत्रांचा पाऊसच पडला. अनेक पारितोषिके आणि १९९२ चा 'साहित्य अकादमी' पुरस्कारही मिळाला.

'झाडाझडती'ची समीक्षा अनेकांनी केली. परंतु तिची मर्मभेदी समीक्षा डॉ. सदा कऱ्हाडे आणि वसंत आबाजी डहाके यांनीच केली असे मला वाटते. विषय ग्रामीण पार्श्वभूमीचा असूनही तिला पूर्णतः ग्रामीण कादंबरी म्हटले गेले नाही. तिची मुख्य व्यक्तिरेखा दलित असूनही तिची वर्गवारी दलित साहित्यात बसणारी नव्हती. आजचा सामाजिक आणि औद्योगिक कलह, माणूस - निसर्ग आणि नियोजन अशा मुख्य प्रश्नांना तिने हात घालूनही तिच्यावर प्रचारकाचा आरोप झाला नाही हेच मी कलाकृतीचे यश मानतो. डॉ. आनंद यादवांनी मोठे पत्र लिहून अभिनंदन केले. प्रा. केशव मेश्राम म्हणाले, "तू काय लिहून गेला आहेस त्याचे महत्त्व तुला आणखी पंचवीस वर्षांनी समजेल." अनेक दलित साहित्यिकांना खैरमोडे गुरुजींची व्यक्तिरेखा अभूतपूर्व वाटली. डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांनी हिंदीमध्ये विस्तृत विवेचन करून 'झाडाझडती'ची तुलना 'मैला आँचल' आणि 'गोदान'शी केली. कादंबरीची दुसरी हिंदी आवृत्ती प्रकाशित झाली आहे. मराठीत पाच आवृत्या झाल्या.

महाराष्ट्रातील जनसामान्याने कादंबरीचे मन भरून स्वागत केले. लातूर, सांगली, जळगाव आदी ठिकाणी जाहीर चर्चा घडून आल्या.

मराठीत लघुकथा संस्कृतीचाच अधिक गौरव झाला. दिवाळी अंकासाठी अनेकांनी चांगल्या लघुकथा लिहिल्या. मात्र या नादात चांगल्या कादंबरीची अनेक बीजे लघुकथेला अर्पिली गेली. विशेषतः व्यंकटेश माडगूळकर आणि गंगाधर गाडगीळांच्या कथासाहित्यात हे अनेकदा जाणवते. त्यांच्या अनेक कथाबीजांची ताकद महावृक्षाची होती. उदा. माडगूळकरांची पट्ठे बापूराव यांच्या जीवनावरची 'मास्तर' ही कथा. कलेसाठी तमाशाची कडी हाती घेऊन ब्राह्मणधर्मावर लाथ मारणारा पट्ठे बापूराव आणि लावण्यवती पवळा. पवळाचे, तमाशाचे, त्या परंपरेचे आणि त्यातील आशयाचे सूत्र चितारताना तात्यांचा कुंचला किती सराईतपणे चालला असता!

मराठीतली समीक्षा ही लघुकथेच्या अंगानेच जाणारी आहे. 'धग', 'माणूस', 'पाचोळा', 'आई आहे शेतात', 'फकिरा', 'कोसला', 'गोतावळा', 'पडघवली', 'गारंबीचा बापू', 'वज्राघात', 'सराई', 'चक्र' अशा कितीतरी चांगल्या उजव्या कादंबरींचा आवाका मराठी समीक्षा तितक्याशा

ताकदीने पकडू शकली नाही. त्यामुळे रंगनाथ पाठारे, अनंत सामंत, आशा बगे, सानिया, सुबोध जावडेकर, राजन गवस अशा नव्या कादंबरीकरांनाही ही समीक्षा प्रेरक वा मार्गदर्शक ठरू शकलेली नाही. गरज आहे ती नव्या कादंबरीचा पट पेलणाऱ्या नव्या समीक्षेची.

मुळात मी शेतकऱ्याघरचा पोर असल्यामुळे 'झाडाझडतीतील' कष्टकऱ्यांचे अवघे जीवन समरसतेने आणि हळुवार टिपता आले. डोंगररानातील घराबाहेरच्या ओसरीला गाईबैल बांधलेली असत. त्यांच्या खतामूताचा वास अनेक वर्षे नाकात बसलेला. नदीतला लांबसडक फडफडता पाणगा मासा अजून डोळ्यासमोर उभा राहतो. रानकोंबडी विस्तवावर भाजून फासटून अनेकदा चटणी मीठावरोबर खाल्लेली. जनसामान्याला सुईदोऱ्यापासून प्रत्येक किडकामिडकासाठी किती गरजवंत व्हावे लागते याचा अनुभव मी अनेकदा घेतला आहे. उच्च शासकीय अधिकारी बनल्यावर त्याचेही विश्व मी पाहिले. आणि दोन्ही विश्वातील दरी लक्षात आली. मार्तीतून आलेले अनेक अधिकारी कष्टकऱ्यांसाठी झटले आहेत. ते देखले धन मी जिल्हाधिकारी देशमुख आणि दिलीप पवारांच्या रूपाने व्यक्त केले आहे.

भाषेचा अस्सल बाज हा झाडाझडतीचा गाभा आहे. त्यातल्या अनेक ओव्या, पावसाची गाणी आईच्या मांडीवर डोकं ठेवून चांदण्या रात्री खळ्यावर ऐकली आहेत तर बैलांच्या अंगावर चाबकावरोबर हासडली जाणारी शिवी रामनामासारखे जपणारे इरसाल गावकरीही जवळून पाहिले आहेत. श्रावणातल्या पोत्या, डफावरची गाणी, शायरी, कवने, जत्रेतले तमाशे यांच्या संस्काराने माझी भाषा समृद्ध झाली. मुंबईत एकदा एकाने शिव्यांचा खाजगी कोष दाखविला. तो वाचल्यावर आमच्या नेर्ल्याच्या अस्सलपणामुळे तो मला अगदीच बाळबोध नि मुळमुळीत वाटला. कादंबरीतील म्हणी आणि वाक्प्रचारांचा विस्तृत आढावा डॉ. वांदिवडेकरांनी आपल्या लेखात घेतला आहे. खरे तर 'झाडाझडती' हा शब्दही अनेक मराठी शब्दकोशांत सापडत नाही. ज्ञानेश्वरीत मात्र आढळतो. त्यामुळे ज्ञानोबा तुकोबा हे लोकजीवनाशी किती जवळचे होते याची प्रचीती यावी.

'झाडाझडती'ने मला खूपच यश दिले. परवाच कोल्हापूर जिल्ह्यातून राधानगरीहून एका अधिकाऱ्याचा फोन आला. धरणासाठी जागा संपादन करायला गेलेल्या अधिकाऱ्यांना गावकऱ्यांनी वेढा घातला. प्रश्न केला, "तुमच्यातल्याच एकाने 'झाडाझडती' लिहिलीय ती तुम्ही वाचलीत का? - नसेल तर वाचा. मगच आमची गावे धरणाच्या डोहात बुडवायला या." तो अधिकारी विचारात होता, "अरे, ते पुस्तक लिहून लोकांच्या हाती कोलीत कशाला दिलेस?" अर्थात या 'कोलीत'चा - ठिणगाचा आशय, अस्सल सामाजिक दस्तऐवजावर आधारलेला आहे. सत्याच्या घसघशीत स्पर्शाने ती नव्या निसर्ग नियोजनाचे प्रश्न घेऊन समूहचित्राच्या थाटाने उभी आहे. तिच्या मशालीतल्या अनेक ठिणग्या भविष्यातही जाणवतील याची खात्री तर आहेच आहे.

विश्वास पाटील, १२ बंगला, कोपरी कॉलनी, शरायती - १७, ठाणे (पूर्व) ४००६०२

(जन्म - २८/११/१९५९. इयत्ता १० वीत असताना तरुण भारतच्या कथास्पर्धेत कायदा या कथेला बक्षीस. सकाळमध्ये उपसंपादक, नाटककंपनीत एक वर्ष नट म्हणून काम. १९८० बी.ए. झाल्यावर लोकसेवा आयोग परीक्षा उत्तीर्ण. उपजिल्हाधिकारी म्हणून निवड. एम.ए.बी.एल.एल.बी.)
कादंबऱ्या - क्रांतिसूर्य, पानिपत, पांगिरा, झाडाझडती अनेक पुरस्कार.)

रवींद्र शोभणे

# कोंडी

'प्रवाह', 'रक्तध्रुव', 'कोंडी', 'चिरेबंद' आणि 'सव्वीस दिवस' या माझ्या पाच कादंबऱ्या आतापर्यंत प्रकाशित झालेल्या आहेत. प्रत्येक कादंबरीच्या संदर्भात मी विषयाचं आणि आशयाचं वेगळेपण (माझ्यापुरतं तरी) पाळत आलो; विषयाची पुनरुक्ती होऊ नये, लेखनात तोचतोपणा येऊ नये हे भान मी या पाचही कादंबऱ्यांच्या संदर्भात पाळलं; तथापि माझी म्हणून, सर्वार्थानं मला आवडलेली म्हणून आणि कादंबरीकार म्हणून मला लौकिक मिळवून देणारी कादंबरी म्हणून कोंडी या कादंबरीचीच या क्षणी मी निवड करीन.

'कोंडी' ही माझी तिसरी कादंबरी. पहिली 'प्रवाह' कच्चेपणाची, नवखेपणाची साक्षीदार आहे. 'रक्तध्रुव 'मध्ये थोडासा वेगळा विषय दबकत, बिचकत मांडण्याचा प्रांजळ प्रयत्न होता. या दोन कादंबऱ्यांनंतरही मी सशक्त अशा नव्या विश्वाकडे, आशयाकडे वळण्याची, अशा वळण्याला कारण ठरणाऱ्या एखाद्या घटनेची, निमित्ताची वाट पाहत होतो. या काळापर्यंत 'कादंबरी' या वाङ्मयप्रकाराविषयीची माझी जाण बऱ्यापैकी प्रगल्भ झाली होती, या प्रकारातलं बरंवाईट नीटपणे हेरता येत होतं, आत्मपरीक्षणाची निश्चित बैठकही तयार झाली होती.

'कोंडी 'च्या लेखनासाठी जी घटना मला स्फूर्तिदायी ठरली, निमित्तमात्र ठरली ती घटना १९८१-८२ च्या दरम्यान घडलेली होती. त्या घटनेसंबंधीचा तपशील देताना माझ्या वाङ्मयीन पिंडाच्या विकासासाठी माझ्या अवतीभवतीची परिस्थिती, परिसर मला कशा प्रकारे सहाय्यीभूत झाला, ते इथे नमूद करणे इष्ट ठरेल.

चारपाचशे घरांच्या, दोन हजार लोकवस्तीच्या खेडेगावातला माझा जन्म. वीसएकवीस वर्षांपर्यंतचा काळ या खरसोली नावाच्या गावातच गेला. गावाच्या अवतीभवतीची जमीन बऱ्यापैकी पिकाऊ. संत्रा, गहू, लिंब, केळी अशी ओलीताची पिकं देणारी. गावाच्या कुशीतून वाहणारी बऱ्यापैकी नदी. गावाजवळ या नदीच्या पात्रात एक द्वीप तयार झालेलं. नदीच्या काठावर गावाला लागून बाभूळबन, आंबराई. गावाच्या समोर नागाझिरीची टेकडी. या टेकडीला गावात 'बरड' म्हणतात. गावात यायचं तर ही टेकडी उतरूनच. आमच्या घरी वडील आणि काका मिळून सव्वा चार एकर शेत. घरी छोटंसं किराणा मालाचं दुकान. वडील, आजी दुकान संभाळायची. आई,

काकी शेतात खपायच्या. काकांचा पिढीजात शिवणकामाचा व्यवसाय. आम्ही चार भावंडं. दोघे भाऊ व दोघी बहिणी. मोठ्या बहिणीनंतरचा मी. गावात, नातेवाईकांमध्ये उनाड, वाया गेलेलं कार्ट म्हणून माझी ख्याती. शाळा बुडवून दिवसदिवसभर नदीच्या पाण्यात, डोहात, पुरात पोहण्याची हौस. कपडे काठावर ठेवलेले. शेजारचा मुलगा किंवा चुलतभाऊ नजर चुकवून काठावर ठेवलेले कपडे घरी घेऊन जायचा. मग संध्याकाळी नाईलाज म्हणून दिगंबरावस्थेत घरी जायचं आणि भरपूर मार खायचा; पण हे पोहणं सुटत नव्हतं. वडील भाविक. वारकरी. गुरुदेव संप्रदायातले. कुणा एका ज्योतिषानं माझा मृत्यू पाण्यात वर्तवला होता म्हणून आईवडिलांना अधिकच भीती. पण गावातले सगळे टगे, टवळे, टवाळखोर आपले जानी दोस्त. मग कुणाला ज्योतिषाच्या भविष्याची चिंता? नदीचा पूर ओसरू लागला की आमच्या उड्या पडल्याच. होळीमध्ये लाकडं टाकायला जणू पैज लागायची. दूरदूरच्या शेतातून मोठमोठी लाकडं, ओंडकी चोरून, पळवून आणण्यात जणू स्फुरण चढायचं.

ही मित्रमंडळी निरनिराळ्या जातीतली. महार, मांग, गोंड, चांभार, कोळी, कुणबी, शिंपी, तेली अशा जातींमधली. जातीपातींचा कुठलाही विधिनिषेध नव्हता. दिवसातला बराचसा वेळ मांगपुरा, महारपुरा, गोंडपुरा, चांभारांची घरं, शिंप्यांचा वाडा इथेच जायचा. या मित्रांमध्ये काही वयाने मोठे तर काही लहान. मोठ्यांचा आदर्श घेणे आणि लहानांना गुरुपाठ देणे ही अव्याहत प्रक्रिया. या दोस्तांमधला मारुती फुसे हा महत्त्वाचा दोस्त. सगळ्याच बाबतीत माझ्यापेक्षा सरस. ('कोंडी'मध्ये येणारा दारू गाळण्याचा प्रक्रिया ही त्यानंच नंतर सांगितलेली.) आमच्या या टोळक्यात गोंड जमातीतला एक धष्टपुष्ट असा मुलगा होता. त्याचं नाव विश्वनाथ; पण त्याला गावात इसिनाथ म्हणायचे. किसन आणि बिसन हे त्याचे मोठे भाऊ. पैकी किसन हा नागपूरच्या कर्नलबागमध्ये नावाजलेला दादा आहे, असं सांगायचे. हा इसिनाथ माझ्यापेक्षा किंवा मारुतीपेक्षा तीनचार वर्षांनी मोठा. काळा. तुकतुकीत कांतीचा. रेड्यासारखी शक्ती आणि सशासारखी चपळाई असलेला. तो हळूहळू गावात भुरट्या चोऱ्या करू लागला. मध्यंतरी तो अशाच आरोपांखाली कैदेतही जाऊन आला. गावात हळूहळू त्यांचा दबदबा निर्माण झाला होता. रस्त्यात तो दिसला की त्याच्या समोरून जायला गावकरी घाबरत.

हळूहळू मी शिक्षणात रमलो. नरखेडच्या कॉलेजातून बी. ए. पास झालो आणि एम. ए. साठी नागपूरला आलो. होस्टेलला राहत होतो. अचानक एक दिवस गावाहून कुणीतरी सांगत आलं - 'गावात भर चौकात उन्हाळ्याच्या दिवसात रात्री दहा वाजता गावातल्याच दोन मुलांनी या इसिनाथचा खून केला' म्हणून. चौकात पाटलाच्या वाड्यात व्हिडिओवर सिनेमा सुरू होता. इसिनाथला या दोन पोरांनी तिथून बाहेर बोलावलं. त्याला भरपूर दारू पाजली आणि मग त्याच्या मस्तकात दारू भिनल्यावर या दोघातिघांनी त्याच्या डोळ्यात मिरची पावडर फेकली आणि गुप्तीनं त्याच्या पोटावर सपासप वार करून त्याचा कोथळाच बाहेर काढला. गावातल्या पाचपन्नास माणसांसमोर इसिनाथचा असा खून झाला होता.

इसिनाथच्या मृत्यूची बातमी ऐकून मी सर्दच झालो. क्षणभर शहारलोच. माझ्या गावात ही अशी घटना घडली होती. असा भीषण खून मी पहिल्यांदाच गावात झाल्याचं ऐकत होतो. क्षणभर वाटलं,

गाव असं वेगळ्या अर्थानं, वाईट वळणानं बदलत आहे.... आणि हा क्षणच 'कोंडी' साठी निमित्तमात्र ठरला.

आतापर्यंतच्या लेखनात - काही कथा, ललितलेखांतून - हे गाव, परिसर, इथली माणसं येत होती. पण ती अशी तुकड्या तुकड्यात. हे सगळं सलगपणे मांडायचं खूप दिवसांपासून मनात होतं; पण हा पट मांडायला कुठेतरी मी वाट शोधीत होतो. 'रक्तध्रुव' किंवा 'प्रवाह' मध्ये तो कधी क्षीणपणे तर कधी तुटकपणे आलेला होता.

केवळ इथला परिसर, इथली माणसं मांडणं, ते सगळं फोटोग्राफिकपणे उभं करणं एवढाच केवळ उद्देश नव्हता. तर जीवनदर्शनाबरोबरच लेखकानं जीवनाचा अन्वय लावणं, घटितातून आणि जीवनदर्शनातून सच्या कलावंताची स्वतःची जीवनविषयक दृष्टी, अन्वयार्थ प्रतीत होणे, हे अस्सल कलाकृतीचं लक्षण ठरतं, ही सजगता या क्षणापर्यंत आली होती; आणि म्हणूनच या घटिताचा केवळ यथास्थित पातळीवर विचार न करता आपल्याला किती खोल डूब घेता येते आणि शेवटी आपल्या हातात काय येतं, याचाच विचार मधली पाचसहा वर्षे करीत होतो.

या काळात मोठं स्थित्यंतर सूक्ष्मपणे, संथपणे घडत होतं. ग्रामीण परिसर आमूलाग्रपणे बदलत होता. तो आपली कात टाकून शहरी जीवनाला बराचसा सन्मुख होत होता. आचारविचार बदलत होते. वेष - भाषा बदलत होती. दळणवळणाच्या आणि लोकानुरंजनाच्या माध्यमाने शहर-खेडे हा भेद हळूहळू मिटत होता. या बाह्य परिवर्तनाबरोबरच ग्रामीण मानसिकताही बदलत होती. जीवनमूल्ये, जीवनादर्श बदलत होते. जीवनविषयक निष्ठांना तडे जाते, हादरे बसत होते. पूर्वीचं गाव आता गाव राहिलं नव्हतं. गावातला माणूस भोळाभाबडा राहिला नव्हता. माणसामाणसांमध्ये एक दरी निर्माण होत होती. या सगळ्या चिंतनातून, अनुभवातून, अवलोकनातून हळूहळू हे जीवनदर्शन, हे घटित आकार घेऊ पाहत होतं.

नकळतपणे या लेखनाच्या केंद्रस्थानी एका वयात येणारा, अंतर्बाह्य बदलांच्या सीमारेषेवर उभा असलेला एक उत्कट मुलगा उभा राहिला. तो वसंता. (पहिल्या लेखनात 'बापू' होता; पण 'गारंबीचा बापू' असल्यामुळे हे नामांतर झाले.) हा वसंता उनाड, हाताबाहेर गेलेला दाखविण्यासाठी त्याला शक्य तेवढा संवेदनाक्षम दाखविणं आवश्यक होतं. हे त्याचं संवेदनाक्षम असणं त्याच्या भौतिक, आर्थिक परिस्थितीवर अधिक निर्भर व्हायला लागलं, तेव्हा गणपत - कौसी - भागीबुढी - निर्मला अशी कौटुंबिक चौकट त्याच्याभोवती उभी राहिली. हा वसंता आर्थिक परिस्थितीचा शिकार झालेला आहे, म्हणून कामाला वाघ असणाऱ्या गणपतचे हातच थ्रेशर मशीनमध्ये सापडून तो बेफाम होतो. खरं तर ग्रामीण भागात शिरलेल्या यंत्रयुगाची ही विदारकता इथे जन्म घेऊ पाहत होती. गणपतचे दोन्ही हात मनगटापासून कापले जातात. गणपतचं हे असं पांगळं होणं जेवढं वास्तव - दृश्य पातळीवरचं, तेवढंच ते माझ्यासाठी प्रतीकात्मक ठरू पाहत होतं. नवं आत्मभान आलेल्या या नव्या पिढीचा वसंता एक प्रतिनिधी. चार बुकांमधून, पाहण्याऐकण्यातून हे आत्मभान अधिक सजग होऊ लागलेलं; आणि म्हणून तो आपल्या बापाचे हात ज्या मालकाच्या कामावर तुटले त्या शामराव पाटलाला नुकसान भरपाई मागायचा सूर काढतो. न कळत इथूनच स्थितिशील जुनी पिढी आणि नव्या आत्मभानानं जीवनाला सामोरी जाऊ पाहणारी नवी पिढी हा संघर्ष उभा राहतो. (दीपक घारे यांनी 'आजच्या यंत्रयुगातला

ग्रामीण मालक - मजूर संघर्ष' अशी अपेक्षा म. टा. मधील परीक्षणात केली होती; पण संपूर्ण कादंबरीला असा आकार देणं म्हणजे नागरी दृष्टिकोनाचं रोपण त्यावर करणं होय. कारण ग्रामीण मजूर संघटनाच या यंत्रणेत कुठे अस्तित्वात नाही. असो.) या संघर्षाचे नंतर काही पदर या ना त्या निमित्ताने उभे राहतात. ग्रामीण जीवनसंघर्ष हा बराचसा शारीरिक पातळीवर, बलाबलावर अवलंबून असतो. बौद्धिक, भावात्म असा संघर्ष इथे मला अशक्य वाटत होता. म्हणून मग वसंताचा वसंता पैलवान होतो. वसंताचं पैलवान होणं ही या व्यक्तिमत्त्वाची मूलभूत गरज वाटत होती. तो अशक्त असणं, केवळ बौद्धिक असणं हे इथे अशक्यप्राय ठरणारं होतं.

एखादा अनुभव सतत फिरता ठेवून, त्या अनुभवाचे इतर पदर उकलत तो अनुभव, ती अनुभवावस्था अधिक व्यामिश्र, अनेकपदरी अशी तपासून पाहणं आवश्यक ठरतं. यातच जर नायक - नायिका पौगंडावस्थेतील असेल तर तिचे इतर पदर अधिक हळुवारपणे उकलत जाणे, हे लेखकाला मोठं आव्हान ठरतं. इतर पदर तपासताना कुठे ते भडकपणे किंवा रंजनात्मकरीत्या येण्याची भीती अधिक असते. अशा वेळी लेखकाला बरेचदा प्रतीकात्मकतेचा, सूचकतेचा आश्रय घ्यावा लागतो. वसंताच्या अंतर्बाह्य शारीरिक, दैहिक बदलांसाठी मला वेळोवेळी प्रतीकात्मकतेचा आश्रय घ्यावा लागला.

हा वसंता रंगवताना तो बराचसा माझ्यातूनच, माझ्या अनुभवातूनच घडत गेला. मारत्या उभा करताना नकळत मारुती फुसे समोर उभा ठाकला. आणि मग या दोन्ही समांतर व्यक्तिरेखांचा छायाप्रकाशाचा खेळ सुरू झाला. या दोन्ही व्यक्तिरेखा समांतरपणे रंगविताना दोन मित्रांच्या मैत्रीच्या संबंधांची कथा होऊ नये, त्या वळणावर ही कादंबरी जाऊ नये ही दक्षता घेणं आवश्यक होतं. म्हणून त्या व्यक्तिरेखा कुठेही एकमेकींना छेदू नयेत, ही तारेवरची कसरत होती.

यात आणखी एक धागा येऊन मिळतो तो मथुरा - विठोबाचा. विदर्भात फार पूर्वीपासून बहुरूपी व्यवस्था आहे. वर्षातून आठ महिने बायको-मुलांसह गावोगाव फिरून बहुरुप्यांची ही माणसं मी खूप पूर्वीपासून पाहत होतो. या ठिकाणी अनावरपणे ही व्यवस्था पुन्हा उभी राहिली. तरणी मथुरा आणि तिचा बाप हे या व्यवस्थेचे प्रतिनिधी. मथुराच्या येण्याला इथे कुठला अर्थ आहे का? तिचा आणि मुख्य व्यक्तिरेखेचा कुठे संबंध जोडता येतो का? यातूनच आदिम प्रेमभावनेचा एक पदर हाताशी आला. ग्रामीण माणसाचं प्रेम आणि त्यातून व्यक्त होणारी तिथली मानसिकता या निमित्ताने पुन्हा तपासून पाहता आली. हे प्रेमही बदलत्या मूल्यसंस्कृतीचं एक प्रतीक ठरावं. (दीपक घारेंना म्हणूनच कदाचित ही कादंबरी रंजनात्मक वाटली असावी.) पण या उपकथानकातून उभी राहते ती विठोबाची दारुण अशी शोकांतिका. त्याचा सुन्न करणारा शेवट. ग्रामीण व्यवस्थेत सुसरीसारखी शिरणारी गुंड प्रवृत्ती, घोरपडीसारखी घट्टपणे रुतून अधिक घट्ट होणारी राजकीय व्यवस्था. इथली राजकीय व्यवस्था, सत्तास्पर्धा अगदी मर्यादित असली तरी तिचे विदारकत्व, क्रौर्य, अमानुषी रूप नाकारता येत नाही. याच पातळीवर मग रामदास पाटील, शामराव पाटील, बादशा आणि वसंता ही आणखी वेगळी चौकट उभी राहते. खरसोलीत बादशाचं येणं हे केवळ बादशापुरतंच मर्यादित राहत नाही. तर या अनुषंगानं नागरी जीवनातील कुप्रवृत्तींना, दुष्प्रवृत्तींना ग्रामीण व्यवस्था न कळतपणे कशी आमंत्रण देते आणि एकदा या दुष्प्रवृत्तीची मुळं विषवृक्षांच्या मुळांसारखी जमिनीत पसरू लागली की,

त्याचा विखारीपणा बादशाच्या कृतींतून दृश्य होत जातो. मग मथुराचा खून ही एक अटळ घटना होऊन बसते. या पार्श्वभूमीवर मथुराला आणि विठोबाला चितारताना मूळ हेतू कुठे बाजूला पडू नये, ही काळजी घेणं मला आवश्यक वाटत होतं. वसंता - मथुरा प्रेमप्रकरण हे या उपकथानकाचं मुख्य उद्दिष्ट मुळी नव्हतंच.

बदलत्या ग्रामीण समाजव्यवस्थेला गोचर पातळीवरचा आणखी एक महत्त्वाचा बदल म्हणजे बदलती राजकीय चौकट. त्यातून जन्मास येणारे अराजक. बदलत जाणारे सत्ताकेंद्र आणि फिरत राहणारे अराजकत्व. ग्रामीण वर्चस्वाच्या मूळ भावनेतून इथल्या सत्तास्पर्धेचा जन्म होतो. आणि अराजकाला ही सत्ताकेंद्रे साधन म्हणून हाताळत असतात. कुठल्याही पातळीवरील सत्ताकेंद्रांचा आणि अराजकत्वाचा विचार केल्यास केवळ पातळीचाच फरक जाणवतो. स्वरूप तेच असते. 'कोंडी'च्या मूळ लेखनाशी हा धागा अधिक प्रकर्षाने माझ्यासमोर होता आणि हा सगळा व्यक्ती - घटनांचा पसारा मांडताना मूळ लक्ष्य कुठेही सुटू नये, हा विचार सातत्याने या लेखनाच्या सबंध प्रक्रियेत करणे मला महत्त्वाचे वाटत होते.

यातील वसंताची व्यक्तिरेखा ही विकसनशील व्यक्तिरेखा आहे. ही व्यक्तिरेखा सातत्याने द्वंद्वात्मक पातळीवर वावरत असते. वसंताचा अंतर्बाह्य स्वाभाविक विकास हे या व्यक्तिरेखेचं मूळ वैशिष्ट्य. मग या व्यक्तिरेखेच्या मागणीनुसार मारत्याची व्यक्तिरेखा साम्य - विरोध तत्त्वानुसार बदलत जाते. मारत्याच्या व्यक्तिमत्त्वातील बदल हा वसंताच्या व्यक्तिमत्त्वाची गरज ठरते. पूरक ठरते. बाह्यात्कारी बदलांपेक्षा वसंताचा अंतर्गत बदल हा खूप हळुवारपणे, संथपणे होत जातो. पिता - पुत्र, माता - पुत्र, बहीण - भाऊ हे वसंताचं त्याच्या घरच्या मंडळींशी असलेलं नातं सतत संघर्षरूपच असतं. प्रेम आणि राग अशा पातळीवरच हे नातं सतत टिकून राहतं. हे नात्याचे दोर कधी सैल होतात, तर कधी अधिक घट्ट होतात. आईचा समजूतदारपणा, सोशिकपणा, तिचा कर्तेपणा संपूर्ण कादंबरीभर व्यापून उरतो आणि वसंताच्या बरोबरीनं कौसीही कादंबरीत महत्त्वाची ठरू लागते. कौसीच्या रूपानं ग्रामीण समाजव्यवस्थेतली सर्वसामान्य माता सर्वार्थाने उभी राहते.

आपल्या कुटुंबापासून दुरावलेला वसंता, रामदास पाटलानं अव्हेरल्यानंतर, पुन्हा आपल्या घरी येतो. आई - बाप - बहीण यांचे त्याच्याशी असलेले नाते निर्विकल्पपणे पुन्हा प्रस्थापित होते. वसंताही सत्प्रवृत्तीनं जगण्याचा, सामान्य माणसासारखा स्वतःचं घर उभं करण्याचा प्रयत्न करतो आणि याच वेळी कादंबरी वेगळ्या संघर्षावर उभी राहते. बादशा पकडला गेल्याचं कळतं. वसंता सत्प्रवृत्त होतो. पण ही अशी शांतता या बदलत्या ग्रामीण व्यवस्थेला जणू खुपू लागते. अराजकत्वाचं, गुंडप्रवृत्तीचं अराजकाचं हे चक्र फिरत राहतं.

'कोंडी'तील तिसऱ्या भागातला संघर्ष हा सत्ताकेंद्राच्या, अराजकत्वाच्या बदलाभोवतीचा संघर्ष ठरतो. कोंडीत येणारा कालखंड किमान एक दशकाचा आहे. दहा वर्षातले हे बदल टिपणं, या बदलांना मूळ पार्श्वभूमीवर पुनःस्थापित करणं आवश्यक होतं.

'कोंडी'च्या पहिल्या - दुसऱ्या लेखनात मूळ प्रेरक घटनेला धरून मी वसंताचा तसाच खून दाखवला होता; पण हस्तलिखित वाचून श्री. मनोहर तल्हार, डॉ. भा. ल. डोळे, डॉ. वि. स. जोग, प्रा. या. वा. वडस्कर इत्यादी जाणकारांनी या शेवटावर आक्षेप घेतला. 'हा शेवट खोटा वाटतो' म्हणून.

नंतर मलाही पटले. माणसं मेल्यानं किंवा मारल्यानं मूळ संघर्ष सुटत नाही, तर विजीगिषुवृत्तीनं माणसांनी सामोरं जाणं, प्रचंड जीगिषेनं जीवनाला कवटाळणं कलाकृतीच्या उंचीसाठी उपकारक ठरतं. शिवाय कादंबरीच्या प्रारंभाचा धागा, मांडलेल्या समस्येतून उत्क्रांत होत जाणारा शेवट मला हवा होता. गणपतचे हात कटल्यामुळे तो निकामी होतो, तर अंगानं धडधाकट असूनही वसंता या व्यवस्थेत पांगळा ठरतो. तेव्हा मुळातून त्याचं घर जळून खाक होणं, तो सर्वार्थानं उद्ध्वस्त होणं हे अधिक प्रत्ययकारी ठरणारं होतं. म्हणून कादंबरीच्या तिसऱ्या लेखानात हा शेवट निश्चित झाला.

या कादंबरीचं पहिलं लेखन ६ ऑगस्ट १९८७ ला सुरू केलं. पहिलं लेखन हे पहिल्या ८० - ८१ पानांपर्यंतचं होतं. यात गणपत जातीनं शिंपी दाखवला होता. या धंद्यातला संघर्ष होता (तोपर्यंत 'पाचोळा' वाचलेली नव्हती. तल्हारांनी हे निदर्शनास आणून दिलं, तेव्हा संघर्षाची पार्श्वभूमीच बदलली.) दुसरं लेखन साधारणतः ऑक्टोबर १९८७ पासून १४ एप्रिल १९८८ पर्यंत चाललं. मित्रांना, जाणकारांना वाचायला देणं, त्यांच्या प्रतिक्रिया जाणून घेणं, हे सुरू झालं. तिसरं लेखन ९ ऑक्टोबर १९८८ ते ६ मे १९९० या दरम्यान झालं. या पुनर्लेखनात, परिष्करणात सुटलेले दुवे, अस्पष्ट - धूसर पदर शोधता आले. पहिल्या लेखनात शीर्षक दिलं - 'व्यवस्था', पण ते खूपच कोरडं आणि ग्रांथिक वाटू लागलं. नंतर 'चरक' हे शीर्षक दिलं; पण हे शीर्षकही फारसं समाधान देत नव्हतं. 'संगर', 'साकडं' अशी काही नावं सुचत होती. शेवटी 'कोंडी' हे शीर्षक अधिक समर्पक वाटलं आणि तेच पक्कं केलं.

गोव्याला फिरायला गेलो असताना परतताना कोल्हापूरला आलो. मेहता पब्लिशिंग हाऊसच्या श्री. अनिल मेहतांची भेट झाली. 'नवीन काय?' म्हणून त्यांनी विचारलं. मी 'कोंडी'चा संदर्भ दिला. मेहता म्हणाले, 'पाठवून द्या.' (यापूर्वी मेहतांनी माझी 'रक्तध्रुव' काढली होती.) चार महिन्यात मेहतांचं पत्र आलं. कादंबरीवर चर्चा करायला या. त्यांना कादंबरी आवडली होती. पुन्हा कोल्हापूरला गेलो. सौ. चारुलता पाटील यांच्याशी चर्चा ठरली होती. सलग तीन - चार तास चर्चा झाली. काही सुटलेले दुवे, धागे त्यांनी सुचविले. काही शंका व्यक्त केल्या. काही त्रुटी दाखवून दिल्या. 'शीर्षक बदलता का?' म्हणून त्यांनी विचारलं. आता दुसरे कुठले शीर्षक सुचणार? म्हटलं, 'यापेक्षा चांगलं शीर्षक सुचलं तर बघतो'. पण पुढे काही सुचेना. 'निवडुंग' 'दलदल' अशी शीर्षकं सुचत होती. शेवटी 'कोंडी' माझीही झाली होती.

आनंद यादवांनी ब्लर्ब लिहायचं कबूल केलं होतं. आर्थिक व्यवहार, करारमदार झाले आणि शेवटी नोव्हेंबर १९९२ मध्ये मेहतांनी कादंबरी प्रकाशित केली. (शोभणेला मोठे प्रकाशक भेटतात. म्हणजे तो या प्रकाशकांना पैसे देऊन पुस्तके छापून घेत असावा, अशी बोलवा होती.) अर्पणपत्रिका वाचून बायको खूष झाली. पहिली कादंबरी गावाला अर्पण केली, दुसरी आईवडिलांना. आता तर तिचाच अधिकार होता!

'कोंडी' प्रकाशित झाली आणि चांगल्या, बळ वाढविणाऱ्या प्रतिक्रिया वाचक-समीक्षक, जाणकार मित्रमंडळी कळवू लागली. डॉ. चंद्रकांत वांदिवडेकर, आनंद यादव, कीर्ती मुळीक, जयवंत दळवी, मधु मंगेश कर्णिक, डॉ. आशा सावदेकर, डॉ. भालचंद्र नेमाडे, ग्रेस, राजदत्त, सदानंद देशमुख, किशोर सानप इत्यादी जाणकार सुहृदांचे अभिप्राय आले. मनोहर तल्हारांनी 'या दशकातली

ही महत्त्वाची कादंबरी आहे' असा उल्लेख परीक्षणात केला. डॉ. भालचंद्र नेमाडे यांनी १९९३ मध्ये फ्रान्स येथे भरलेल्या नॅशनल बुक फेअरसाठी दोन वर्षाच्या सर्वोत्कृष्ट पंधरा मराठी पुस्तकांमध्ये 'कोंडी'ची निवड केली. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, दीपक घारे, डॉ. संध्या अमृते, कल्पना व्यवहारे, कीर्ती मुळीक इत्यादींनी मनस्वीपणे त्यावर लिहिलं.

पुण्याच्या म. सा. प. चा ग. ल. ठोकळ पुरस्कार, गोव्याच्या कालिका प्रकाशनाचा नाथमाधव पुरस्कार, रोहमारे ट्रस्टचा भि. ग. रोहमारे पुरस्कार आणि महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार असे चार पुरस्कार या कादंबरीला मिळाले.

'कोंडी' चं हे यश तिच्या कुवतीनुसार मिळालेलं; पण 'ललित'च्या मे १९९४ च्या अंकात सौ. मंगला आठलेकर यांनी 'कोंडी'चा उल्लेख (माझ्या नावासह) रतीब घालणारे लेखक असा कादंबरी न वाचताच केला. अ. भा. साहित्य संमेलनाच्या एका भूतपूर्व अध्यक्षांनी लेखकाचं कुठेही साधं नाव न टाकता (शीर्षकापासून तर शेवटापर्यंत) एक दयनीय परीक्षण लिहून जबाबदारी झटकून टाकली. ही प्रवृत्ती खरंतर लेखकाच्या परिश्रमावर बोळा फिरवणारी आणि अन्यायकारक आहे; पण अशीही प्रवृत्ती सर्वमान्य आहे, या उदाहरणांवरून स्पष्ट झाले.

'कोंडी'ला कालिका प्रकाशनाचा नाथमाधव पुरस्कार मिळाला आणि माझ्यासमोर एक नवं संकट उभं राहिलं. कुण्या एका शेंबड्या पोरीनं 'गाव तिथं महारवाडा' या वाक्याला चिमटीत पकडून मला चक्क जातीयवादी, दलितविरोधी ठरविण्याचा चंग बांधला. एक पत्रक काढून ती अनेकांकडे स्वाक्षरी मागायला गेली. प्रत्येक वर्तमानपत्रातल्या वार्ताहर - पत्रकारांना ठाऊक असल्यामुळं ती मुलगी निराश झाली. मग माझ्याकडून माफीपत्र लिहून घ्यायला घरी आली. 'ही म्हण वापरताना मी तमाम दलितांना वाईट म्हटलं' हा तिचा सूर. तिची समजूत घालून, खुलासा करून मी तिला परत पाठवलं.

'कोंडी'च्या निमित्तानं माझं नंदनवन, भावविश्व उभं राहिलं. कादंबरीकार म्हणून मला नाव मिळालं. पारितोषिक, सन्मान मिळाले. गळ्यात हार - शाली पडल्या.

या 'कोंडी'च्या शेवटावर आज मी थांबलो आहे. वसंताचं जळलेलं घर मला स्पष्टपणे दिसतं आहे. तिथं पडलेली राख... काळवंडून गेलेल्या भिंती ... जळून कोळसा झालेले घराचे वासे... फिनिक्स पक्ष्यासारखा यातून नवा सूर सापडतो का? सबंध ग्रामीण समाजव्यवस्थेची मोठी नाळ पुन्हा हातात येते का? ती आली तर कशी असेल? कादंबरी त्रयी म्हणून की वेगळ्याच अंगाने?

हा तर न संपणारा शोध आहे आणि ही न संपणारी वाट आहे.

प्रा. डॉ. रवींद्र शोभणे, १६, पंचदीप नगर, कोकाकोला फॅक्टरीमागे, वर्धा रोड, नागपूर - ४४० ०२५

डॉ. रवींद्र केशवराव शोभणे, एम. ए. (मराठी), बीएड. पीएच. डी. धनवटे नॅशनल कॉलेज, नागपूर
प्रकाशित पुस्तके :
कादंबऱ्या : प्रवाह (१९८३), रक्तध्रुव (१९८९), कोंडी (१९९२), सव्वीस दिवस (१९९६), चिरेबंद (१९९५)
कथासंग्रह : वर्तमान (१९९१), कथांजली (संपादित १९९२), दाही दिशा (१९९४)
समीक्षा : कादंबरीकार श्री. ना. पेंडसे (१९९६)
सन्मान/ पारितोषिके १) तल्हार स्मृती पारितोषिक (रक्तध्रुवसाठी), २) लोकमत पुरस्कार (ललित लेखनासाठी), ३) साहित्य अकादमीची प्रवासवृत्ती, ४) नाथमाधव साहित्य पुरस्कार ५) रोहमारे साहित्य पुरस्कार, ६) म. सा. प. चा ग. ल. ठोकळ पुरस्कार, ७) महाराष्ट्र शासन पुरस्कार, ८) ग्रंथोत्तेजक पुरस्कार ('चिरेबंद' साठी)
आगामी पुस्तके - १) शहामृग (दीर्घ कथासंग्रह), २) ताजा कलम (कथासंग्रह)

सुहास शिरवळकर

# निदान

प्रत्येक लेखकाची विचार - प्रक्रिया - असेल तर, अर्थात्! - स्वतंत्र असते, आणि त्याची लेखन - प्रक्रियाही, स्वाभाविकतेनुसार, एकमेव असते. म्हणूनच, नवोदित लेखकाला त्याच्या आवडत्या लेखकाची 'स्टाईल' फार तर अनुकरणता येते; विचार - प्रक्रिया नाही!

माझ्या संदर्भात, पुस्तकं न पाहता मतं नोंदवणाऱ्या तथाकथित बुद्धिवंतांचा असा तिखट गैरसमज आहे, की मी सतत उदंडपणे लिहितच असतो! अर्थातच, जो लेखक असं उदंड लिहितो, तो विचार केव्हा करीत असणार, नि त्याच्या लेखनात तो कसा काय असणार! - हे ओघाओघाने, आलंच!

अर्थात, किती अन् किती वेगानं लिहिलं असता, योग्य आहे, असं काही गणित नसतं. तरीही, रहस्यकथा लेखनाचा माझा वेग - पूर्णवेळ लेखनाला देऊन - दरमहा सरासरी दोन पॉईन्ट एकशे सदुसष्ट रहस्यकथा असा होता! आणि कादंबरी लेखनाचा सरासरी वेग वार्षिक चार, इतका आहे! यातच, दीपावली अंकांच्या लघुकादंबऱ्यांचाही समावेश आहे. तेव्हा तर्कदृष्ट्या मला विचार करीत असणाऱ्या लेखकांत समाविष्ट होण्याचा फायदा मिळायला हरकत नाही!

हा मुद्दा मान्य केला, तरच माझ्या पुढच्या लेखनाला अर्थ आहे. अन्यथा, वाचकाने लेख सोडून द्यायला हरकत नाही.

विचार - प्रक्रिया ही अत्यंत क्लिष्ट आणि गुंतागुंत असलेली, आणि एका विवक्षित मर्यादेत बेभरोशी, अनियंत्रित प्रक्रिया आहे. तिचं पोस्टमार्टम दर कलाकृतीनुसार वेगवेगळी फाइंडिंग्ज देईल! उदाहरणार्थ, एकोणीसशे ऐंशीब्याऐंशीच्या दरम्यान केव्हातरी मी गणपतीपुळ्याला गेलो होतो. तेव्हा तिथं इतर हॉटेल्सचा गुंतवळ नव्हता. मंदिराचे पुजारी अन गुरुजीच आल्यागेल्यांची सर्व व्यवस्था पाहायचे. आणि एम. टी. डी. सी. ने पर्यटकांसाठी निवास - स्थानं बांधायला सुरवात केली होती, त्याचे सूक्ष्म पडसाद या जुन्या 'आश्रय' पद्धतीत उमटू लागले होते.

त्या ट्रिपमध्ये मला नक्की काहीतरी खटकलं होतं. कुठेतरी चुकीची सुरवात होत असल्याचा अदृश्य भुंगा भुणभुणला होता. ते जे काही होतं, ते सापडायला - उकल व्हायला मला पंचाण्णव साल उजाडावं लागलं! त्याची परिणती 'अंतर्नाद' दीपावली ९५ च्या अंकांतील 'मुक्काम पोस्ट पर्यटनतीर्थ!' या कथेत झाली.

याचा अर्थ, ऐंशी ब्याऐंशी ते पंचाण्णव - अशी बारा-पंधरा वर्षे मी ती कथा लिहित नव्हतो. प्रत्यक्षात लिहिताना मी ती तीन दिवसांत पूर्ण केली. पण इतर विषय मेंदूत घोळत असतानाच, 'त्या' प्रसंगाची नोंद कुठेतरी सुप्त पातळीवर झाली होती. तो विषय मनात घोळत राहिला होता.

या पंधरा वर्षातली, केवळ 'त्या' कथेच्या संदर्भातली विचार-प्रक्रिया स्वतंत्रपणे उलगडून दाखवणं अशक्यच आहे!

हे एका लघुकथेबाबत सांगितलं मी. कादंबऱ्यांबाबत बोलताना, त्यातील 'करमणूक' हाच हेतू असलेल्या कादंबऱ्या वगळता, बहुतेक कादंबऱ्यांचे विषय मनात विचार वा प्रश्नरूपाने घोळतच असतात. 'आता या प्रश्नाबाबत विचार करू!' अशा क्रमिक पद्धतीनं त्याच्या परामर्श घ्यावा लागत नाही. एखाद्या प्रसंगाने, घटनेने वा अत्यंत सहजपणेही, गुंत्याचं एक टोक हाती लागतं. अशा वेळी मात्र, वैचारिक गुंत्याचा तेवढाच संबंधित भाग सुप्त पातळीवरून जागृत पातळीवर येतो. जाणता - अजाणता झालेलं विचार मंथन - त्यातून वेळोवेळी निघालेले निष्कर्ष... हे सगळं आठवू लागतं. इतर सर्व विषय बाजूला सारून, सदर विषय वेग घेऊ लागतो. इथे निर्मिती प्रक्रियेचा पहिला जागृत टप्पा सुरू होतो!

माझ्या मते, याच टप्प्यावर कादंबरीकाराला धूसरपणे कुठेतरी कादंबरीचा एक आकृतिबंध ठरवावा लागतो. कादंबरीच्या प्रवासाची दिशा ढोबळमानाने तयार होत जाते. कितीही नाही म्हटले, तरी क्राफ्टस्मनशिप ही या पातळीला आवश्यक असतेच! त्याशिवाय 'कथानक' ठरवणं शक्य होणारच नाही.

इथून पुढे मात्र प्रकृतिधर्मानुसार प्रक्रिया बदलते. बरेच लेखक असे आहेत, जे, संपूर्ण कादंबरीचा कच्चा आराखडा तयार करतात. त्यात येणारी पात्रे, त्यांचे स्वभाव, त्यांचे महत्त्व.. यांची टिपणं करतात. आराखड्यानुसार, प्रत्येक प्रकरणात साधारणपणे काय असेल, अशी कथानकाची विभागणी करतात. एकदा ते झालं, की कोणतंही मधलंच प्रकरण एकदम लिहायला घेतलं, तरी त्यांना ते जमतं! आणि इतकं करून, पुन्हा, दोनतीनदा तरी कादंबरीचं लेखन करण्याचा त्यांचा उत्साह असतो!

माझी पद्धत वेगळी आहे. माझ्यापाशी आराखडा - कच्चे खर्डे - पुनर्लेखन ... यासाठी असावी लागणारी सहनशीलता नाही. विषय डोक्यात पक्का तयार होईपर्यंत - त्यात नक्की आपल्याला काय सांगायचं आहे, ते मनात ठसेपर्यंत - मी त्यावर लिहिण्याचा विचारच करीत नाही. पण एकदा विषयाबाबतचा आत्मविश्वास निर्माण झाला - आतूनच लिहावंसं वाटू लागलं, की मी थेट एकदमच लिहायला घेतो. तेच अंतिम.

ढोबळमानानं ज्याला सांगाडा - स्पाईन - असं आपण म्हणतो, तो सांगाडा माझ्या मनात तयार झालेला असतो. त्यानुसार प्रवासाची दिशा निश्चित ठरलेली असते. इतकं असून, सुरवात मनासारखी होण्यात माझी पानं आणि वेळ वाया जातोच; पण एखादा ती जमली, की मात्र उत्स्फूर्तपणावरच माझी संपूर्ण मदार असते!

पहिली पद्धत ही खरं तर जास्त सुरक्षित, आणि वेळ घेणारी असली तरी, जास्त अचूक असू शकेल, असं मलाही वाटतं. सगळं कसं विचारपूर्वक, देखणं... आखीव -रेखीव. प्रेझेन्टेबल. पण

या पद्धतीत उत्स्फूर्तपणा मात्र हरवून जात असावा, असंही मला प्रामाणिकपणे वाटतं! आपणच आपल्यांला - आपल्या विचारांना, अपरिहार्यपणे, कलाकृतीलाही एका विवक्षित चौकटीत वंदिस्त करून घेतलेलं असतं. त्यावाहेर मग आपणच जाऊ शकत नाही. भरकटण्याचा धोका भले शून्य होत असेल, पण चौकटीवाहेरचं बरंच काही चांगलं गमावलं जाण्याची शक्यताही जास्त असते!

मी, म्हणूनच, अशी चौकट आखून घेत नाही. कथानकातली पात्रं आणि त्यांचे स्वभाव पण आधी ठरवून घेत नाही. प्रवासाचा एक कच्चा आराखडा तेवढा मनात सांभाळून, त्या दिशेनं जात राहतो. येणारी पात्रं, कथानकाच्या त्या त्या वेळच्या गरजेनुसार आपापले स्वभाव घेऊन जन्माला येतात; स्वतःच्या स्वभावाशी इमान राखून कादंबरीभर योग्य जागी वावरत राहतात. कधी कधी, हीच पात्रं त्यांच्या स्वभावाने घटना वा पेचही निर्माण करतात.

माझ्या पद्धतीत धोका असा एकच असतो. मूळ कथासूत्रापासून कादंबरी भरकटणे. दूर जाणे. पण कादंबरीतल्या वास्तवावर तुमची पकड असेल, नि तुम्ही अत्यंत तार्किक पद्धतीनेच विचार करीत असाल, तर कोणत्याही परिस्थितीत, कादंबरी भरकटू शकत नाही. मूळ विषयापासून म्हणजे, प्रारंभी तुमच्या मनात असतो तो - ती दूर जाऊ शकलीच, तरी काही हरकत नसते! या पद्धतीत आपल्याला सुरुवातीला अभिप्रेत नसलेलं, पण अधिक चांगलं पूर्णतः वेगळं कदाचित - असंही काही जन्माला येऊ शकतं! अशा वेळी, मूळ विपय पुन्हा विचाराधीन राहतो, किंवा, तो मांडण्याची तीव्रताच नष्ट होऊ शकते! सहसा असं होत नाही. आपल्या मनात नसलेलं एखादं पात्र, नि त्या अनुषंगाने काही घटना, प्रसंग उद्‌भवतात. हे पात्र फार तर लीड स्वतःकडे घेतं. मूळ आकृतिवंधच हरवला, असं फार क्वचित होतं. पण झालंच तर, अधिक छान काहीतरी सृजनाचा आनंदही मिळू शकतो!

माझ्या या विधानाच्या पुष्ट्यर्थ, मी माझ्या 'निदान' या कादंबरीचं उदाहरण देऊ शकतो. मुळात, असाच काय, तो विषयच माझ्या डोक्यात नव्हता! एक नवोदित, होतकरू कथाकार त्याची एक मेलोड्रॅमॅटिक कथाकल्पना घेऊन, माझ्याकडे आला होता. ढोबळमानाने, आयुर्वेदिक वाप आणि ॲलोपॅथिक मुलगा - असा संघर्ष त्याला कथेत रंगवायचा होता. पण त्याला त्या कथानकातली बलस्थानं माहित नव्हती. संघर्षाचे मूळ मुद्दे हाती आलेले नव्हते. मी त्याला त्याची कथा समजावून देऊ लागलो. ती कसा प्रवास करू शकेल ते सांगू लागलो. ते सांगत असताना, मलाच एक विषय नव्याने उलगडत होता. काहीतरी, त्यालाही मूळ कथा सूत्रात अभिप्रेत नसलेलं असं दिसू लागलं होतं.

जवळपास दोनअडीच तास मी त्याला त्या विषयाची मर्मस्थानं विशद करून सांगितली. पात्रं त्यांच्या त्यांच्या स्वभावाने कशी वागतील, ते समजावून दिलं.

आणि या साऱ्याचं फलित काय, तर त्या तरुणाच्या लक्षात आलं, की हा जबरदस्त ताकद असलेला, चांगल्या कादंबरीचा विषय आहे; आपण हे शिवधनुष्य पेलायला पूर्णतः असमर्थ आहोत!

इतकं कळकळीने, रंगून जाऊन, त्याला हे सगळं समजावून देण्याचा हा परिणाम मला अर्थातच अपेक्षित नव्हता. मी त्याला इतकं सांगितलं - 'आत्ता मी सांगितली, तेच - तसंच लिही. मला दाखव. मी तपासतो. आवश्यक ते फेरफार करून देतो.' पण त्याचा नकार ठाम! म्हणाला, 'नाही, मला हे पेलणार नाही! तुम्ही ज्या अँगलनं मला तो दाखवलाय, तो विषय फार वेगळा आहे. तुम्हीच लिहा!'

एका प्रकारे, आता सामोरा आलेला विषय त्याचा नव्हताच! त्याच्या कथासूत्रानं मला विचार










करायला प्रेरणा दिली होती. त्यातून, नवाच विषय - नव्या पैलूने आकाराला आला होता. त्याची कथा कुठल्याकुठे उडाली होती. म्हणजे, लेखनासाठी मीच त्याला नवा विषय मुद्द्यांसह दिला होता. त्याचं सुजाणत्व हेच, की त्यानं लिहायचं नाकारून, माझा विषय मला परत दिला!

'निदान' हे नाव ठरवताना, मी ते 'वैद्यकीय तपासणीचा निष्कर्ष' या अर्थी योजलं होतं. अॅलोपॅथी आणि आयुर्वेद - यातील तात्त्विक फरक.... या दोन्ही पॅथींची तुलना... त्या-त्या पद्धतींचे गुणविशेष व दोष... असे मुद्दे माझ्या डोक्यात होते. पण मुद्द्यांबाबत मी कर्मठ नव्हतो. त्यामुळेच लिहिताना शहरातली रॅकेटस् - रॅकेटसच्या दुष्टचक्रात भरडला जाणाला पेशन्ट - डॉक्टरांचा निष्काळजीपणा - त्यांच्या एकमेकातल्या स्पर्धा आणि वैर... असं चर्चेत अंतर्भूत नसलेलं बरंच काही 'निदान' मध्ये समाविष्ट झालं. बाप तत्त्वनिष्ठ आयुर्वेदिक वैद्य, आणि मुलगा एम्.डी. (का, एम्.एस्.?) डॉक्टर. या संघर्षात आयुर्वेद आणि अॅलोपॅथीची तुलना करतानाच, मला डॉक्टर मुलाची प्रवाहपतित अगतिकता जाणवू लागली. नव्या काळानुसार त्याच्या व्यवसायात उद्भवणाऱ्या अनंत अडचणी कळू लागल्या, ज्या जुन्या काळातल्या वैद्य बापाच्या लक्षात येणार नाहीत व मुलगा बापाला त्या सांगू शकणार नाही! त्याची ही कुचंबणा टोकदारपणे माझ्या मेंदूला कुरतडू लागली. हा डॉक्टर दोन पातळ्यांवर विभागला गेला. एक पातळी मुलाची, ज्याला तात्त्विकदृष्ट्या - नैतिकदृष्ट्या बापाचे आदर्श ललामभूत वाटतात. आणि दुसरी पातळी व्यावसायिक डॉक्टरची, ज्याला हे आदर्श आचरणात आणणं - प्रवाहापासून फटकून राहाणं, केरळ अशक्य असतं. या कात्रीत सापडलेला तो, आपल्या वडिलांना आपल्या कृतीचं समर्थनही देऊ शकत नाही, आणि आपली व्यावसायिक पद्धतही बदलू शकत नाही!

सुरुवातीला मला स्वतःला अभिप्रेत नसलेला, डॉक्टर मुलाचा हा मानसिक संघर्ष - हा 'निदान' या कादंबरीचा केंद्रबिंदू आहे! आणि 'मुलगा व्यवसायात स्थिरावल्यावर, योग्य वेळी, म्हाताऱ्या माणसानं निवृत्त होणं' - हे सर्व कौटुंबिक संघर्ष टाळण्याचं एकमेव सूत्र आहे - असा या 'निदान'चा शेवटी निष्कर्ष निघतो!

नवोदित लेखकाने सांगितलेल्या कथा-विषयावरच समजा मला कादंबरी लिहायची असेल, नि मी त्याच विषयाची चौकट आखून घेतली असती तर 'निदान' मधल्या सर्व स्तरांवरच्या संघर्षानाच आपण मुकतो! आणि ती, 'कोणीही लिहिली तरी चालेल!' अशी एक सामान्य कादंबरी होते.

'निदान' असामान्य आहे; हा विषय यापूर्वी कोणीच हाताळलेला नाही; असा माझा कणभरही दावा नाही! 'मी' तो विषय पहिल्यांदा हाताळला, नि ती कादंबरी मला स्वतःला सृजनाचं समाधान देऊन गेली, हे महत्त्वाचं! 'वाचकांचा कौल' सोडला, तर ती उत्कृष्ट आहे, हे दर्शविणारा, अपेक्षित एकही पुरावा माझ्याकडे नाही, म्हणजे, वृत्तपत्रांच्या समीक्षणांतून ती कोणीतरी नावाजणं... वगैरे. पण, असा तर एकही पुरावा माझ्या एकाही कादंबरीबाबत मला देता येणारी नाही! मी 'वृत्तपत्रीय समीक्षा' - इथेच थांबून 'वगैरे' म्हणालो, ते अशासाठीच, की इतकी तळागाळाची पायरी मला आजही गाठता आलेली नाहीये, तर चर्चा.... पुरस्कार... अशा प्रकारांबद्दल मी कसला बोलतो!

'दखल' या प्रकाराबाबत आता मी दखल न घेण्याइतका शांत झालो आहे. त्याबाबत मला काही म्हणावंसं वाटतच नाही. इतकंच म्हणेन, की मराठी सारस्वताच्या दरबारात जेवढा जातीयवाद आहे, तेवढा क्वचितच, तो अन्यत्र आढळेल! इथली चातुर्वर्ण्य व्यवस्था अशी आहे -

मोठ्या, गाजलेल्या (!) स्वतःचा दबदवा राखून असलेल्या प्रकाशकांचे, वा समीक्षकांच्या बैठकीतले सर्व तथाकथित दर्जेदार साहित्यिक (लेखक नव्हे, साहित्यिक!) हा ब्रह्मवृंद! सर्वांचं शिरकाण करण्याचा, वा आश्रिताला अभय देण्याचा वसा घेतलेले महान समीक्षक हे क्षत्रिय होत!

लेखकांनी 'कला' सांभाळावी ; आम्ही 'पैसा' पाहू - अशा उदात्त विचारांचे प्रकाशक हे वैश्य जमातीत येतात. आणि 'लोकप्रिय' (पण वरील कोणाच्या कृपाप्रसादास पात्र न झालेला!) लेखक हा या दरबाराबाहेरील 'शूद्र' होय! त्याला तक्रार करण्याचा अधिकार नसतो, नि त्याची तक्रार कोणी मनावर घेतही नसतं! वाचकांत प्रिय असण्याच्या त्याच्या अपराधाची त्याला ही शिक्षा असते!

असो. मी हे उद्वेगाने म्हणत नाहीये. मला जाणवलेली वस्तुस्थिती तेवढी मांडतोय. तीही अशासाठी की 'चांगली' कादंबरी म्हटलं, की तिथे 'दखल' हा मुद्दा उपस्थित होणार! मी माझ्या लेखनाबद्दल सांगत असताना, तुमच्या मनात पुन्हा तो येऊ नये! एका बाबतीत मात्र मी प्रचंड भाग्यवान आहे. समस्त लेखकांना 'वाचकांनी' आपल्या लेखनाची दखल घ्यावी, अशी एकमेव इच्छा असते. वाचकांची माझ्या लेखनाची ही दखल वारंवार घेतली आहे. प्रत्येक वाचकाने, कादंबरीचा हेतू ओळखून, त्यानुसार ती घेतली, असं नाही. वाचकांची संख्या जितकी जास्त, तितकं विलक्षण वाचकांचं सरासरीचं प्रमाण घटणारच! पण जेव्हा, माझी 'हिन्दोस्तां हमारा' वाचून एक निष्क्रिय तरुण पी.एस्.आय्. ट्रेनिंग घेऊन सब्-इन्स्पेक्टर होतो. 'अमर विश्वास' या नायकाच्या 'रहस्यकथा' पासून प्रेरणा घेऊन, तरुण मुलं 'लॉ' करून वकील होतात. 'निदान' वाचून कोणा डॉक्टरला स्वतःची आचार-संहिता तपासावी वाटते, 'दुनियादारी' वाचून, मुलांचे आपल्या पालकांकडे पाहण्याचे व पालकांचे पाल्यांकडे पाहण्याचे दृष्टिकोन सामंजस्याचे होतात; आणि जेव्हा, निराशेनं खचून, आत्महत्येच्या टोकापर्यंत गेलेला तरुण, ऐनवेळी माझं कुठलं तरी पुस्तक वाचून, जीवनाकडे परत येऊन, कार खरेदी करण्याइतपत यशस्वी जीवन जगू लागतो - प्रेमभंगाने दारूकडे वळणारा तरुण उत्साहाने एम्.पी.एस्.सी./ आय्.ए.एस्. तोडीच्या स्पर्धा - परीक्षांना बसण्याची जिद्द धरतो - कॅन्सरसारख्या दुर्धर रोगाने शेवटच्या श्वास घेण्याच्या क्षणी एका वाचकाच्या छातीवर घट्ट धरून ठेवलेलं, त्याच्या 'प्रिय सु. शिं.'चं पुस्तक असतं...

'या' दखल घेण्याच्या उत्स्फूर्त प्रकारांपुढे, मला सर्व समीक्षा अन् सर्व पुरस्कार तुच्छ वाटतात! ही दखल घेतली जावी यासाठी कौतुकाचं साटं-लोटं असण्याची आवश्यकता नसते. तुम्हाला कोणाला 'निवांऽत' गप्पा मारायला बोलवावं लागत नाही. लाचारपणे कोणा कार्यालयात हेलपाटं घालावे लागत नाहीत. काही नाही. वाचकाने स्वतःहून तुमच्या पुस्तकाची निवड करणं, यावरच ही दखल अवलंबून असते! माझ्या लेखनाची हीच खरी प्रेरणा नि ताकद आहे! डॉ. काशिनाथ घाणेकरांना, प्रयोग चालू असताना, अपेक्षित टाळ्या पडल्या नाहीत, तर अस्वस्थ वाटायचं म्हणे!

तसं समजा, हवं तर, पण वाचकांची दाद मिळत राहिली नाही, तर पुरस्कारांचा वर्षाव होत असला तरी मी चांगलंच काय, लिहूच शकणार नाही!

असो. आत्ता लक्षात आलं - 'थोडक्यात असं' या माझ्या आवडत्या कादंबरीची जन्मकथा सांगावी असं मनात होतं; पण, कॅनव्हास मोकळा ठेवला की, चौकटीबाहेरचं चांगलं कसं पकडता येतं, हे सांगण्याच्या नादात, 'निदान' बद्दलच थोडक्यात सांगून गेलो!

'थोडक्यात असं' बद्दल.... त्यापेक्षा, तुम्ही ती वाचूनच पहा ना! कोणाला काय म्हणायचंय् ते वाचनू मग पुस्तक वाचायला घेण्याचं परावलंबित्व, आता तरी आपण झुगारून द्यायला नको का?

(सुहास शिरवळकर, २५१, क शनिवार पेठ, पुणे ३०.)










नारायण धारप

# 'समर्थांचा प्रहार'

मराठी साहित्यनगरीला नव्याने भेट देणारांसाठी पुढील वर्णन आहे. या नगरीत पेशवाई थाटाचे, जवळजवळ त्याच काळातले उंच उंच, एके काळी देदीप्यमान वैभवाने तळपणारे, पण आता शान जरा कमी झालेले महाल आहेत - उदाहरणार्थ देवल, किर्लोस्कर इत्यादी नाटककारांच्या साहित्यकृती. काही डिपार्टमेंटल स्टोअर्स आहेत. उदाहरणार्थ पु.ल., जयवंत दळवी. जिथे कथा, कादंबरी, प्रवासवर्णन, विनोदी लेख, नाटक इत्यादी सर्व काही आहे. ठोक व्यापारीही आहेत - उदाहरणार्थ चंद्रकांत काकोडकर, बाबुराव अर्नाळकर (या दोन्ही पेढ्या आता बंद झाल्या आहेत), गुरुनाथ नाईक, सुहास शिरवळकर आणि इतरही. मासिकांचा रस्ता एकेकाळी गजबजलेला होता. किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, हंस, नवल, मोहिनी, यशवंत, वसंत, सत्यकथा इत्यादींची शान काही औरच होती. पण तो रस्ता आता निर्जन आणि ओसाड झाला आहे... कुलकर्णी, कुलकर्णी, कुलकर्णी, कुलकर्णी, घोंड आदि टीकाकार - समीक्षाकारांच्या रस्त्याने (जरा ख्यातनाम झालेले) लेखक जरा बिचकून सावरूनच जातात. कोठून तोफ डागली जाईल याचा भरवसा नाही.

अशा या नगरीत एका चौकात दि. बा. मोकाशी यांचे संमिश्र स्टोअर होते. तिथे सामाजिक कथा, विनोदी कथा, विज्ञान कथा, भयकथा सर्व काही उपलब्ध होते. त्यालाही आता टाळे लागले आहे. आणि तिथूनच एक अंधारलेली गल्ली खाली जाते. सोमण, कृष्णा कुलकर्णी, पंडित, क्षीरसागर, द. पां. खांबेटे इत्यादींचा इथे पूर्वी वावर असायचा. आता तो थांबला आहे. पण ही अंधारी गल्ली संपूर्ण ओसाड नाही. अगदी शेवटास एक मिणमिणता प्रकाश दिसतो ना? (इथे वीज नाही - मशाली, पलिते, मेणबत्त्या, फडफडत्या ज्योतींच्या समया ह्यांचाच प्रकाश असतो.) त्या मिणमिणत्या प्रकाशापाशी जा.

१९६५ पासून नारायण धारप तिथे एक लहानसे दुकान थाटून बसलेले आहेत. एकूण नगरीतला हा जरासा उपेक्षितच भाग. अगदी खास कुतूहल असलं तरच कोणाचे पाय या अंधारवाटेकडे वळतील. आत कशाचा अपेक्षा करायची हे त्यांना माहीत असतं; पण समजा एखाद्या नवख्याने दुकानाचे दार ढकललेच, तर -

'कर्रर्रर कुंई!' असा दचकावणारा आवाज येईल. आत प्रकाश अगदी मंद असेल. हवेत जरासा वेगळा (अप्रिय, अनाकर्षक नाही पण अस्वस्थ करणारा) गंध असतो. अगरबत्तीचा? वाळक्या फुलांचा? एखाद्या जंगली वनस्पतीचा?



अनुक्रमणिका

आणि मग दाराचा आवाज आला की कोपऱ्यातल्या मोठ्या काऊंटरमागून सत्तरीच्यापुढचा, खूपसं टक्कल पडलेला, डोळ्यांना जाड काचांचा चष्मा असणारा एक वृद्ध दाराच्या रोखाने आपली नजर वळवील.

हेच ते नारायण धारप.

वरच्या वर्णनात थोडीशी अतिशयोक्ती आहे, पण सत्याचाही भाग बराच आहे. माझे वडील अंध होते. १९३३/३४ च्या सुमारास मी ८/९ वर्षांचा असताना, मला आठवतं की माझा एक मामेभाऊ माझ्या वडिलांना कथाकादंबऱ्या वाचून दाखविण्यासाठी येत असे. 'वीरधवल' या गॉथिक रोमँटिक कादंबरीने मला अक्षरशः झपाटून टाकलं होतं. तो प्रभाव अजूनही कमी झालेला नाही. लहानपणाच्या कोवळ्या मनावर झालेले संस्कार खोल, प्रभावी, अतिदीर्घकाळ टिकणारे, पुढच्या सर्व आयुष्यावर परिणाम करणारे असतात असं मानसशास्त्रज्ञांचं मत आहे. भयकथा, साहसकथा, अद्भुतकथा, विज्ञानकथा यांचेच लेखन मी का निवडलं यामागे हे कारण असण्याची शक्यता मला वाटते. या प्रकारच्या लेखनास सुरुवातीस (१९५४ साली पहिल्या कथा लिहिल्या) फारशी मान्यता नव्हती. आता थोडीशी मान्यता आहे; जराशी नाइलाज होऊनच दिलेली थोडीशी प्रतिष्ठा आहे. लोकप्रियता असली तर ती अगदी माफक आहे. द्रव्यार्जनाबद्दल काही बोलूच नये.

लेखनात जे थोडंफार यश मिळालं त्यामागे (माझ्यातील अंगभूत गुणवत्ता वगळता) दोन कारणं दिसतात. एक पुण्यातलं वास्तव्य - १९६० ते १९८५ या काळात लेखन - संपादन - प्रकाशन याबाबतीत मुंबई आणि पुणे यासारखी ठिकाणंच नव्हती. १९६५ साली मी चाळीशीत होतो. (पैंजणचे) वेहरे, (मेनकाचे) वेहेरे, कानिटकर, पंडित, कुलकर्णी, माणूसचे माजगावकर, मनोहरमध्ये ओळीने आलेले गोखले, ह. मो. मराठे, शंकर सारडा हे सर्व संपादक, तसेच श्री. ज. जोशी, मोकाशी, वि. ग. (रामशास्त्री) कानिटकर, विद्याधर पुंडलिक, आनंद यादव हे सर्व लेखक जवळजवळ समवयस्क होते. सृजनाला उपयुक्त असं हे एक पर्यावरणच होतं.

दुसरा माझा व्यवसाय - फर्निचर भाड्याने देण्याचा. त्यात उठबस, धावपळ, तेजीमंदी हे काहीही नाही. त्यामुळे हवा तेवढा निवांत वेळ मिळाला. आता जरासा विचार करतो तेव्हा दोन्हीतलं साम्य लक्षात येतं. सर्व सामान बाहेर गेल्याने दुकान पार रिकामं होतं. माझी टेबलखुर्ची, गिऱ्हाईकांसाठी मांडलेल्या दोन खुर्च्या आणि मागच्या बाजूस गड्यासाठी एक स्टूल यांखेरीज दुकानात काहीही नव्हतं. सामानाच्या चौकशीसाठी आलेल्या एका प्रौढ स्त्रीने विचारलं, "माफ करा हं, पण तुमचा व्यवसाय चालतो का?" सर्व सामान आपापलं मूल्य कमवत होतं हीच आपल्यासारख्यांची सर्वात चांगली घटिका. पण त्या बाईंना काय सांगणार? लेखनाचंही तसंच आहे. एकही हस्तलिखित शिल्लक नाही. छापून आलेली एकही कथा संग्रहात जायची राहिली नाही. तो क्षण लेखकाला सुवर्णाचा वाटतो. (मला तरी!)

'समर्थांचा प्रहार' या माझ्या कादंबरीसंबंधात चार शब्द लिहावेसे वाटतात. आपल्याकडच्या सुरुवातीच्या काळातल्या १६०/१८० पानांच्या कादंबऱ्या म्हणजे खऱ्या अर्थाने दीर्घकथाच. ६६/६७ च्या सुमारास 'गंगाधरराव परत येतात' ही भयकथा लिहिली. ती संपूर्ण शोकान्त होती. नंतर काही दिवसांनंतर (वर्षानंतरच म्हणा) ती कथा पुन्हा वाचनात आली तेव्हा असं वाटायला लागलं की कथेतील जी प्रोटोगॉनिस्ट - मुख्य व्यक्तिरेखा आहे, तिच्यावर अकारण अन्याय झाला आहे. तेव्हा मग समर्थांच्या सहाय्याने त्या अन्यायाचे परिमार्जन झालेले दाखवणारा उत्तरार्ध जोडला.

काही एक ठराविक हेतू मनासमोर ठेवूनच लेखक कथाकादंबरीचे लेखन करीत असतो. मग

तो हेतू समाजप्रबोधन असो, अन्यायी रुढींचे विडंबन असो, नियतीचा अनाकलनीय खेळ असो अथवा प्रच्छन्न मनोरंजन असो. भीती ही सर्वात प्राचीन, मानवी संस्कृतीच्याच नव्हे तर प्रत्यक्ष मानवाच्याही उदयाच्या आधी निसर्गात असलेली, स्वसंरक्षणासाठी अत्यावश्यक असलेली एक मूलभूत आदिप्रेरणा आहे असं मला वाटतं. तो प्राचीन इतिहास मानवाच्या पेशीपेशींमधील रंगसूत्रात गुंफलेला आहे. जाणीवेच्याही खाली **अव्यक्त मनाच्या तळाशी आहे**. उंचीची भीती, अंधाराची भीती, बंद कोंडलेल्या जागांची भीती या सर्व त्या प्राचीन वारशाच्याच छाया आहेत. त्यांचेच प्रक्षेप आहेत. या भयाच्या आदिभावनेला माझ्या कथांतून हाक असते. भीती (आणि काही प्रमाणात क्रोध) ही एकमेव असंस्कारित, रॉ अशी भावना आहे. प्रेम द्वेष, हेवा, अभिलाषा, महत्त्वाकांक्षा, स्वार्थत्याग, परोपकार, करुणा, दया, पंचज्ञानेंद्रियातून मिळणारा सृष्टिसौंदर्याचा आनंद या भावना मानवी संस्कृती नागरी स्वरूपात दृढमूल झाल्यानंतर उदयास आलेल्या आहेत. त्यानंतरच्या अवस्थेत मानवी निर्मितींचा - म्हणजे वाङ्मय, शिल्प, चित्रकला, गायन, नर्तन इत्यादींचा आस्वाद - एस्थेटिक्स - या भावना आल्या. माझ्या वैयक्तिक मताप्रमाणे हा कालानुरूप आहे. यात उच्चनीच असं काही नाही.

पुन्हा एकदा, माझं लेखन. भयकथा ही एकाच उच्चताणाच्या बिंदूभोवती, क्लायमॅक्सभोवती गुंफलेली असते. त्यामानाने लिहावयास सोपी असते. त्यामानाने भयकादंबरीचे लेखन जरा कठीण असते. अशा अर्थी की वाचकाच्या मनावरचा भीतीचा ताण कोठेही सैल होता कामा नये. उलटपक्षी प्रसंगाप्रसंगाबरोबरच तो वाढत जावयास हवा. ढिलाई येता उपयोगी नाही. अतिरेक होता उपयोगी नाही. कारण कोणत्याही प्रकारचा अतिरेक हा शेवटी निरर्थक आणि हास्यास्पद ठरतो.

एकाच व्यक्तिरेखेवर आधारलेल्या अनेक कथाकादंबऱ्या हा वाङ्मयप्रकार मराठी वाङ्मयात जरा अभावानेच दिसतो. 'समर्थ' ही व्यक्तिरेखा अर्थात संपूर्ण काल्पनिक आहे. या कथांत कोठेही पुनरुक्ती येणार नाही याची मी सतत दक्षता घेतली आहे. साधनेने, परिशीलनाने समर्थांनी ज्या काही खास अतींद्रिय शक्ती प्राप्त करून घेतल्या आहेत त्यांचेच ओझरते स्वरूप या वेगवेगळ्या कथांतून दाखवले आहे.

समर्थकथा या लेखनास जरा कठीण जाणवतात. एकतर त्या दुपदरी असतात. कोणाएका अनामिकाला काही भयकारक अनुभव येतात आणि त्याच्या निवारणासाठी तो समर्थांची मदत घेतो हा पूर्वार्ध. उत्तरार्धात समर्थ त्या समस्येची उकल करतात. उत्तरार्धातील प्रसंग पूर्वार्धापेक्षाही जास्त ताणाचे, जास्त भीतिकारक असावेच लागतात. नाहीतर कथेचा ताण ढिला होईल.

समर्थांच्या अंगी (आणि अर्थात ज्यांनी त्यांच्याशी वैर मांडलेले असते अशा त्यांच्या वैऱ्यांच्याही अंगी) कथांतून दाखवण्यात येणाऱ्या अतींद्रिय शक्ती हे सर्व माझ्या कल्पनेचे खेळ आहेत. अशा काही शक्ती अस्तित्वात आहेत यालासुद्धा कोणताही शास्त्रीय पुरावा नाही. ज्यांच्या शब्दांवर शंकासुद्धा घेता येणार नाही असे काही लोक काही चमत्कारिक, स्पष्टीकरणास कठीण अशा अनुभवांचं वर्णन करतात. या संदर्भात माझा एक विचार ध्यानात ठेवण्यासारखा आहे. ज्याला 'अर्थपूर्ण योगायोग' (सिंक्रॉनिसिटी) म्हणता येईल अशाही काही घटना घडत असतात. पण अर्थात त्याच्या विवेचनात जाण्याचे हे स्थळ नाही.

माझ्या कथा कल्पित असल्या तरी आपल्या अनुभवापलिकडच्या शक्यतांसाठी मी एक तर्कशुद्ध सांगाडा मनाशी जुळवलेला आहे. विशेषतः समर्थकथा या जास्तीतजास्त रॅशनल, तर्कबुद्धीस पटणाऱ्या वाटतील अशी दक्षता मी घेतो. 'समर्थांचा प्रहार' या लघुकादंबरीत मी अनेक संकेतांचा वापर केला आहे. उदा. उंबऱ्यावर उलटा नाल ठोकणे, बंधनासाठी साधा काळा दोरा वापरणे इ. शिवाय 'तस्मार-



अनुक्रमणिका

अर्चना' नावाचा (प्रत्यक्षात अस्तित्वात नसलेला) एक अत्यंत प्रभावी संरक्षक उपाय वापरात आणलेला दाखवला आहे.

एकापेक्षा एक वाढत्या श्रेणीचे भयकारक प्रसंग वर्णन करणं, अमानवी संकटांचा शेवटी मुकाबला करून व्याधीचा उपशम करणे आणि हे सर्व प्रसंग (काही एका गृहीत उपपत्तीच्या आधारे) एका सयुक्तिक तर्कांच्या साखळीत (सुबुद्ध वाचकाला पटतील इतपत) बसवणं हे मी मला स्वतःला एक आव्हानच समजतो आणि ती कथा यशस्वीपणे उतरली की त्या निर्मितीने होणारे समाधान काही वेगवेगळे असते हा माझा अनुभव आहे.

'समर्थांचा प्रहार' ही माझी एक प्रातिनिधिक कादंबरी समजता येईल. त्याबाबतीतलं वरील विवेचन बहुतेक सर्व कथाकादंबऱ्यांनाही लागू पडल्यासारखं आहे. या सर्व कथाकादंबऱ्या दुपदरी असतात. घडलेल्या घटना सत्य असतात, पण त्यांना दोन वेगवेगळी सयुक्तिक, तर्कशुद्ध स्पष्टीकरणं देता येण्यासारखी असतात. एक मानसशास्त्रीय - डिल्यूजन, हॅल्युसिनेशन, हिप्नॉसिसखाली आलेले अनुभव, दबल्या गेलेल्या भावनांचे (रिप्रेशन) विकृतदर्शन हा एक धागा आणि त्या घटना प्रत्यक्ष अनुभवणाराला अनैसर्गिक, पैशाचिक शक्तींची वाटणारी भीती हा दुसरा.

याला अपवाद 'पानघंटी' या दीर्घकथेचा आहे. त्या कथेला तीन पदर आहेत. एक पोलीसाचं त्यांच्या गुन्हातपास पद्धतीवर (आणि समाजात त्यांना दिसलेल्या गुन्हेगारी प्रवृत्तीच्या लोकांच्या स्वभावावर) आधारित स्पष्टीकरण, दुसरं डॉक्टरांनी केलेलं मनोविश्लेषणात्मक विवेचन; आणि तिसरं अर्थात देसाईंना स्वतःला जाणवणारा विलक्षण अपवादात्मक रीतीने अवतीर्ण झालेल्या 'पानघंटी' चा सैतानी प्रभाव. अर्थात शेवट तोच होतो. त्यात काहीही फरक पडत नाही.

वाचनाच्या प्रमाणात आणि वाचनाच्या सवयीत लक्षणीय घट होत आहे असे निष्कर्ष बहुतेक सर्व चाचण्यांतून निघत आहेत. संपादक - प्रकाशक - विक्रेत्यांचा तर तो प्रत्यक्ष अनुभवच आहे. पण हे विधान जरा मोघम आहे. कोणत्या प्रकारच्या वाचनात घट झाली आहे त्याचा जरा खोलात अभ्यास व्हायला हवा. माझी कल्पना अशी आहे की साहसकथा, युद्धकथा, प्रणयकथा, थोडक्यात ज्या कथांतून घटनांचं चित्रीकरण असतं, जिथे वाचक आपल्या कल्पनाशक्तीने असे वर्णन केलेले प्रसंग मनश्चक्षूसमोर उभे करतो अशा कथांना टीव्हीवरच्या वेगवेगळ्या चॅनल्सवर दाखवण्यात येणाऱ्या मालिका या जबरदस्त प्रतिस्पर्धी ठरणार यात शंका नाही. कारण हे सर्व प्रसंग अशा या मालिकांमधून अत्यंत परिणामकारक पद्धतीने दाखवलेले असतात. विनोदी कथांबाबतही हेच म्हणता येईल.

पण ज्या कथा केवळ घटनांच्यावर आधारित नाहीत, ज्यांच्या वाचनात वाचकाला काही प्रमाणात बौद्धिक सहभाग घ्यावा लागतो अशा कथांच्या वाचनात जास्त घट होणार नाही. पण हे माझ वैयक्तिक मत आहे. माझ्या समर्थकथांपैकी काही या प्रकारच्या आहेत असा माझा वैयक्तिक समज आहे.

**(नारायण धारप. १८६७, सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०)**

**(जन्म** - २७ ऑगस्ट १९२५. बी. एस्सी. (रसायन), बी. एस्सी. (टेक). १९५७ पासून पुण्यात डेक्कन फर्निचर हा व्यवसाय. आता पूर्ण बंद. १९५४ पासून भयकथा-कादंबऱ्यांचे लेखन.

**भयकादंबरी** - चंद्राची सावली, सैतान, दस्त, काळी जोगिण, मृत्युद्वार, परिसस्पर्श, चंद्रविलास, शपथ, अंगारिका, लुचाई

**विज्ञान कादंबरी** - ऐसी रत्ने मेळवीन, काल्गुंफा, पारंब्यांचे जग, युगपुरुष, जिद्द, चक्रावळ, न्यायमंदिर, स्वप्नमोहिनी, सुवर्णाचे विश्व, नेनीचम्, अरिष्ट अंगारक

**समर्थ कादंबरी** - समर्थांना हाक, समर्थांचा प्रहार, समर्थांचिया सेवका इ.

रवीन्द्र भट

# आभाळाचे गाणे

१९८४ च्या दिवाळीतील गोष्ट. नेहमीप्रमाणे महाबळेश्वरला गेलो होतो. एका भल्या पहाटे मला जाग आली. भोवतालच्या खोल्यांत सारेजण गुडुप झोपलेले. सवयीने मी उठलो. खोलीबाहेर आलो. किती वाजले असतील हे न पहाता हॉटेलमधून बाहेर पडलो. पूर्वेकडचा साताऱ्याचा रस्ता चढून डाव्या हाताच्या झुडोऱ्यातून विल्सन पॉईंटवर आलो. पूर्वेच्या सूर्योदयाच्या बुरुजाकडे चालू लागलो.

पहाट उमलत होती. राघू, मैना, दयाळ, साळुंक्या त्या पहाटेच्या स्वागताची प्रसन्न धून आळवीत होत्या. मंद शीतल झुळकेवरून सारी वनसृष्टी ओझोन शिंपडत होती. तारांगण अब्जावधी तारकांच्या झुंबरानं लहडलं होतं. पूर्वेकडील पाचगणीचे पठार, त्यापलिकडची सोनजाई, आणखी दूरच्या क्षितिजावरचा चंदन-वंदन, ईशान्येकडचा पांडवगड, त्याच्या नजिकचं मांढरदेवीचं ठाणं, अलीकडे उत्तरेचा कमळगड. त्याच्या मागचं धूसर दिसणारं रायरेश्वरचं पठार, दक्षिणेचा मकरंदगड, त्याच्या मागे नैर्ऋत्येच्या क्षितिजावरचा जंगली जयगड! या साऱ्या क्षितिज खुणांवर अवघं लखलखणारं आकाश टेकलेलं आणि हा सुखसोहळा अनुभवणारा, त्या पठारावर मी एकटा! आजूबाजूला फक्त ही उमलती पहाट. अभावितपणे आत्मसंवाद सुरू झाला. मीच मला विचारलं, हे आकाश जर गायला लागलं तर काय गाईल..? राघू चिमण्या, मैना साळुंक्यांनी सूर दिला. माझं मीच उत्तर दिलं. मनातल्या शब्दकळेला जाग आली.

'क्षितिजावरची सीमारेषा कवेत घेणे। आभाळाचे गाणे।।
मूर्यरथाच्या चक्रासंगे, गुरुशुक्रांच्या भ्रमणासंगे।
दिक्कालाचे बंधन तोडून, अनंतरूपी उरणे।। आभाळाचे गाणे।।
असेल जेथे सजीव सृष्टी, करणे तेथे पायसवृष्टी।
मातीमधल्या वात्सल्याला, स्पर्शुन जागे करणे।। आभाळाचे गाणे।।
ज्वालामुखींची दुर्गम शिखरे, रण वाळूचे कोठे विखरे।
जलचर, भूचर, सर्वांवरती नीलछत्र मज धरणे।। आभाळाचे गाणे।।
यज्ञ घडावा सदा अलौकिक, स्वर हृदयातुन उमटो सात्त्विक।
जगन्नियंता म्हणे तथाऽस्तु, तम दुरितांचे विरणे।। आभाळाचे गाणे।।

मनात शेवटचा अंतरा उमलला आणि चंदनवंदनाआडून पूर्वेकडे सुवर्णवलयांकित गुलाबी लालसर सहस्त्ररश्मी उमटला!

मनातल्या विनम्रभावाला माऊलीनं देवस्पर्शी साद घातली.

"सूर्ये अधिष्ठिली प्राची। अगा राणीव दे प्रकाशाची।
तैसी भाषा ज्ञानाची। श्रोतया, दिवाळी करी॥"

तरळत्या अवस्थेत पठार उतरून खाली आलो. आत्मसंवाद सुरू होता. अरे, आत्ता जो अनुभव घेतलास तो सारा या गाण्यात पकडता आला का तुला? तुझी झेप इवली. तुझी प्रतिभा तिच्याएवढीच. तू अनुभवलंस ते त्याच्या कवेत गवसेल कसं? त्याची व्याप्ती चार कडव्यांच्या चौकटीत सामावेल कशी? या गाण्यानं तुला फक्त एक बीज दिलं. ते रुजायला मनाची मशागत करायला हवी. जो परिसर तू निरखलास तो तुझ्याच जन्मभूमीचा! महाबळेश्वराच्या लाडक्या ज्येष्ठ कन्येचा. कृष्णानदीचा! तिच्या तीरावर असं आभाळाचं गाणं गाणारी किती माणसं होऊन गेली असतील. कितीतरी अजूनही अस्तित्वात असतील! त्यांचं जगणं हे मातीतल्या वात्सल्याला जागं करणारं असेल. त्यांचा आचार इदं न ममचा असेल. त्यांच्या अंतःकरणात दुरितांचा तिमिर नाहीशी करणारी देवदत्त प्रेरणा असेल. त्यांचं अस्तित्व सर्वांच्यावर छाया धरणाऱ्या आभाळाचं असेल. तशी ही सारी सर्वसामान्य माणसंच. माणूसपणाच्या त्रुटी घेऊन आलेली आणि तरीही एखाद्या असामान्य सद्गुणाचा देवस्पर्श झालेली..! या साऱ्यांच्यामधील उत्तम, उदात्त आणि महन्मधुर एकत्र करून एक नायक उभा करायला काय हरकत आहे? जो तुझा जन्मपरिसर तू निरखलास तेच वातावरण या नायकाभोवती चित्रित करता येईल. तिथला निसर्ग, लोकरीती, उद्योग, व्यवसाय, उत्सव, जत्रा, यात्रा, कृषिउत्पन्न, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय विचारप्रणाली हे सारं एका विशिष्ट कालखंडाच्या चौकटीत गुंफता येईल. तो कालखंड वैचारिक संक्रमणाचा असला तर अधिक व्याप्ती वाढेल.

या मंथनातून १८८० ते १९८० या शतकातील माहुलीपासून महाबळेश्वरपर्यंतच्या कृष्णाबाईच्या काठावरच्या लोकजीवनाचा वेध घेणारी 'आभाळाचे गाणे' ही कादंबरी सिद्ध झाली. माझी ही सर्वात आवडती कादंबरी. कारण ती लोकमानसात रुजलेल्या ऐतिहासिक व्यक्तीच्या चरित्रावरील नसून पूर्णतया स्वतंत्र आहे. यातील नायकाच्या तीन पिढ्या सभोवतालच्या वास्तवाशी प्रामाणिक आहेत. नव्या संक्रमणाला सामोरं जाताना रक्तात भिनलेलं आभाळाचं गाणं ते लोक विसरलेले नाहीत. आपल्या मातीचं ऋण थोडंफार फेडू शकलो याचं समाधान या कादंबरीनं दिलं.

इतर कादंबऱ्यांच्या तुलनेत या कादंबरीला प्रतिसाद कमी मिळाला. असं का याचं उत्तर माझ्याजवळ नाही. नामवंत प्रकाशनसंस्था, उत्तम छपाई, सूचक मुखपृष्ठ सारं असूनही वाचक आणि समीक्षक यांच्यासमोर ही कादंबरी ज्या पद्धतीने यायला हवी होती तशी आली नाही. प्रत्येक कलाकृती आपली जन्मकुंडली घेऊन येते. 'आभाळाचे गाणे' ची कुंडली कदाचित अशीच असेल. प्रादेशिक कादंबऱ्यांच्या यादीत अगदी शेवटी का होईना, या कादंबरीची नोंद व्हायला हवी होती. पण तेही भाग्य तिच्या कुंडलीत नाही. आणि तरीही 'आभाळाचे गाणे' ही कादंबरी माझ्या मनाच्या श्रेयमालिकेत अग्रस्थानी आहे हे सत्य आहे!

माझ्या लिखाणात प्रबोधनाला अग्रस्थान आहे. याचं कारणही या कादंबरीच्या चौकटीतून लक्षात येते. भोवतालच्या जनसामान्यातील असामान्य गुणांचे संस्कार बालवयापासून झाले. माणूसपणाच्या अपूर्णतेपासून ईश्वराच्या पूर्णत्वाकडे वाटचाल करणारी माणसं या परिसरानं दाखवली. कृष्णाबाईनं त्यांचं भरण-पोषण केलं त्यांना विनम्र अभिवादन करण्याचं एक समाधान या कादंबरीमुळे मिळालं. हेही नसे थोडके!

(**रवीन्द्र भट** - ए२/२१, कैलास हाऊसिंग सोसायटी, शास्त्रीनगर, कोथरुड, पुणे ४११.०२९



अनुक्रमणिका



रंगनाथ पठारे

# टोकदार सावलीचे वर्तमान

प्रिय असं नाही पण आजवर छापल्या गेलेल्या माझ्या आठदहा पुस्तकांत 'ताम्रपट' हे लेखन मला महत्त्वाचं वाटतं. अर्थात माझं वाटणं मी माझ्यापुरतचं मानतो. इतरांना ते तसं वाटावं असा आग्रह नाही आणि कोण काय म्हणतंय याच्याविषयीही माझं काही म्हणणं नाही. पुस्तक एकदा छापलं की ते वाचणाऱ्याचं होतं. त्यामुळे त्याच्यासंबंधी लिहिणं, बोलणं हा त्यांचा अधिकारच आहे अशी माझी नम्र भावना आहे. 'ताम्रपट' विषयी मी काही लिहिणार नाही कारण ते मी इतरत्र बरंच केलंय. माझ्या पुस्तकांसंबंधी जाणकार मित्रांची पुष्कळ वेगवेगळी मतं आहेत. ती लिहिली, बोलली गेलेली आहेत. काहींना 'रथ' आणि 'चक्रव्यूह' ही माझी पुस्तकं महत्त्वाची वाटतात. काहींना 'ताम्रपट'मध्ये मी ज्या उंचीला गेलो व तिथं जे गाठलं, तिथवर आता मला जाता येत नाही असं वाटतं. (म्हणजे काय? एकतर सारखं सारखं उंचीवर कसं जाणार? आणि ते ठरवून थोडंच करता येतं? शिवाय 'ताम्रपट' छापून असे किती दिवस झाले? आधीच मी जास्ती लिहितो म्हणता आणि हे काय? हे आपलं मनातल्या मनात.) कोणी 'स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग' मधली कथा हे महत्त्वाचं व बऱ्याच दृष्टींनी मोठं कॉन्ट्रिब्युशन मानतात. काहींना 'टोकदार सावलीचं वर्तमान' ही माझी कादंबरी माझ्या एकूण लेखनात सर्वश्रेष्ठ आहे असं खात्रीनं वाटतं. ती आंतरराष्ट्रीय दर्जाची आहे - खरं तर असं कोणी म्हटलं तरी आपण त्याचा उच्चार करण्याचं औद्धत्य करू नये हे सौजन्याला धरून अधिक होईल, तरीही ते एका ज्येष्ठ आणि समकालीन लेखकानं म्हटलंय आणि इतर पुष्कळ जाणकारांनीही असंच म्हटलंय तर त्याचा आदर हा केलाच पाहिजे. या कादंबरीसंबंधी अशा प्रतिक्रिया मला वेधक वाटल्या आहेत व वाटतात. म्हणून तिच्या निमित्ताने मी लिहिणार आहे आणि निमित्ताने हेच खरं. कारण प्रत्यक्ष या कादंबरीसंबंधी मी फार काही सांगेन; मला ते सांगता येईल असं वाटत नाही. यानिमित्तानं एकूण लेखनासंबंधी, कादंबरीसंबंधी काही मांडता येईल.

'टोकदार सावलीचे वर्तमान' ही कादंबरी मी सुमारे चार महिन्यात लिहून पूर्ण केली. पहिला खर्डा दोन महिने आणि पुनर्लेखन दोनेक महिने. दरम्यानच्या काळात मी माझे प्रकाशक श्री. अशोक कोठावळे यांना पत्र लिहिलं; की बुवा असं असं लिहितोय. फार मोठं लेखन बहुतेक नसेल. तर म्हणाले, पाठवा. दिवाळी अंकात छापू. कोठावळे यांना हस्तलिखित देण्याआधी तोवरच्या शिरस्त्यानुसार मी

डॉ. चुनेकर यांना ते वाचायला दिलं. प्रतिक्रिया : ठीक आहे. पण तुम्ही आणखी कोणाला वाचायला दिली पाहिजे. ते मी केलं नाही. सरळ पुस्तकच करू. त्यानंतर मोहन वेल्हाळ यांची माझी तोवर खास ओळख नव्हती. त्यांनी या पुस्तकाचं काम घेतलं आणि फार मन लावून केलं. फार बारक्यासारक्या चौकशा करत आणि आस्थापूर्वक. दरम्यान एकदोनदा भेटी झाल्या. म्हणाले, फार महत्त्वाची कादंबरी होईल इत्यादी. छापील फॉर्म्स वाचल्यावर चुनेकर म्हणाले, 'चांगली कादंबरी आहे. ती दुर्लक्षित होईल की काय अशी भीती वाटते.' मी गोंधळून गेलो. म्हटलं, या भानगडीचा विचार आपण कधीच केला नाही. तो आता कशाला करा? नाहीतरी पुस्तक छापलं की त्वरित प्रतिक्रिया येणं ही सवय मला कधीच नव्हती. आणि 'ताम्रपट'च्या आधी पुस्तकं छापली तरी फार वेगानं ती लोकांपर्यंत गेली वा लगेच प्रतिक्रिया मिळाल्या असं झालेलं नव्हतं. आणि असलं काही डोक्यात ठेवून उपयोगही नसतो. मुळात काही लिहून मोकळा झालो की काही दिवस मी लिहिलेल्या गोष्टींच्या प्रेमात असतो हे खरं; पण ते लवकर संपतं. आणि नंतर त्याचं काहीच वाटत नाही. भेटीगाठी कोणाच्या फारशा होत नाहीत त्यामुळं अगदीच कोणाला वाटलं तर ते पत्र लिहून कळवतात. बऱ्यावाईट प्रतिक्रियांविषयी कुतूहल असतं पण ते फार तीव्र नसतं. सुरवातीला रागलोभही असायचे. तेही आता राहिलेले नाहीत. गंभीरपणे व्यक्त झालेल्या मतांचा आदरपूर्वक विचार करायचा. बाकी डोक्याला ताप करून घ्यायचा नाही ही माझी रीत.

पण मग हळूहळू असं झालं की लोक कळवायला लागले, की बुवा फारच चांगलं, नवं वळण आहे. असा असा प्रयोग, निवेदनशैली, अनुवंशशास्त्रातल्या थिअरिज आणि हे सगळं किती बौद्धिक उच्च दर्जाचं आहे तर त्यासाठी तुम्ही बराच अभ्यास केलेला असणार. वगैरे.

हे इतक्या विस्तारानं सांगायचं कारण असं की या अशा प्रतिक्रियांमुळं मी जास्ती गोंधळून गेलो. लिहिण्यापूर्वी वा लिहिताना मी खास असं काहीच केलेलं नव्हतं. आणि नेहमीच मी काही करीत नाही असंही नाही. 'रथ' लिहिण्याआधी मी वाङ्मयीन चळवळी, कलावाद, जीवनवाद, भरतमुनी, मम्मट असं पुष्कळ वाचून काढलं होतं. 'ताम्रपट' लिहिताना तर बरंच जास्ती वाचलं. (या सगळ्याची टिमकी मला अर्थातच वाजवायची नाही. आणि हे सांगून वाचणाऱ्यांना पूर्वग्रहदूषित करायचं नाही वा त्यांच्यावर दडपणही आणायचं नाही. काही समजावून घ्यायचं तर वाचलं पाहिजेच. आणि एरवीही वाचणं हा सगळ्या लिहिणाऱ्या लोकांना अपरिहार्य असा उद्योग असतो अशी माझी धारणा.)

पण या 'टोकदार सावलीचे वर्तमान' प्रकरणी मी तसं काहीच केलेलं नव्हतं. आणि इतकं सहज, पटकन ते लिहून झालं. कोणतंही पुस्तक मी इतक्या कमी वेळात लिहिलेलं नाही. मी असं कसं झालं? इतक्या सहज, इतकं बरं - निदान लोकांना ते तसं वाटतं आणि आता त्रयस्थपणे एक वाचणारा म्हणून मलाही ते ठीक वाटतं, असं हे लेखन मी कसं केलं?

व्यंकटेश माडगूळकरांनी एका ठिकाणी म्हटलंय तसं, 'ते होऊन जातं. बस्स. आणखी काही नाही.' हे व्यापक अर्थानं खरच आहे. तरीही थोडंफार चाचपडायला, शोधायला हरकत नाही.

ही कादंबरी खूप आधीपासून डोक्यात होती असं मला म्हणता येणार नाही. निदान जाणीवपूर्वक तरी ती तशी नक्कीच नव्हती. मग तिच्यात जे मांडलंय, ते होतं? तर होतं. पण ते या कादंबरीत मांडण्यासाठी म्हणून नव्हतं. मी लिहायला लागलो आणि ते सगळं आलं. लिहिण्याच्या निमित्तानं आलं.

विषय निघालाच आहे तर यावं इतक्या सहजतेनं आलं. वाचलेलं होतं आणि काही आकलनही डोक्याशी होतं. ते इथं वापरायच्या इराद्यानं नव्हतं. लिहिणाऱ्यानं आडवं तिडवं खूप वाचावं आणि चांगल्या अर्थानं विसरून जावं तसं ते होतं. हे असं आडवं तिडवं वाचायचा नाद मला पहिल्यापासून. कळत नकळत त्यातून आपण निवडतो, साठवतो, विचार करतो तसं ते असणार. माणसाचा स्वभाव, त्याची प्रकृती, त्याचं आयुष्य या सगळ्यांचा संबंध त्याच्या गुणसूत्रांशी असतो किंवा ते सगळं त्याच्या जीन्स आणि क्रोमोझोम्समध्ये कोड करून ठेवलेलं असतं असं वैज्ञानिक म्हणतात. (आपले देशी लोकही, समदं सटीनी कपाळाव लिवल्यालं ऱ्हातंय असं म्हणतातच की!) अनेक पिढ्यांतून, अनेक धाग्यांतून, अनेक दिशांनी कितीतरी पर्म्युटेशन्स व कॉम्बिनेशन्स होत वाहात येणाऱ्या या गोष्टींचा प्रभाव आपल्या जगण्यावर असतो. अनेक मानवी समूह वंशशुचित्वाचे अहंकार जोपासतात. अनेक राष्ट्रांच्या राष्ट्रीयवृत्तीचा पायाच असतो. युरोपात प्लेटोॲरिस्टॉटलपासून सुप्रजननाचा अभ्यास झालेला आहे. हिटलरप्रणित वांशिक श्रेष्ठत्वाला तत्त्वज्ञान पुरवणारी भरपूर माणसे त्यावेळी होती आणि नंतर पूर्व जर्मनीत या युजेनिक्सचा पद्धतशीर अभ्यास करून खेळाडूंच्या संदर्भात बऱ्याच गोष्टी केलेल्या होत्या. एका मर्यादेपल्याड याला काही अर्थ नाही हे खरंच. आणि आपण हिंदुस्तानी लोक - आपल्याला असला दावा करायची बिलकुलही संधी नाही, इतकी जगातल्या सगळ्या वंशांची ठळक वैशिष्ट्ये आपल्या लोकात मौजूद आहेत ( आणि ती सगळ्यात सुंदर गोष्ट आहे असं मी मानतो.) तरीही वांशिक शुचिता वा वांशिक अहंकार जतन करणाऱ्या पुष्कळ गोष्टी आपल्या रीतीभातीत आहेत. जातीसंस्था, जातीव्यवस्था आहे. त्यांच्यासंबंधी उभं आणि आडवं कुतूहल मला आहे. आपली जगण्याची रीत, विचार करण्याची पद्धत, समजावून घेण्याची व्यवस्था या सगळ्यांवर जातीव्यवस्थेचा संस्कार असतो. एकच गोष्ट, समजा तुम्ही दलित, मराठा, ब्राह्मण वा वंजारी, धनगर असाल तर, वेगवेगळ्या पद्धतीने पाहता. तुमच्यावर असणारे दाब वेगवेगळे असतात. आज परिस्थिती बदलत चाललीय हे खरं आहे. उतरंडीत खाली असणाऱ्या समूहांचे नवे प्रतिनिधी अधिक आत्मविश्वासाने वावरतात हे चांगलंच आहे. तरीही ही संस्था वा व्यवस्था मोडीत निघालीय असं म्हणण्याजोगी परिस्थिती नाही. एकूणात जुन्या, नव्या, वैज्ञानिक, अवैज्ञानिक अशा कितीतरी गोष्टी आणि त्यांना परस्परांशी जोडत तोडत काही शोधणारे वा समजावून घेणारे आपण. इतक्या गोष्टींनी, इतक्या प्रकारच्या दृश्य, अदृश्य धाग्यांनी आपण बांधलेले असतो तरीही प्रत्येकाचं रसायन पुन्हा वेगळं असतं. कोट्यवधी माणसांतही एक माणूस दुसऱ्यासारखा नाही तो नाहीच. माणसाची उत्कटता, भावनाशीलता यांचेदेखील किती वेगवेगळे आविष्कार असतात आणि परस्पर संबंधांतून पुन्हा किती प्रकारचं प्रकट होणं असतं! हे सगळं मला फारच आवाहक वाटतं.

या कादंबरीत गोष्ट अशी मुळात फारशी नाहीच आहे किंवा गोष्ट ही खरं तर निमित्तच आहे. त्यामुळे प्रश्न असा की हे निमित्त कुठून आलं? मांडलंय त्यातलं डोक्यात काय काय होतं, पाहिलेलं काय काय होतं? माझ्या जन्मगावाशेजारच्या गावातल्या एका ब्राह्मणानं पंढरपूरच्या आश्रमातून बायको आणली होती. कारण हा ब्राह्मण मुळातच अनौरस संतती. बाप ब्राह्मण आणि आई दुसऱ्या जातीची. त्याला कोणता ब्राह्मण मुलगी देणार? त्यानं आपला रस्ता शोधला होता. लहानपणी बायांच्या गप्पा ऐकताना हे मी ऐकलेलं होतं. नंतर तो माणूसही पाहिलेला होता. त्याची मुलं पाहिली होती.

गांधीजींच्या हत्येनंतर खेड्यापाड्यातले बव्हंशी सगळे ब्राह्मण जे पुष्कळ वतनदार जमीनदार होते ते सगळं सोडून पुण्यामुंबईला पळाले. त्यांच्या जमिनी कुणवीमराठ्यांनी मातीमोलानं (!) घेतल्या अथवा अनेकांकडं कुळकायद्यानं त्या आल्या. आजही शेतांची नावं बामनमळा, कुरनिकीचा मळा (म्हणजे पुराणिकांचा मळा) अशी सगळीकडं आहेत. ज्या थोड्या ब्राह्मणांना असं लगेच पळता आलं नाही ते गावात तग धरून राहिले. अशी माणसं मी पाहिलेली होती. तिथिवारनक्षत्र सांगायला घरी येणाऱ्या ब्राह्मण भिक्षुकास कोरडा शिधा देऊन माझी आई त्याला किती भक्तिभावानं नमस्कार करीत असे हे मी पाहिलं आहे. या लोकांपाशी विद्या उरलेली नव्हती आणि दारिद्य विपुल. त्यामुळे बव्हंशी एकाकी आणि भेदरलेलं आयुष्य अशा ब्राह्मणांच्या वाट्याला असे. मराठ्याला जो जातीगोताचा, नात्याचा आधार असतो तसाच जवळपास दलितांनाही असतो; वा होता. माझ्या लहानपणी मी पाहिलेली ही ब्राह्मणमंडळी बव्हंशी एकाकी दिसत. आज पुन्हा चित्र बदललेलं आहे हेही खरंच.

अर्थात हे सगळं नीट ठरवून, विचार करून मी गजानन भांगरेला ब्राह्मण करून टाकलं असं नाही. तो झाला. स्वाभाविकपणेच झाला. तो ब्राह्मण होऊनच आला. त्याला मी काय करणार?

मुळात लिहिताना मला आधीच सगळं दिसत नाही. अस्पष्ट, अंधुक असं काही काही वाटत राहतं. पात्रं येतात, परिस्थिती उभी होते आणि परस्परवाद संवाद टकराव यातून जशी कथा घडत जाते तसं सारं स्पष्ट व्हायला लागतं आणि याच सुमाराला कथात्मक आशय माझ्यावर हुकमत गाजवायला लागतो. (अनेकदा वा बव्हंशी नेहमीच मला तो त्याच्यापाठी ओढत नेतो, हा माझा अनुभव. हे असं एक प्रकारच्या सक्तीनं करावं लागणं ही लिहिणारा म्हणून आत कुठंतरी ओढ असतेच.) त्यामुळं गजानन भांगरे, त्याची आई, बायको, मुली, त्याचा मित्र हे असे सगळे आल्यावर त्यांनी मला त्यांच्यात घेतलं असं म्हणता येईल. हे मी फारच विवश होऊन बोलतोय अथवा गूढ काहीतरी म्हणतोय असं मला वाटत नाही. हे लेखन करण्याच्या निमित्तानं ही कादंबरी मी पुन्हा वाचली तेव्हा वाचणारा म्हणून मलाही वाटलं की, अरे वा! आपण हे सगळं लिहिलं!

प्रत्यक्षात आपण पाहिलेलं लेखनात इतकं वेगळं होऊन येतं की त्याचा तथाकथित प्रत्यक्षाशी काही संबंधच उरत नाही. आणि इतक्या सगळ्या सुट्या सुट्या गोष्टी असतात, त्यांची लिहिताना सुसंबद्ध संघटना होते, नाती निर्माण होतात आणि त्यातून वेगळंच वास्तव उभं राहतं. हे साहजिकच आहे. नुसता 'टोकदार सावलीचे वर्तमान'चा विचार करायचा म्हटलं तरी हे मला जाणवतं. मी पुण्यात शिकायला होतो तेव्हा नारायण पेठेतल्या एका जुनाट वाड्यात एका वृद्ध ब्राह्मण स्त्रीचा पोटभाडेकरू म्हणून एका खोलीत राहात होतो. त्या वाड्यातली अठरापगड जातीची माणसं, मी माझ्या जन्मगावी पाहिलेली माणसं, पाहिलेल्या-ऐकलेल्या गोष्टी, संगमनेरातल्या रस्त्यांवरच्या दीर्घ रात्री आणि कोरडी थंडी, कुत्री, मांजरं आणि कलतानातली माणसं, रस्त्यांवरचे प्रणय या सगळ्यांचं रसायन त्यात आहे. म्हणजे कोणालाही सुटं काढून, ही त्या अमक्याची वा तमकीची गोष्ट आहे असं मला म्हणता येणार नाही. संगमनेरची प्रवरा नदी, तिच्यातलं हंगामी पाणी, घाट, देवळं, झाडं हे सगळं कायम मनात असतं. या नदीकाठाइतकं मनात घर करून क्वचितच काही राहिलेलं आहे. माणसं असतातच. ज्ञातीविषयक अहंकार आणि ज्ञातीसंवर्धनाची दृष्टी असलेले प्राध्यापक शाळीग्राम किंवा सुपाएवढ्या काळजाचा आडमाप भोकरे यांच्यासारखी माणसं असतातच. पण पुन्हा तेच की हे पात्र मी अमक्या

तमक्यावरून निर्माण केलंय असं मला ठामपणे म्हणता येणार नाही. गजानन भांगरे मी सरळ कुठं पाहिलाय वा त्याच्या आईसारखी स्त्री पाहिलीय हेही नाही. नर्मदा, तिच्या पोरी, कोळपकर यांचंही तेच. या सगळ्यांना मी इथं तिथं पाहिलेलं आहे आणि त्यातले कोणीही हे नाहीयेत. कारण ते आले आणि त्यांना जे काय मिळायचं ते व्यक्तिमत्त्व मिळालं ते कादंबरीत. तिथून बाहेर काढलं तर त्यांना अस्तित्व नाही.

या पुस्तकालाच असं नाही - माझ्या एकूण लेखनालाच जाणत्या वाचकांचा, समीक्षकांचा प्रतिसाद खूप चांगला आहे. आधी मला ते तोंडदेखलं वा छानछानवादी वाटत असे. पण लोकांनी कसून लिहिलंय, भलंबुरं लिहिलंय, त्याचा मी आदर करतो. मानसन्मान, पुरस्कारही एकूण खूप झालेत. थोडेफार मित्र आहेत, त्यांनाही त्याचं काही वाटेनासं झालंय. तक्रार करावं असं काहीच नाही. त्यामुळं त्याचं काय लिहायचं? कोणाकोणाची नावं लिहायची? आणि समकालीन साहित्यात या कादंबरीचं वा माझ्या लिहिण्याचं स्थान काय हे मी कसं सांगायचं? तो ज्यांचा अधिकार आहे त्यांनी तो वापरावा. शिवाय लिहिणाऱ्यानं अशा बाबतीत उगीच भ्रमात राहू नये अशी माझी धारणा. कालचा महत्त्वाचा लेखक आज जुना होतो. चार दोन पिढ्यांपर्यंत काही टिकतात. तुकारामांइतकं आयुष्य सगळ्यांच्या वाट्याला कसं येईल? त्यामुळं असेल काही तर टिकेल नाहीतर संपेल. आपल्या टीचभर आयुष्यात या गोष्टींची चिंता आपण कशाला करायची? साहित्याच्या क्षेत्रात जाणते लोक आहेत, ते मूल्यमापन करीत असतात, त्यात लिहिणाऱ्यानं कशासाठी घुसायचं? आणि तेही पुन्हा स्वतःच्या लिहिण्यासंबंधी? मला तरी यात काही मतलब दिसत नाही.

कादंबरीत गोष्ट असतेच. त्याच्याशिवाय कादंबरी कशी होणार? पण मी आधी म्हणालो तसं ही गोष्ट किंवा कथानक हे निमित्तमात्र असतं. त्याच्या निमित्तानं लिहिणारा माणसांविषयी, त्यांच्यातल्या नात्यांच्या गुंत्याविषयी किंवा एकूणातच जगण्याविषयी जे काही मांडतो, ते महत्त्वाचं. किंवा लिहिणारा कळत नकळत जे काही शोधत असेल ते हेच. आपले सगळे पेच जगण्यासंबंधी असतात; माणसामाणसांतल्या नात्यासंबंधीच असतात. कादंबरी लिहिणं हा म्हणूनच मला जगणं समजावून घेण्याच्या प्रक्रियेचा भाग वाटतो. आणि म्हणूनच व्यापक अर्थानं लिहिणारा माणूस तीच ती गोष्ट पुन्हा पुन्हा लिहित असतो. त्याचवेळी त्यातून नवे, जास्तीचे काही शोधण्याचा प्रयत्न करीत असतो. पुष्कळदा सारं आयुष्य निघून जातं आणि काहीच हाती लागत नाही. किंवा काय दिसलं, काय सापडलं हेही कळत नाही. (कधी केवळ सवय म्हणून वा लिहिता येतं म्हणून लिहिणारे लिहित राहतात, त्यांच्याविषयी मला काहीच म्हणायचं नाही.) तरीही शोधण्याच्या प्रयत्नाचं मोल कमी आहे असं मला वाटत नाही. कारण या प्रयत्नांमुळंच लिहिणाऱ्याचं जगणं अर्थपूर्ण होत असतं. त्याच्या जगण्याला आशय मिळत असतो आणि हे फक्त लिहिणाऱ्या लोकांचं वा कलावंतांचं असेल असं नाही तर साऱ्यांचंच असणार. जगण्यासंबंधी, सभोवताली घडणाऱ्या गोष्टींसंबंधी, त्यांच्या भूत, भविष्य, वर्तमानासंबंधी कुतूहल सगळ्यांनाच असते. ते फार तर कमी वा जास्ती असेल, पडणाऱ्या प्रश्नांचं स्वरूप वेगळं वेगळं असेल, प्रकट होण्याच्या पद्धती वेगवेगळ्या असतील पण ते असतं आणि प्रत्येकजण या ना त्या परीने आपलं जगणं अर्थपूर्ण करण्यासाठी धडपडत असतो. लेखक, विचारवंत, समाजकारणी, राजकारणी असे सगळे यात येतात.

कादंबरी हा एका अर्थानं एक वैचारिक प्रयोग (though experiment) असतो. प्रत्येक

लिहिणारा तो आपल्या आपल्या पद्धतीने करीत असतो किंवा हा प्रयोग करण्याची रीत सापडणं, सापडत राहणं हाही त्याच्या लिहिण्याच्या प्रक्रियेचा भाग असतो. कारण त्याच्या आकलनाशी संवादी अशी रीत शोधणं ही त्याची सुप्त आकांक्षा असते. हा इतका खुला आणि मुक्त वाङ्मयप्रकार आहे की त्यात लिहिणाऱ्याला पाहिजे तसा हात चालवता येतो. कलाकृती म्हणून तिला आकार यायला पाहिजे तर तोही आपोआप येतोच. तुमच्या अनुभवाशी तुम्ही किती घट्ट राहता, प्रामाणिक राहता आणि तुम्ही शोधताय ते तुम्हाला किती आणि कसं दिसतंय, यावर तो अवलंबून असणार. त्यासाठी जाणीवपूर्वक वेगळं असं फार काही करावं लागत नाही.

आपल्याकडं एकूणच गद्यलेखनात रीतीभाती, तंत्रमंत्र यांचा इतका बडेजाव झालेला, त्यात ठोकळबाज व्याख्यांनी लिहिणारेच स्वतःला कैद करून घेत असतील तर त्याला बाकी कोण काय करणार? नवं काही शोधायचं तर त्यासाठी नवी रीत ही पाहिजेच. इतरांनी आधी केलंय ते गिरवण्यात काय मतलब?

ही कादंबरी लिहिताना मी कथानक, उपकथानक अशी गुंफण वगैरे करण्याच्या भानगडीत पडलो नाही हे वाचणाऱ्यांच्या लक्षात येईलच. काही पायंडे मोडण्यासाठी हेतुपूर्वक मी हे केलंय असंही मला म्हणायचं नाही. चतुराईनं काही केलंय असं तर अजिबातही नाही. अगदी ठरवलं तरी मला ते जमत नाही, जमलेलं नाही. आशय त्याची रीत घेऊन येतो, हे जाणत्या लोकांचं म्हणणं मला पटतं. आणि तसं त्याला मी त्याच्या रीतीनं येऊ दिलंय, असं मला वाटतं.

लिहिताना पात्र, प्रसंग हे काही नुसते कल्पनेतून येत नाहीत. कारण कल्पनेचे सगळे व्यूहच मुळात जगण्यातून येतात. घडतं ते लिहिणाऱ्याच्या आकलनाच्या, अग्रक्रमांच्या संस्कारातून येतं. त्यांची मुद्रा घेऊन येतं. निखळ सत्य नावाची गोष्ट असणारच पण सत्यालाही स्वीकारताना वा मांडताना ते चांगल्यावाईट अर्थानं दूषित होतं; सापेक्ष होतं. निखळ वा निरपेक्ष सत्य मांडणं, शोधणं ही लिहिणाऱ्यांची आकांक्षा असते हे खरं, पण प्रत्यक्षात ते तिथवर जाण्याचे प्रयत्नच असतात.

लिहिण्याचं कसं मनात येतं? त्याआधी काय होतं? कोणत्या क्षणी लिहिणारा लेखणी उचलतो? ती कशी सुरू होते? या प्रश्नांना ठराविक उत्तरे नाहीत. एकतर प्रत्येक लिहिणाऱ्याची ती वेगवेगळी असणार आणि पुन्हा प्रत्येक पुस्तकासंबंधी ते वेगवेगळं असतं, मला असं वाटतं की एकूण हे लिहिण्याचं प्रकरण सुरू होतं, त्याच्या कैक आधी सबोध/ अबोध पातळीवर मनात ते घडत असावं. म्हणजे असं की लिहिणारा लिहित नसतो तेव्हाच तो खऱ्या अर्थानं लिहित असतो. म्हणूनच प्रत्यक्ष लिहिणं ही केवळ एक दृश्य कृती, एक अनुषंगिक कृती, एक परिपाक, एक निष्पत्ती असते. लिहिणं ही दिसणारी गोष्ट. घनता असलेली एक सॉलिड गोष्ट. मनात घडणारं फ्लुईड (Fluid) असतं. त्याचं नेमकं काय सांगणार? पण लिहिताना ज्याअर्थी सगळंच आधी दिसत नाही त्याअर्थी ते नसतंच असंही नाही. ते असतं म्हणून तर येतं. पण ते अनेक लवचिक भिंती ओलांडून येतं. कधी क्वांटम मेकॅनिकल टनेलिंग करूनही येतं. (पुष्कळांना लिहिण्याआधी सगळं दिसतं, असं म्हणतात. मला ते कळत नाही. इतकं सगळं दिसत असेल तर लिहायचं कशाला, हा माझा प्रॉब्लेम.) इतकं भराभर सारं येत असतं आणि मन जितक्या जोरात धावतं तितकी लेखणी धावत नाही, लिहिण्याच्या व्यूहात एकदा अडकलं - म्हणजे जे लिहायचं त्यात बऱ्यापैकी पुढं गेलं की कधी एकदा याच्यातून सुटतो असं होतं. त्यामुळे

अनेकदा असं होतं की कथानकाचं घोडं आधी उगी दुबळेपणानं धावत असतं, ते अखेर इतकं धावायला लागतं की विचारता सोय नाही. तबियतीत, आरामसे असं जमत नाही. हे तितकंसं ठीक नाही, हे कळत असतं, तरी त्याच्यावर मला नीट मात करता आलीय असं वाटत नाही. प्रयत्न केलेले अर्थातच आहेत.

'हे माझ्याकडून कसं लिहिलं जातं - मला तर अनेकदा असं वाटतं की कुणीतरी माझ्याकडून हे लिहून घेतं.' स्वतःच्या लिहिण्यासंबंधी बोलताना विजय तेंडुलकर एकदा म्हणाले होते. म्हणजे व्यंकटेश माडगूळकरांच्या 'ते होऊन जातं!' सारखं हेही. एकूण असं की या सगळ्या सांगण्या - खोदण्यानंतरही लिहिणं या गोष्टीसंबंधीचं गूढ शिल्लक राहातच. आणि ते राहतच हे खरं आहे. माणूस नादानं झपाटला जातो, कसल्यातरी हाकांनी झपाटल्यासारखा होतो. सगळ्या धमन्या तत्पर होतात. इतकं सगळं कुठून कसं कसं येतं आणि ज्याच्या त्याच्या जागी बसतं. माणसं, स्वभाव, मनोव्यापार, वृत्तीनुसार विश्लेषण बदलतं, आकलन, मांडणी - सगळे रंगच बदलतात. एकाच सत्याकडं पाहण्यासाठी किती कोन आणि किती दिशा धावून येतात, हे अचंबा करीत राहावं असं गूढ; आपल्यापाशी वेगळं काहीतरी आहे असं मनाला सांगणारं, अनेकदा अहंकार सुखावणारं आणि नादावणारं हे लिहिण्याचं इंद्रिय - एका मर्यादेपल्याड ते गूढच राहतं हे खरं.

(रंगनाथ पठारे, ५ समता सोसायटी, संगमनेर कॉलेजजवळ, संगमनेर ४२२६०५)

जन्म : २० जुलै १९५० जवळे (ता. पारनेर), जि. अहमदनगर

व्यवसाय: जून १९७३ पासून संगमनेर महाविद्यालय, संगमनेर येथे पदार्थविज्ञानाचे व्याख्याते.

प्रकाशित पुस्तके : कादंबऱ्या - दिवे गेलेले दिवस, रथ, चक्रव्यूह, हारण, टोकदार सावलीचे वर्तमान, ताम्रपट, दुःखाचे श्वापद

कथासंग्रह : अनुभव विकणे आहेत, स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग, ईश्वर मृतात्म्यास शांती देवो

## साभार स्वीकार

**सुरेश एजन्सी, पुणे २**

- धूळपाटी : शांता शेळके. पृष्ठे २०८. एकशे चाळीस रुपये.
- कवितेच्या शोधात : अरुणा ढेरे. पृष्ठे १४३. एकशे दहा रुपये.
- शाकुंतल - नाट्यकथा : मधुकर आष्टीकर. पृष्ठे ८८. पासष्ट रुपये.
- तुटक्या कानाचे रहस्य : भा. रा. भागवत. पृष्ठे ८०. पासष्ट रुपये.

**मीनल प्रकाशन, कोल्हापूर**

- पूर्णरूप राजसंन्यास : रा. ग. गडकरी. पृष्ठे १३२. सत्तर रुपये.
- लांब उडी, उंच उडी : शरद भाटे. पृष्ठे ४०. वीस रुपये.
- व्यसनात गुंतता : डॉ. किशोरी सुरेंद्र पै. पृष्ठे ५५. पंचवीस रुपये.
- आरोग्य कसे संभाळावे : डॉ. किशोरी सुरेंद्र पै. पृष्ठे ९५. पन्नास रुपये.
- झुंज : ममता तावडे : डॉ. किशोरी सुरेंद्र पै. पृष्ठे ५६. वीस रुपये.
- काय खावे, किती खावे : सुभाष आठले. पृष्ठे ४०. पंधरा रुपये.
- प्रथमोपचार : सुभाष आठले. पृष्ठे ५६. वीस रुपये.
- म्हणे वैद्यराज : डॉ. एस. बी. पाटील. पृष्ठे ३६. पंधरा रुपये.
- आशियाई स्पर्धा : शरद भाटे. पृष्ठे ७२. तीस रुपये.



अनुक्रमणिका

**देशमुख आणि कंपनी पब्लिशर्स, पुणे ३०**
- अग्निकाष्ठ : वावू विरादर. पृष्ठे २७९. एकशे पंचाहत्तर रुपये.

**शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर**
- अस्मिता : स्मिता शानभाग. पृष्ठे ४८. बावीस रुपये.
- पैलस्वर : अशोक वाडकर. पृष्ठ ४८. तीस रुपये.
- दावेदार : भाऊ पाध्ये. पृष्ठे १३६. एकशे दहा रुपये.
- अर्जुन : सुनील गंगोपाध्याय. पृष्ठे १४०. एकशे वीस रुपये.
- ईश्वर मृतात्म्यास शांती देवो : रंगनाथ पठारे. पृष्ठे. १४२. एकशे वीस रुपये.
- सस्य श्यामला : एस. एस. भांगरे . पृष्ठे. १७६. एकशे पंचवीस रुपये.

**साकेत प्रकाशन, औरंगाबाद**
- मडकं गेलं फुटून : फ. मु. शिंदे. पृष्ठे ३०. अकरा रुपये.
- सभापती : योगीराज वाघमारे. पृष्ठे ८९. पंचेचाळीस रुपये.
- प्राचार्य : ना. य. डोळे. पृष्ठे. १२८. पासष्ट रुपये.
- नोकराचा सदरा : विनोदकुमार शुक्ल अनु. निशिकांत ठकार. पृष्ठे १९२. शंभर रुपये.
- अंधेर नगरी : लक्ष्मीकांत देशमुख. पृष्ठे २३१. शंभर रुपये.

**मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे**
- मानदंड : ग. अ. फडके. पृष्ठे २७८. एकशे पंचाहत्तर रुपये.
- विगवुल आणि स्मॉल गाय : ज्ञानेश्वर पारगावकर. पृष्ठे २२२. ऐंशी रुपये.
- पराजिता : मंगला निगुडकर. पृष्ठे १८४. नव्वद रुपये.
- उन्हातील चांदणं : सुरेश पोरे. पृष्ठे १७६. शंभर रुपये.
- दवबिंदू : वि. स. खांडेकर. पृष्ठे १०३. पंचवीस रुपये.
- चांदण्यात : वि. स. खांडेकर. पृष्ठे ८७. पस्तीस रुपये.
- हस्ताचा पाऊस : वि. स. खांडेकर. पृष्ठे १०६. पस्तीस रुपये.
- आजची स्वप्ने : वि. स. खांडेकर. पृष्ठे १३७. साठ रुपये.
- ढगाआडचे चांदणे : वि. स. खांडेकर. पृष्ठे ११५. पंचेचाळीस रुपये.
- वायुलहरी : वि. स. खांडेकर. पृष्ठे ११२. पंचवीस रुपये.
- झाड बकुळीचं : रंगा मराठे. पृष्ठे ११६. ऐंशी रुपये.
- साहित्याचा अन्वयार्थ : नागनाथ कोतापल्ले. पृष्ठे २४२. दीडशे रुपये.

**पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४**
- नटसम्राट : वि. वा. शिरवाडकर. पृष्ठे १०६. शंभर रुपये.
- एकूण कविता भाग २: दिलीप पु. चित्रे. एकशे पंचाहत्तर रुपये.

**काव्यसंग्रह**
- मी सर्वांचा : सुभाष पवार. साहित्य कलायात्री प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६८. पंधरा रुपये.
- माणसांचा जनक : दीपक त्रिभुवन, वैजापूर. पृष्ठे ६१. साठ रुपये
- मी एक शून्य : अनुराधा चिन्मुळगुंद. डिंपल प्रकाशन, वसई. पृष्ठे ८०. चाळीस रुपये.
- पावसाच्या कविता : मिलिंद जोगळेकर. स्वान कम्युनिकेशन पृष्ठे ६४. वीस रुपये.
- दिशान्त : भारतभूषण गायकवाड. इसाप प्रकाशन. नांदेड. पृष्ठे ७२. चाळीस रुपये.
- अनाहत : सुधांशु. मधुराज पब्लिकेशन, पुणे. पृष्ठे ८४. पंचेचाळीस रुपये.
- विचित्र विनोदलहरी : वि. आ. काळे. काळे पब्लिकेशन्स, पुणे. पृष्ठे १०४. पन्नास रुपये.
- माय ग्राफ : मोहन विष्णू खडसे. नितीन प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ५२. बावीस रुपये.
- अर्घ्य : अनिल रत्नपारखी. नेहा मिलिंद, पुणे. पृष्ठे ५२. सत्तर रुपये.
- नाते वेदनेशी : सिंधू कुलकर्णी उस्मानिया. पृष्ठे ४८. पंचेचाळीस रुपये

अनंत सामंत

# के फाईव्ह

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चं पत्र हातात आलं तेव्हा लेख पाठवण्याची तारीख उलटून गेली होती. दसरा उजाडला होता. ज्या कादंबरीबद्दल मी लिहावं असं त्या पत्राद्वारे सुचवण्यात आलं होतं त्या कादंबरीचा विचार करता हे योग्यही होतं. हा लेख लिहिणं टाळण्यासाठी तेच समाधानकारक कारणही ठरू शकलं असतं. पण लिहायचं, का नाही ते ठरवणारा मी कोण? शेवटी प्रत्येक कादंबरी, प्रत्येक लेख, प्रत्येक शब्द स्वतःचं असं नशीब बरोबर घेऊनच जन्माला येतो. त्या नशिबाची, नियतीची, योगायोगाची गम्मत बघणं एवढंच आपल्या हातात असतं.

आज दसरा आहे. त्या दिवशीही दसराच होता. तेव्हा एका मोठ्या फॅब्रिकेशन युनिटचं मार्केटिंगचं काम मी बघत होतो. एम. एस. ई. बी., बी. ई. एस. टी, सीमेन्स, व्होल्टास हे आमच्या गिऱ्हाईकांपैकी काही प्रमुख. त्या दसऱ्याला आमच्या फर्मच्या वतीने मी एका उद्योजकाकडे पूजेसाठी गेलो होतो. तेव्हा मला एका बाजूला घेऊन त्याने ऑफर दिली होती. ज्या प्रकारच्या कंपनीसाठी मी फक्त मार्केटिंगचं काम करत होतो तशाच प्रकारच्या दुसऱ्या एका कंपनीचा संपूर्ण कारभार माझ्या हातात द्यायला तो तयार होता, निम्म्या भागीदारीसह!

मला ती सुवर्णसंधी नाकारता आली नाही.

आधीच्या कंपनीला मी दोन महिन्यांची नोटिस दिली. इंजिन आणि बॉडीचं संपूर्ण काम करून घेण्यासाठी फियाट गॅरेजमध्ये टाकली. एक जानेवारीनंतर नवी कंपनी हातात घेण्याचं ठरलं होतं, त्याआधी नाताळच्या सुटीत महाबळेश्वर, कोकण, गोवा मनसोक्त हिंडून यायचं ठरवलं.

गॅरेजचं बजेट नेहमीप्रमाणे अंदाजाच्या दुप्पट झालं. काम संपता संपत नव्हतं. बँकेतला अकाऊंट कोरडा पडत होता.

त्याच सुमारास बाबरी मस्जिद पडली. जी कंपनी मी चालवायला घेणार होतो त्या कंपनीची शटर्स फोडून आतील यंत्रसामुग्रीची भयानक तोडफोड केली गेली.

माझं नवं कॉंट्रॅक्ट सुरू होण्याआधीच निकाली निघालं.

हातात असलेल्या नोकरीला दिलेल्या नोटिसीची मुदत संपली होती. माझी जागा घेणाऱ्या तरुणाने त्याची आधीची नोकरी सोडली होती. गॅरेजवाल्याच्या पाठी लागून लागून चकचकीत करून घेतलेली



अनुक्रमणिका

फियाट देखणी होऊन दारासमोर उभी होती.

हातात उरलेले पैसे फक्त महिन्याभराच्या आमच्या जेवणखाण्याला किंवा फियाटच्या पेट्रोलला पुरतील एवढेच होते.

तो दिवस होता १९ डिसेंबर १९९२.

सव्वीस डिसेंबरला फियाट घेऊन भटकंतीला निघायचं हे आम्ही दसऱ्यालाच ठरवलं होतं.

पुढे उगवणाऱ्या दिवसांचा हिशोब आमच्या स्वप्नांशी कसा जुळवायचा याचा विचार करत मी बसलो होतो.

बेल वाजली. 'धनंजय' आणि 'चन्द्रकान्त'चे संपादक राजेन्द्र कुलकर्णी आत आले.

दिवाळी अंकाच्या कारणाव्यतिरिक्त ते आमच्याकडे येत नाहीत.

ते दिवाळी अंकाचे दिवस नव्हते.

पण ते आले. 'दिवाळी ९३' साठी त्यांनी कादंबरी मागितली. ॲडव्हान्स दिला. मनातल्या मनात डिसेंबरची ठरवलेली भटकंती निश्चित करत मी त्यांना निरोप दिला.

बायकोने नेहमीप्रमाणे विचारलं, 'काय लिहिणार आहेस?'

'माहीत नाही!' मी प्रामाणिकपणे उत्तरलो.

'परत आल्यावर लिहिणार आहेस?'

'नाही.' मी म्हणालो, 'निघण्याआधी कादंबरी त्यांच्या हातात ठेवणार आहे. त्याशिवाय मी त्यांचे पैसे वापरू शकणार नाही.'

मी मूर्ख असल्याप्रमाणे तिने माझ्याकडे पाहिलं.

तिरमिरल्याप्रमाणे मी माझ्या खुर्चीत बसलो, समोर ताव होते, पेन होतं, दौत होती.

एकतीस डिसेंबरला कादंबरी लिहून पूर्ण झाली. एकतीस डिसेंबरच्या संध्याकाळी तिच्या तीन झेरॉक्स प्रती माझ्या हातात होत्या. एकतीस डिसेंबरच्या मध्यरात्रीपर्यंत तीन वाचकांनी माझ्याकडून त्या वाचायला घेतल्या.

सहा जानेवारी १९९३ ची दंगल मुंबईत उसळण्याआधी निदान सहाजणांनी ती कादंबरी संपूर्ण वाचून काढली होती.

त्या कादंबरीचा कथाविषय होता, सहा जानेवारी १९९३ नंतर मुंबईत आणि इतरत्र उसळलेली दंगल.

त्या कादंबरीचं नावं होतं 'के फाईव्ह.'

०

कदाचित हा लेख पूर्ण लिहून झाल्यानंतर मी तो फाडून फेकून देईन.

कदाचित हा लेख वेळेवर न पोहोचल्याने प्रसिद्ध होणार नाही.

कदाचित हा लेख साभार परत येईल.

पण, - कदाचित हा लेख प्रसिद्ध होईल ही शक्यताही ध्यानात घेतली तर हा लेख लिहिणं, - एवढ्या प्रामाणिकपणे लिहिणं हा मला माझा मूर्खपणा वाटतो. आणि तरीही हे लिहिल्याशिवाय

राहवत नाही. कारण आत्तापर्यंत मलाच न सापडलेली उत्तरं कदाचित या लेखाच्या निमित्ताने सापडतील.

o

उत्कृष्ट कादंबरी कशाला म्हणावं? जी खूप अभ्यासपूर्वक लिहिलेली असते, जिच्यात बारीक सारीक बारकावे अचूकपणे टिपलेले असतात, ज्या कादंबरीतील स्थळांना भेटी देऊन लेखकाने महत्त्वाचे तपशील जमवलेले असतात, जी लिहिल्यानंतर अनेक दिवस बाजूला ठेवून परत एकदा अभ्यासपूर्वक वाचून, विचार करून, परत एकदा लिहून काढलेली असते.

उत्कृष्ट कादंबरीची ही सर्व लक्षणं मला पूर्णपणे मान्य आहेत.

पण 'के फाईव्ह' मी केवळ साडेचार दिवसांत लिहिली. 'के फाईव्ह' मध्ये चितारलेल्या घटनास्थळाला मी ती कादंबरी लिहिण्याआधी भेट दिली नव्हती. त्यात घडणाऱ्या घटनांचाही तोपर्यंत तरी मी अभ्यास केला नव्हता. कारण त्या घटना तोपर्यंत घडल्याच नव्हत्या.

हे सर्व स्वतः लेखकाने मान्य करणं कितीसं शहाणपणाचं आहे?

'के फाईव्ह' लिहिण्याआधी मी हिमाचल प्रदेशला भेट देऊन आलो. मुश्ताक पटेल आणि जुईलीने जी वाट तुडवली त्याच वाटेने मी चालत गेलो. बॉर्डर सिक्युरिटी फोर्सच्या ज्या कॅम्पमध्ये त्यांचं वास्तव्य होतं त्याच कॅम्पमध्ये मी राहिलो, त्याच ट्रेनने मुंबइला परतलो. रहिमतखानच्या अड्ड्यावरही मी जाऊन आलो असं मी ठासून सांगायला काय हरकत आहे?

त्यामुळे कादंबरीची साहित्यमूल्येही कितीतरी वाढतील!

नाही?

o

पण 'के फाईव्ह' मध्ये वर्णन केलेली जवळ जवळ प्रत्येक घटना आधी नाही पण नंतर कधीतरी घडल्याचे आजपर्यंत कळतेच आहे.

o

बाबरी मस्जीद भारतीयांनी पाडल्याचे कानावर प्रथम आले तेव्हाच माझा त्या बातमीवर विश्वास बसला नव्हता.

आजपर्यंत भारतीयांनी अशा किती मशिदी, किती प्रार्थनास्थळं पाडलेयत?

सर्वसामान्य भारतीय नागरिकांचा घोळका बेभान होऊन एक मशीद पाडतो ही कल्पनाच मला अशक्य कोटीतील वाटते.

कदाचित जगभरच्या इतिहासात मुसलमानांनीच एकमेकांच्या मशिदींवर हल्ला केल्याची उदाहरणे अधिक सापडतील.

वृत्तपत्रीय विधानांनुसार मशीद पडली त्या वेळेपर्यंत शिवसैनिक तिथपर्यंत पोहोचू शकले नव्हते.

बाकी प्रत्येक संभाव्य पक्षाचा नेता भयानक गोंधळलेल्या अवस्थेत होता.

मशीद पाडून संपविण्यापेक्षा ती उभी ठेवण्यातच प्रत्येक राजकीय पक्षांचा फायदा होता.

मग मशीद पाडण्यात कोणाचा फायदा होता? मशीद पाडणाऱ्यांना मशीद पाडल्यानंतर काय अपेक्षित होतं?

हे विचार मनात आले आणि एकाएकी भयानक दंगलीचा देशभर उसळणारा आगडोंब उसळण्याआधीच माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला.

मला ती माझी अपरिपक्वता वाटली.

मला ते एक भयानक स्वप्न वाटलं.

अस्वस्थ करणारं ते भीतिदायक स्वप्नं शक्य तेवढ्या वेगाने मी कागदावर उतरवलं.

त्या भयानक स्वप्नापासून सुटका करून घेण्यासाठी, संपादकाची मागणी हे केवळ निमित्त होतं.

त्या कादंबरीचं नाव : 'के फाईव्ह'.

०

त्यानंतरच्या अनेक खटल्यांत दिल्या जाणाऱ्या साक्षींमधून बाहेर येणाऱ्या तपशीलात 'के फाईव्ह' मधील घटना मला हळूहळू सापडत गेल्या. अजूनही सापडतात.

दुर्दैवाने, 'के फाईव्ह' मधली जवळजवळ प्रत्येक घटना ही आजपर्यंत सत्य घटना ठरली आहे.

हल्लीच एकदा नासिकमध्ये मी आनंद जोर्वेकर आणि किशोर पाठकांबरोबर गप्पा मारत होतो.

'तुम्हाला असं नाही वाटत, सामंत,' जोर्वेकरांनी मला विचारलं, 'वाढणाऱ्या वयाबरोबर आपल्या संवेदना बधीर आणि बोथट होत जातायत?'

'म्हणजे काय?' मी सावधपणे विचारलं.

'म्हणजे काही वर्षांपूर्वी एखाद्या घटनेने आपण ज्याप्रमाणे उसळून उठत होतो, चिडत होतो, रडत होतो, हसत होतो तेवढे संवेदनाशील आपण आता उरलो नाही.'

त्यांना उत्तर देताना मी पहिल्यांदाच कबूल केलं - रागिणी पुंडलिकांनी विद्याधर पुंडलिकांबद्दल लिहिलं होतं, पुंडलिक कथा लिहिताना स्वतःही रडायचे, हसायचे.

तेव्हा ते वाचताना मला विचित्र वाटलं होतं. माझा विश्वास बसला नव्हता.

'के फाईव्ह' लिहिताना आयुष्यात पहिल्यांदाच माझ्याच शब्दांनी मी रडलो.

डोळ्यासमोर घडणाऱ्या घटना जसजशा स्पष्ट होत तसतसे समोरचे कागद दिसेनासे होत. डोळे पाण्याने भरत. चिडीने हात थरथरत. पेन खाली टाकून मी सुन्न बसून राही.

'के फाईव्ह' लिहून संपली आणि पहिला विचार मनात आला, - ही कादंबरी कपाटात बंद करून ठेवावी.

ही कादंबरी कुणालाही दाखवू नये.

०

चेक घेतला होता. व्यवहार ठरला होता. 'के फाईव्ह' मी राजेन्द्र कुलकर्ण्यांच्या हाती सुपूर्द केली.

सहा जानेवारीनंतर दंगल उसळली. कुलकर्णींनी 'के फाईव्ह' परत आणून दिली. त्या पेटलेल्या वातावरणात ती कादंबरी प्रसिद्धीसाठी स्वीकारण्याचा धीर त्यांना झाला नाही.

'के फाईव्ह' माझी मला परत मिळाली.

०

आणखी कुणालाही न दाखवता 'के फाईव्ह' च्या सर्व प्रती मी कपाटात बंद केल्या.

काही प्रकाशकांपर्यंत मी 'के फाईव्ह' लिहिल्याची बातमी पोचली होती. त्यांच्याकडून त्या कादंबरीला वाढत्या प्रमाणात मागणी येत होती. पैशाची गरज संपलेली नसूनही 'के फाईव्ह' कपाटातून बाहेर काढायला मी तयार नव्हतो.

मॅजेस्टिकमध्ये रोज भेटणारे दिलीप प्रकाशनचे दिलीप काळे हे प्रकाशकमित्रही त्यामुळे माझ्यावर रागावून बसले.

काहींना ते माझं धंद्याचं टेक्निक वाटलं. माझे होणारे हाल मलाच कळत होते.

०

मॅजेस्टिकमध्ये अशोक कोठावळेही रोज भेटत होते. 'दीपावली'ने कादंबरी स्पर्धा आयोजित केल्याचं त्यांच्याकडूनच कळलं.

तेव्हाच कधीतरी बोलता बोलता त्यांनी विचारलं, 'तुमच्याकडे आहे की नाही एखादी कादंबरी, सामंत?'

'नाही!' मी तेव्हा उत्तरलो.

'के फाईव्ह' लिहून एक वर्ष होऊन गेलं होतं. पण 'के फाईव्ह' स्वस्थही राहू देत नव्हती. शेवटी मला राहवलं नाही.

"स्पर्धेसाठी देत नाही, 'दीपावली' ही कादंबरी छापणार नाही. पण एक मित्र म्हणून ही कादंबरी वाचा." एवढंच सांगून 'के फाईव्ह'चं बाड मी त्यांच्या हातात दिलं.

त्याच्या दुसऱ्याच दिवशी 'चंद्रकान्त'चे राजेन्द्र कुलकर्णी 'के फाईव्ह' परत मागण्यासाठी आले.

'मॅजेस्टिक'ने 'के फाईव्ह' पारितोषिकासाठी निवडली.

१९९२ च्या डिसेंबर महिन्यात लिहिलेली 'के फाईव्ह' '१९९४ दीपावली' मध्ये प्रसिद्ध झाली.

'के फाईव्ह' प्रसिद्ध होणार या कल्पनेनेच मी थरारलो.

वाचकांकडून कसली अपेक्षा ठेवावी तेही कळत नव्हतं.

दिवाळीनंतर एक एक महिना जाऊ लागला तसतसं माझ्या लक्षात येऊ लागलं. 'के फाईव्ह' प्रकाशित झाली होती. 'प्रसिद्ध' झाली नव्हती.

शंभरेक प्रतिक्रिया माझ्यापर्यंत पोहोचल्या.

'के फाईव्ह वाचून दंगल परत एकदा जगले' अशा अर्थाची आलेली दोन पत्रे, – त्या दोन स्त्रिया 'के फाईव्ह' लिहिताना मी गाळलेले अश्रू मला परत देऊन गेल्या.

०

ही कादंबरी 'दीपावली ९४' साठी निवडल्यानंतर प्रसिद्धीआधी अशोक कोठावळ्यांनी तिचं हस्तलिखित परत माझ्याकडे दिलं होतं.

'परत एकदा वाचा आणि वाटल्यास काही सुधारणा करा' असं सुचवलं होतं.

तेव्हा 'के फाईव्ह' मी परत एकदा वाचली. दोन कर्नल्सना भेटलो. कमांडो युनिटसूची माहिती गोळा केली. त्यांच्या हालचाली टिपल्या, शस्त्रास्त्रांची ओळख करून घेतली. त्यांच्यापैकी एकाला 'के फाईव्ह' वाचायलाही दिली.

'राधाबाई चाळ' यासारख्या एखाद दुसऱ्या शब्दाचा अपवाद वगळता जे हस्तलिखित अशोक

कोठावळे यांनी सुधारण्यासाठी माझ्याकडे दिलं होतं, तेच आणि तसंच मी प्रकाशनासाठी त्यांना परत दिलं.

त्यात बदल करावा लागू नये याचं सगळ्यात जास्त आश्चर्य मला वाटलं होतं.

०

'के फाईव्ह' ही दहशतवाद्यांविरुद्ध लढणाऱ्या एका कमांडोची कहाणी आहे.

'के फाईव्ह' ही दुर्बलांविरुद्ध लढणाऱ्या एका दहशतवाद्याची कहाणी आहे.

'के फाईव्ह' ही स्वतःच्या अस्तित्वासाठी झगडणाऱ्या एका 'स्त्री' ची कहाणी आहे.

०

युद्ध ट्रॉयचं असू दे, कुरुक्षेत्रावरलं असू दे अथवा रामरावणाचं असू दे, त्या युद्धाला कारण असतो तो 'स्त्रीतेजाचा' विखार!

जीत होते ती त्या 'स्त्री'ची होते.

हार होते ती 'स्त्री'मुळे होते.

हे सत्य मला कधीच नाकारता आलेलं नाही.

'के फाईव्ह' मध्येसुद्धा.

के फाईव्हसारखा एखादाच पुरुष या जगात स्त्रीसमोर तिच्या एवढ्याच ताठपणे उभा राहू शकतो.

'के फाईव्ह' दिवाळी अंकात प्रसिद्ध होऊन दोन वर्षे होऊन गेली आहेत.

मॅजेस्टिक प्रकाशनाने ही कादंबरी पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यासाठी स्वीकारली त्यालाही दोन वर्षे उलटली आहेत.

इतर प्रकाशक हीच कादंबरी प्रसिद्धीसाठी मागत असूनही मी त्यांच्याकडे दुर्लक्ष करतोय.

का?

०

या भाषेतील दोनच प्रकारच्या पुस्तकांचा दैनंदिन जीवनावर परिणाम होऊ शकतो. पाकक्रियांच्या पुस्तकांमुळे स्वयंपाकाची चव बदलते आणि धार्मिक पुस्तकांमुळे निष्क्रिय डोकी बधीर करणारे मंत्रघोष सापडतात.

०

कदाचित 'के फाईव्ह' पुस्तकरूपाने प्रकाशित होईल.

कदाचित होणारही नाही.

०

शेवटी प्रत्येक कादंबरी, प्रत्येक लेख, प्रत्येक शब्द स्वतःचं असं नशीब बरोबर घेऊनच जन्माला येतो. त्या नशीबाची, नियतीची, योगायोगांची गम्मत बघणं एवढंच आपल्या हातात असतं.

कदाचित 'के फाईव्ह'च्या अकराशे प्रती पुढल्या अकरा वर्षात विकल्या जातील.

कदाचित 'के फाईव्ह'च्या अकरा हजार प्रती एका वर्षात विकल्या जातील.

कदाचित आणखी तीस वर्षांनी एखाद्या परिसंवादात 'के फाईव्ह' चा ओझरता उल्लेख होईल.

कदाचित पुढल्याच साहित्य संमेलनात 'के फाईव्ह'वर चर्चासत्र घेतले जाईल.

मला त्याबद्दल काहीही म्हणायचं नाही.

नशीबाची, नियतीची, योगायोगांची जी गम्मत बघायचीय ती या कादंबरीच्या अंताबद्दल.

या कादंबरीचं जवळ जवळ सर्व कथासूत्र वर्तमानाने मान्य केलं आहे.

आता फक्त मुश्ताक पटेलची शेवटची कृती उरली आहे.

मी मुश्ताक पटेलची वाट पहातोय.

'के फाईव्ह' लिहिताना जे माझे आसू सांडले ते परत देऊन जाणाऱ्या त्या दोघींचे मी तेवढे देणे आजही लागतो.

ते देणे फेडता येईल का नाही एवढीच चिंता.

(अनंत सामंत, सी १५/१ जीवन वीमा नगर, बोरिवली (प.), मुंबई ४०० १०३)

---

जन्मतारीख - १२ ऑगस्ट १९५२. डिप्लोमा इन हॉटेल मॅनेजमेंट अँड कॅटरिंग टेक्नालॉजी.
प्रसिद्ध कादंबऱ्या - एम. टी. आयवा मारू (१९८९), त्रिमाकासी मादाम (१९९३), अविरत (१९९५),
वा. म. जोशी पुरस्कार, दि. बा. मोकाशी पुरस्कार, ना. सी. फडके पुरस्कार.

---





अनुक्रमणिका



अनुक्रमणिका

## आमची दर्जेदार प्रकाशने

| | |
|---|---|
| चाणक्य (इंग्रजी) | भा. द. खेर |
| मला भेटलेली माणसं | डॉ. विश्वास मेहेंदळे |
| स्मरणस्वर | नंदा सुर्वे |
| डांग जंगलातील चित्तथरारक शिकारकथा | मधुकर फुकणे |
| पूर्वा (कवितासंग्रह) | जयंत भिडे |
| नाट्यस्पंदने | डॉ. वि. भा. देशपांडे |
| पद्मवळ (कवितासंग्रह) | पद्माकर बोकील |
| रंगपंखी (कवितासंग्रह) | विनिता महाजनी |
| डेगमा जंगलातील रोमहर्षक शिकारकथा | मधुकर फुकणे |

## आमची आगामी प्रकाशने

| | |
|---|---|
| हंगर - नूट हमसून (अनुवाद) | विनायक ऐतवाडकर |
| जिना बिलोरी (रुबाया संग्रह) | रमेश गोविंद वैद्य |
| सोनजातक | प्रा. रतनलाल सोनग्रा |
| नाट्यद्वयी | डॉ. विश्वास मेहेंदळे |

संपर्क

### सिग्नेट पब्लिकेशन्स

१९५, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०

फोन - ४५९४८९

पेजर - ९६१२ - १३०० (मॅक्सपेजर)



अनुक्रमणिका



# श्री . ना . सं . इनामदार यांचे अभिनंदन

अहमदनगर येथे होणाऱ्या ७० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी विख्यात ऐतिहासिक कादंबरीकार ना . सं . इनामदार यांची निवड झाली . याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन . मंत्रावेगळा , झेप , शिकस्त , शहेनशहा , राऊ , झुंज वगैरे त्यांच्या कादंबऱ्यांना लोकप्रियता लाभली . अहमदनगर येथे त्यांचे एका तपाहून जास्त काळ वास्तव्य होते . तेथील वाचनालयांमधून संस्कारक्षम वयात हाती येईल ते पुस्तक वाचण्याची त्यांना गोडी लागली . शालान्त परीक्षेच्या टप्प्यापर्यंत मजल मारण्याआधीच इंग्लिशमधील अनेक रहस्यकथाकार त्यांनी वाचून काढले होते . " माझी आत्मकथा ज्यांनी वाचली असेल त्यांना हा माझा वाचनाचा झपाटा आणि त्याच वेळी भारतातल्या राजकीय परिस्थितीमुळे तरुणवर्ग ज्या इतर गोष्टींकडे आकर्षित होत होता , त्या हालचाली ज्ञात असतील. एका बाजूने माझ्यावर साहित्याचा परिणाम आणि दुसऱ्या बाजूने स्वातंत्र्यचळवळीचे आव्हान तारुण्यात खुणावत होते . दोन्हीत समतोल राखून मी वाचन करीत होतो ." असे त्यांनी 'अत्यंत गुप्त'च्या प्रस्तावनेत म्हटले आहे . पुढे त्यांनी रहस्यकथेकडून आपल्या वाङ्मयीन कारकीर्दीला आरंभ केला. रहस्यकथेकडून ऐतिहासिक कादंबऱ्यांकडे ते वळले . त्रिंबकजी डेंगळे या इतिहासकारांनी बदनाम केलेल्या व्यक्तीला त्यांनी एक पराक्रमी पुरुष म्हणून आपल्या मंत्रावेगळा कादंबरीत कुशलतेने उभे केले . इतिहासात कल्पनेचे रंग मिसळले म्हणून काहीजणांनी टीकाही केली . परंतु इनामदारांनी इतिहासाचा मागोवा घेत अशा वेगवेगळ्या व्यक्तींवरील कादंबऱ्यांचे लेखन चालूच ठेवून वाचकांची मने काबीज केली . 'शहेनशहा' मध्ये तर औरंगजेबच अनेकांना विलक्षण मोहून टाकून गेला . इतिहासाच्या पुस्तकापेक्षा ऐतिहासिक कथाकादंबऱ्या वाचकांच्या मनावर अधिक प्रभाव टाकतात ; आणि कथाकादंबऱ्यांमधून उभी राहिलेली व्यक्तिमत्त्वेच जनमानसात स्थिरावतात . या दृष्टीने ऐतिहासिक कादंबरीकाराचे कार्यकर्तृत्त्व प्रभावशाली ठरते . ना . सं . इनामदार यांची साहित्य संमेलनाच्या अध्यक्षस्थानी झालेली निवड ही त्यादृष्टीनेही लक्षणीय आहे .

# श्रद्धांजली

❖ अहमदनगरच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचे एक उमेदवार बलुतंकार दया पवार हे दिल्लीला एका चर्चासत्रासाठी गेले असताना हृदयविकाराचा तीव्र झटका येऊन, त्यांचे निधन झाले.

❖ दि. २६ सप्टेंबर १९९६ रोजी सातारा येथे भरलेल्या ६६ व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष आणि लोकसत्ताचे माजी संपादक व नामवंत नाटककार विद्याधर गोखले यांचे कानपूर येथे निधन झाले. एका कार्यक्रमासाठी ते तेथे गेले होते.

❖ दि. ३० ऑक्टोबर १९९६ रोजी डोंबाऱ्याचा खेळ, वैतागवाडी, बॅ. अनिरुद्ध घोपेश्वरकर वगैरे कादंबऱ्यांचे लेखक भाऊ पाध्ये यांचे दीर्घकालिन आजाराने वयाच्या सत्तराव्या वर्षी निधन झाले. १९८९ पासून ते अर्धांगवायूने अंथरुणाला खिळून होते. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने त्यांचा गौरव केला होता. त्यांच्या निवडक कथांचा संग्रह दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांनी संपादित करून विस्तृत प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला. त्यांच्यावर एक चर्चासत्रही नुकतेच झाले होते.

❖ 'जेव्हा माणूस जागा होतो' या गाजलेल्या आत्मचरित्राच्या लेखिका गोदावरी परुळेकर यांचेही दीर्घकालीन आजाराने निधन झाले.

❖ रहस्यकथाकार बाबूराव अर्नाळकर यांचे ५ जुलै १९९६ रोजी वृद्धापकाळामुळे निधन झाले.

❖ पुण्यातील कवी व हरहुन्नरी कार्यकर्ते सुधाकर नेर्लेकर हे दि. २० नोव्हेंबर रोजी कालवश झाले. 'पहाट' ही साहित्यसंस्था काढून नवोदित लेखककवींना त्यांनी व्यासपीठ मिळवून दिले. पॅरोल हे एक मासिकही चालवले.

❖ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे माजी सदस्य व एक नामवंत कवी वसंत सावंत यांचे घशाच्या कर्करोगाने रविवार दि. २२ डिसेंबर रोजी मुंबईत निधन झाले. 'स्वस्तिक', 'उगवाई', 'देवराई' आणि 'माझ्या दारातले सोनचाफ्याचे झाड' हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत. सागरेश्वर हा त्यांचा काव्यसंग्रह प्रसिद्धीच्या मार्गावर' आहे. प्रवासवर्णन - एक वाङ्मय प्रकार' या विषयावरील त्यांचा प्रबंध प्रकाशित झाला आहे. सावंतवाडीवासीयांतर्फे ११ एप्रिल ९५ ला त्यांचा षठ्यब्दिपूर्ती गौरव समारंभही झाला. या समारंभानंतर काही दिवसातच त्यांचा आवाज प्रथम घोगरा होऊन नंतर नाहीसाच झाला. कर्करोगाचे निदान झाल्यानंतर त्यांच्यावर रेडिओथेरपीचे उपचार करण्यात आले त्यामुळे काही प्रमाणात त्यांचा आवाज सुटलाही होता. कोकण मराठी साहित्य परिषदेतर्फे त्यांना जाहीर झालेला 'कोकण भूषण पुरस्कार' विंदा करंदीकर यांच्या हस्ते त्यांना रुग्णालयातच प्रदान करण्यात आला होता. सावंतवाडी म्हणजे परमेश्वराला पहाटे पडलेले अपुरे स्वप्न आहे असे ते म्हणत. सुरूच्या झाडातून चंद्र पालवताना कविता भेटली असे डॉ. सावंतांनीच लिहून ठेवले आहे.

या सर्वांना साहित्य परिषदेची विनम्र श्रद्धांजली.

# कार्यवृत्त

## मराठी साहित्य परिषद, पुणे

(जुलै ते डिसेंबर १९९६)

दि. २९ जून १९९६ : दि. बा. मोकाशी पुरस्कार डॉ. अंजली सोमण यांच्या 'बंदिश' या कादंबरीला देण्यात आला

दि. ५ जुलै १९९६ : र. वा. दिघे स्मृतिदिनानिमित्त डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांचे 'मराठीतील चरित्रात्मक कादंबरी' या विषयावर भाषण झाले.

दि. १० जुलै १९९६ : श्री. शंकरराव खरात यांना ७५ वर्षे पूर्ण झाल्यानिमित्त त्यांच्या घरी जाऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. यावेळी सर्वश्री गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर व म. श्री. दीक्षित उपस्थित होते.

दि. १५ जुलै १९९६ : बाबुराव शिरोळे पारितोषिक बालकुमार साहित्यकार श्री. शं. रा. देवळे यांना अनंतराव कुलकर्णी यांच्या हस्ते देण्यात आले. याप्रसंगी श्री. वा. काळे यांचे गौरवपर भाषण झाले.

दि. २२ जुलै १९९६ : ग. ल. ठोकळ पारितोषिक डॉ. बापूराव देसाई यांच्या 'खानदेश साहित्य सुरभि' व श्री. श्रीराम दुर्गे यांच्या 'घडई' या पुस्तकांना शंकरराव खरात यांच्या हस्ते देण्यात आले.

दि. १ ऑगस्ट १९९६ : अण्णाभाऊ साठे यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'सुर्व्यांच्या कवितेची इहवादी समीक्षा' या पुस्तकावरील चर्चेत अश्विनी धोंगडे, अंजली सोमण यांनी विचार मांडले.

दि. ९ ऑगस्ट १९९६ : शंकर पाटील पुरस्कार डॉ. अरुण गद्रे लिखित 'एक होता फेंगाड्या' या कादंबरीस प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या हस्ते देण्यात आला.

दि. १३ ऑगस्ट १९९६ : विश्राम बेडेकर यांना ९० वर्षे पूर्ण झाली म्हणून त्यांच्या घरी जाऊन त्यांचा सत्कार करण्यात आला.

दि. १३ ऑगस्ट १९९६ : आचार्य अत्रे जन्मदिनानिमित्त गो. रा. जोशी यांचे 'अत्रे आणि चित्रपटसृष्टी' या विषयावर भाषण झाले.

दि. १४ ऑगस्ट १९९६ : पु. भा. भावे स्मृतिदिनानिमित्त सौ. चारुशीला ओक यांचे 'भावे यांच्या नाटकातील स्त्रीदर्शन' या विषयावर भाषण झाले.

दि. २१ ऑगस्ट १९९६ : संतश्रेष्ठ सावतामाळी महाराज पुण्यतिथीनिमित्त श्रद्धा भक्तिमंडळातर्फे 'अवघे गरजे पंढरपूर' हा भक्तिरसाचा कार्यक्रम झाला.

दि. २५ ऑगस्ट १९९६ : श्री. ग. प्र. प्रधान यांनी ७५ व्या वर्षात पदार्पण केल्यानिमित्त त्यांच्या घरी जाऊन सत्कार करण्यात आला.

दि. १४ सप्टेंबर १९९६ : बालकवी स्मृतिदिनानिमित्त 'हर्षमानसी' या विषयावर कविसंमेलन आयोजित केले होते. त्यात संजीवनी बोकील, आसावरी काकडे, स्वाती

सामक, अश्विनी धोंगडे, प्रतिभा माळे, इलाही जमादार, शंतनु चिंधडे, गंगाधर महाम्बरे व अनिल कांबळे यांनी भाग घेतला. सौ. हेमा लेले यांनी सूत्रसंचालन केले.

दि. १।१०।९६ : ज्येष्ठ दलित साहित्यिक दया पवार यांच्या दुःखद निधनाबद्दल आयोजित केलेल्या शोकसभेत सर्वश्री रा. ग. जाधव, आनंद यादव, उल्हास पवार, कृष्णा किरवले, रामनाथ चव्हाण यांची भाषणे झाली. श्रद्धांजलीचा ठराव रत्नाकर कुलकर्णी यांनी वाचून दाखवला.

दि. ३।१०।९६ : सातारा येथील ६६ व्या अ. भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष विद्याधर गोखले यांच्या निधनाबद्दल भरत नाट्यमंदिरात झालेल्या शोकसभेत कार्याध्यक्ष गं. ना. जोगळेकर यांनी श्रद्धांजली वाहिली. सर्वश्री म. श्री. दीक्षित, राजा फडणीस व रत्नाकर कुलकर्णी उपस्थित होते.

दि. ६।१०।९६: म. म. दत्तो वामन पोतदार स्मृतिदिनी द्यावयाचा पुरस्कार सौ. शैला दातार यांच्या 'देवगंधर्व' या ग्रंथास डॉ. श्री. दा. संगोराम यांच्या हस्त देण्यात आला. सूत्रसंचालन- कल्याणी दिवेकर, आभार- रत्नाकर कुलकर्णी.

दि. ९।१०।९६: विद्याधर पुंडलिक यांच्या स्मरणार्थ दिले जाणारे पारितोषिक यंदा श्री. चंद्रशेखर फणसळकरलिखित 'टॅक्स फ्री आणि इतर एकांकिका' या पुस्तकास डॉ. म. वि. गोखले यांच्या हस्ते देण्यात आले.

दि. ३०।१०।९६ : व. ह. गोळे स्मृतिदिनानिमित्त डॉ. वि. भा. देशपांडे यांचे 'मराठी नाटक आणि मराठी प्रेक्षक' या विषयावर भाषण झाले. प्रास्ताविक- गं. ना. जोगळेकर, आभार-रत्नाकर कुलकर्णी.

दि. ७।११।९६ : केशवसुत स्मृतिदिन यंदा प्रथमच साजरा करण्यात आला. डॉ. मुरलीधर जावडेकर यांचे 'केशवसुतांची स्फूर्ती' या विषयावर भाषण झाले.

दि. २७।११।९६ : आहिताग्नि राजवाडे स्मृतिदिनानिमित्त डॉ. अशोक कामत यांचे 'शीख समाज आणि गैरसमज' या विषयावर भाषण झाले.

दि. २८।११।९६ : अहमदनगर येथे होणाऱ्या ७० व्या मराठी साहित्य संमेलनाचे निर्वाचित अध्यक्ष कादंबरीकार श्री. ना. सं. इनामदार यांचा पहिला प्रकट सत्कार प्रथेनुसार परिषदेमार्फत परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते करण्यात आला. शिवाजी सावंत, डॉ. चंद्रकांत पांढरीपांडे व अहमदनगर साहित्य संमेलनाचे कार्याध्यक्ष डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांची गौरवपर भाषणे झाली.

सूत्रसंचालन -रत्नाकर कुलकर्णी, आभारप्रदर्शन-डॉ. कल्याणी दिवेकर, प्रास्ताविक - डॉ. गं. ना. जोगळेकर, स्वागत-प्रमुख कार्यवाह राजा फडणीस. या समारंभास रसिकांची प्रचंड गर्दी होती. अनेक साहित्य संस्था व प्रकाशन संस्था यांनी श्री. इनामदार यांचा सत्कार केला.

दि. २९।११।९६ : माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त आयोजित कविसंमेलनाचे सूत्रसंचालन डॉ. अश्विनी धोंगडे यांनी केले. हेमा लेले, संदीप खरे, माधुरी दातार, लता गोडसे, इलाही जमादार, रा. शं. अत्रे व सुजाता महाजन यांनी भाग घेतला

दि. २९।११।९६ : फलटण येथील शाखा मेळाव्याला परिषदेतर्फे सर्वश्री

ह. ल. निपुणगे, डॉ. शंतनू चिंधडे व प्रभाकर संत उपस्थित होते. निपुणगे यांनी महोत्सवाची माहिती दिली तसेच आपल्या भाषणात देणगीचे आव्हानही केले. डॉ. शंतनु चिंधडे यांनी कविसंमेलनास मार्गदर्शन केले.

## शाखावृत्त

### म. सा. प. कल्याण शाखा

दि. २० जुलै १९९६ : ग. ल. ठोकळ स्मृतिदिनानिमित्त विद्या पिंगळे यांचे भाषण झाले. या प्रसंगी मोनिका जगधाने यांनी 'ग. ल. ठोकळ : आमचे आजोबा' या विषयी आठवणी सांगितल्या. अध्यक्ष - प्रा. मंजिरी सोमाणी. या प्रसंगी स्मितताताई आव्हाड यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलनही आयोजित करण्यात आले. प्रास्ताविक-दिनकरराव पोखरकर. सूत्रसंचालन-बाबूराव उपाध्ये.

### म. सा. प. धुळे शाखा

दि. १३ ऑगस्ट १९९६ - बालकवी व आचार्य अत्रे यांची जयंती साजरी करण्यात आली. श्री. अप्पा सिनकर व श्री. केशवराव ठोंबरे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. धुळे जिल्हा पत्रकार संघाचे अध्यक्ष श्री. बापूसाहेब ठाकूर अध्यक्षस्थानी होते. बालकवींच्या कवितांचे गायन श्री. विश्राम बिरारी व सहकारी कलावंत मंडळी यांनी केले. सूत्रसंचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी तर आभार प्रदर्शन अर्चना हातेकर यांनी कले. प्राचार्य डॉ. अनंतराव पाटील स्मृतिदिनानिमित्त प्राचार्य रा. रं. बोराडे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कार्यक्रमात डॉ. बापूराव देसाई, प्रा. पुरुषोत्तम पाटील, प्रा. भगवान ठाकूर यांनी प्रमुख पाहुणे म्हणून विचार मांडले. प्रास्ताविक-प्रा. सी. आय. मोरे, परिचय-प्रा. पुं. म. चित्ते, आभार-प्रा. बी. बी. महाजन

दि. २२ सप्टें. १९९६ : नवतीनिमित्त म.सा.प. पुणे व म.सा.प. धुळे यांच्या संयुक्त विद्यमाने शाखा मेळावा घेतला. मेळाव्याचे उद्घाटन सकाळी ९ वाजता डॉ. जगन्नाथ वाणी यांच्या हस्ते दीप प्रज्वलन करून झाले. धुळे शाखेचे अध्यक्ष प्रा. पुरुषोत्तम पाटील यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह प्रा. अर्चना हातेकर यांनी आजवरच्या वाटचालीचा आढावा घेतला. प्रा. उषा पाटील यांनी सूत्रसंचालन केले. तर कार्यवाह बी. बी. महाजन यांनी आभार मानले. स्वागताध्यक्ष अशोक खोपडे (नगराध्यक्ष) आमदार राजवर्धन कदमबांडे, आ. धरमचंद चोरडिया इ. मान्यवर उपस्थित होते. धुळे जिल्ह्यातील ज्येष्ठ साहित्यिकांचा डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

दुसऱ्या सत्रात 'संतसाहित्याने आम्हास काय दिले' या विषयावर परिसंवाद झाला. त्यात प्रा. डॉ. नीला पांढरे, पुं. म. चित्ते, सदाशिव माळी यांनी भाग घेतला. अध्यक्ष गं. ना. जोगळेकर. सूत्रसंचालन - प्रा. सुमेधा पाच्छापूरकर, आभार - सुभद्रा चौधरी. दुपारी कथाकथनात सौ. रेखा मुंदडे यांनी 'ताजमहाल', उज्वल कुलकर्णी यांनी 'प्रारब्ध', रविकिरण झोळ यांनी 'दोन साहित्यिक मित्रांची पैज' तर अहिरे यांनी 'भग्या' अशा कथा सांगितल्या. सूत्रसंचालन-सौ. सुषमा दाते.

तिसऱ्या सत्रातील कविसंमेलनात जिल्ह्यातील कवींनी उत्साहाने भाग घेतला. अध्यक्षा-सौ. उमा शर्मा, सूत्रसंचालन-दीपक कदम, आभार-सौ. राजश्री शेलकर.

समारोपाचे सत्र श्री. गुलाबराव बोरसे यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले. परिषदेच्या वतीने डॉ. शंतनु चिंधडे, प्र. अ. संत यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी समारोप केला. प्रा. भगवान ठाकूर यांनी सूत्रसंचालन केले. श्री. पी. यू. पवार यांनी आभार मानले. शाखा मेळाव्यास रसिकांचा प्रचंड प्रतिसाद लाभला.

**म. सा. प. श्रीरामपूर शाखा**

दि. २० ऑगस्ट १९९६ - 'प्रमाणपत्र वितरण' व 'शिक्षक कृतज्ञता सोहळा' यानिमित्त मंदाकिनी वैद्य यांनी आपल्या भाषणात वाचा, लिहा आणि बोला तरच मराठी भाषा समृद्ध होईल असा संदेश दिला. अध्यक्षस्थानी सौ. मीनाताई जगधाने होत्या. प्रास्ताविक कार्यवाह प्रा. बाबुराव उपाध्ये यांनी केले तर सूत्रसंचालन कार्यवाह दिनकर पोखरकरांनी केले. या कार्यक्रमास साहित्य विशारद, प्राज्ञ, प्रथमा व प्रवेश परीक्षेस बसलेले विद्यार्थी मोठ्या संख्येने उपस्थित होते.

**म. सा. प. लासलगाव शाखा**

दि. १२ जुलै १९९६ - नारायण सुमंत यांनी 'पावसाच्या कविता' हा बहारदार काव्यवाचनाचा कार्यक्रम सादर केला.

दि. १३ जुलै १९९६ - बालकवींच्या जयंतीनिमित्त कवी सौमित्र तथा किशोर कदम यांनी रंगतदार काव्यवाचनाचा कार्यक्रम सादर केला. दोन्ही कार्यक्रमाचे प्रास्ताविक शाखाध्यक्ष प्रा. विजय कचरे यांनी केले. सूत्रसंचालन व कविपरिचय कार्यवाह श्री. प्रकाश होळकर यांनी केले. प्रा. भास्कर ढोके यांनी आभार मानले.

**राजा फडणीस, रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर, भगवान ठाकूर**
**कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**

## पुरस्कार

- इंदिरा गांधी राष्ट्रीय कला अकादमीची फेलोशिप दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांना दरमहा दहा हजार रु. दोन वर्षांसाठी जाहीर करण्यात आली. ही फेलोशिप यंदाच सुरू करण्यात आली आहे.
- राजर्षी शाहू पुरस्कार डॉ. शकरराव खरात यांना कोल्हापूरमध्ये १८ नोव्हेंबर रोजी देण्यात आला.
- साहित्य अकादमीचा पुरस्कार गंगाधर गाडगीळ याच्या 'एका मुंगीचं महाभारत' या ग्रंथाला जाहीर करण्यात आला.
- उत्कृष्ट अनुवादाबद्दलचा साहित्य अकादमीचा पुरस्कार वसंत केशव पाटील यांना 'दशद्वार ते सोपान' (कविवर्य बच्चन) या अनुवादाबद्दल जाहीर करण्यात आला.
- सोलापूरच्या भेरूरतन दमाणी पुरस्काराचे मानकरी पुढीलप्रमाणे :
  फादर फ्रॅन्सिस दिब्रिटो- ओॲसिसच्या शोधात
  बाबा भांड - दशक्रिया
  सुधीर थत्ते - एका शेवटाची सुरुवात

## साभार स्वीकार

- इलियद : अनुवादक, शा. नी. ओक, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई
- कल्पतरूचे आरव : भास्करराव कुलकर्णी, पसायदान प्रकाशन, लातूर, पृष्ठे १६७, पंचेचाळीस रुपये
- माझी चिंध्यांची बाहुली : सौ. अनुराधा वैद्य, सुकन्या प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ११०, ऐंशी रुपये
- शब्द फुलोरा : गो. र. आंबेकर, अरुंधती प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४, तीस रुपये
- स्त्रियांची नवकथा - वाटा आणि वळणे : मंगला वरखेडे, कैलासराणा प्रकाशन, नाशिक, तीनशे रुपये
- संस्कार : के. एम. तनपुरे, तृप्ती सागर प्रकाशन, तळेगाव दाभाडे, पृष्ठे १९६, एकशे पंचाहत्तर रुपये
- पर्यावरणीय प्रबोधन आणि साहित्य : प्रा. रा. ग. जाधव, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४४, नव्वद रुपये
- देवगंधर्व : सौ. शैला दातार, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३०७, एकशेऐंशी रुपये.
- काश्मीर शिवयोग, बोधेश्वरी : शि. श्री. लेले, अंधेरी (पूर्व), मुंबई, पृष्ठे ४७३, शंभर रुपये.
- माय आणि इतर कविता : अशोक नीलकंठ सोनावणे, मृणाल प्रकाशन, नाशिक, पृष्ठे ६२, चाळीस रुपये.
- कलश : रमेश इनामदार, निमित्त प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४८, तीस रुपये.
- अभंग गौरव : रामचंद्र माधव कुलकर्णी, सुमधुर प्रकाशन, जळगाव, पृष्ठे २४, सोळा रुपये.
- आधुनिक मराठी कवयित्रींची कविता : प्रा. रा. ग. जाधव, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६०, शंभर रुपये.
- काही मराठी कवी-जाणीव आणि शैली : सुधीर रसाळ, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १८२, एकशे वीस रुपये.
- लेणी : डॉ. गंगाधर पानतवणे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३५, पंच्याऐंशी रुपये.
- तुकाराम कथात्मक साहित्य-एक अभ्यास : अनुराधा पोतदार, पृष्ठे ११५, पंचाहत्तर रुपये.
- माझा काय दोष : शकरराव खरात, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५१, पंच्याण्णव रुपये.
- साहित्यचिंतन : जनार्दन वाघमारे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९२, एकशेवीस रुपये.
- वाद-संवाद : अरुण कांबळे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०, ऐंशी रुपये.
- निरांजन : डॉ. विजया संगवई, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४८, तीस रुपये.
- निंबोणीच्या झाडामागे : मंगेश पाडगावकर, अनुभव प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १२०, पंचाहत्तर रुपये.
- अरण्य पुरुष : सुरेशचंद्र वारघडे, अनुभव प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १४०, पंच्याऐंशी रुपये.
- कादंबरीकार श्री. ना. पेंडसे : डॉ. रवींद्र शोभणे, ऋचा प्रकाशन, नागपूर, पृष्ठे २७१, दीडशे रुपये.
- अविरत : अनंत सामंत, उन्मेष प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६३६, दोनशे पन्नास रुपये.
- मानवी संबंधांच्या खतावणीत : सुवर्ण कुलकर्णी, वंदन प्रकाशन, पायवाट, मोतीनगर, अमरावती, पृष्ठे ८८, चाळीस रुपये.
- सुखाचे सोबती : सौ. सिंधु कुलकर्णी, प्रपंच प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १४४, सत्तर रुपये.



अनुक्रमणिका

o कथारूप शेक्सपीअर : प्रा. भा. म. गोरे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे ९७, पन्नास रुपये.
o साईसाठीच्या पाऊस कविता : मोहन कुलकर्णी, गमभन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८८, बावीस रुपये.
o नाट्यव्यक्तिरेखाटन : वि. भा. देशपांडे, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे पृष्ठे १८३, एकशेपंचवीस रु.
o त्रयोदशी : डॉ. सदानंद मोरे, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०, ऐंशी रुपये.
o जागृतीकार पाळेकर : डॉ. सदानंद मोरे, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४२८, तीनशे रुपये.
o रुची : सौ. पुष्पा जाजू, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, सातारा, पृष्ठे ८८, चाळीस रु.
o कोण कुणाचं? (चारोळ्या संग्रह): डॉ. सौ. निर्मला सारडा, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, सातारा, पृष्ठे ९६, वीस रुपये.
o प्रवास (कादंबरी) : रोहिदास कवळे, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, सातारा पृष्ठे १०४
o जीवनाच्या संदर्भात : शं.श्री.वाशीकर, जीएस ब्रदर्स प्रकाशन औरंगाबाद, पृष्ठे ३१, छप्पन्न रु.
o स्वैर झाली समाधी : शं.श्री.वाशीकर, जीएस ब्रदर्स प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३५, तीस रुपये.
o आजोबांची कविता : शं.श्री.वाशीकर, जीएस ब्रदर्स प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ५२, ८१ रुपये.
o हे असेच व्हायचे होते : सौ. स्नेहसुधा कुलकर्णी, कल्पना बुक डीलर्स, पुणे, पृष्ठे १६०, १२०रुपये.
o शैली वैज्ञानिक समीक्षा : डॉ. रमेश धोंगडे, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे २४९, १५० रुपये.
o श्री रघुनाथाचा कौल : पु. ग. गोगटे, (प्रकाशक स्वतः लेखकच), पृष्ठे ८४, तीस रुपये.
o राघो भरारी : राघवेंद्रराव पगडी, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे १२५, सत्तर रुपये.
o चिंता : सौ. विद्या वसंत मानेकर, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे २५, पंचवीस रुपये.
o मी माझा सांगाती : बी. जी. वाघ, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे १२४, सत्तर रुपये.
o न्यायनिवाडा आणि निवडुंग : डी.एस. कुलकर्णी, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे ९१, ५० रु.
o वा. गो. आपटे यांची आनंदयात्रा : डॉ. श. रा. राणे, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे ३५०, दोनशे पंचवीस रुपये.
o हरवलेले घरकुल : सौ. पद्मावती जावळे, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे १३०, सत्तर रुपये.
o नाथपंथी ज्ञानेश्वर आणि वारकरी ज्ञानदेव : श्रीधर रंगनाथ कुलकर्णी, मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, हैद्राबाद, पृष्ठे १२०, शंभर रुपये.
o त्र्यंबक शंकर शेजवलकर (सूची) : सुषमा पौडवाल, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, पृष्ठे ३१२, एकशे पन्नास रुपये.
o पत्रकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर : गंगाधर पानतावणे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, दोनशे साठ रुपये
o बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ : विलास खोले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२५, ऐंशी रुपये.
o धर्मांतराची भीमगर्जना : अरुण कांबळे, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५६, शंभर रुपये.

**कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे**

o उपेक्षितांचे अंतरंग : श्री. म. माटे, पृष्ठे १५६, चाळीस रुपये.
o प्रवाहिनी : प्रा. भ. श्री. पंडित, पृष्ठे १२७, दहा रुपये.

**मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे**

o चांदण्यात : वि. स. खांडेकर, पृष्ठे ८७, पस्तीस रुपये.
o दवबिंदू : वि. स. खांडेकर, पृष्ठे १०३, पंचवीस रुपये.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका, टिळक रोड, पुणे - ३० Regd No. 6398 / 57



अहमदनगर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

ना. सं. इनामदार

अनुक्रमणिका



